गरूड हनुमंत विसावा खेचर । लाविती पदर डोळियांसी । ३ ।
निवृत्ति मुक्ताबाई चांगदेवासहित । परसा भागवत शोक करी । ४ ।
नामा म्हणे देवा खेद सिंधु लोटा । उठा आतां भेटा सोपानासी । ५ ।

५४१. सोपानदेवें ग्रंथ केला होता सार । ठेविला समोर निवृत्तीच्या । १ ।
सवें मुक्ताबाई सद्‌गुरू निवृत्ति । लक्ष्मीचा पति घेतियेला । २ ।
जयजयकार ध्वनि होताती अपार । जाती योगेश्वर समाधीसी । ३ ।
राही रखुमाई नीळकंठ जवळी । समाधीच्या पाळी अवघेजण । ४ ।
समाधि पायरीवरी वटेश्वर सोपान । मागितला मान पांडुरंगा । ५ ।
प्रतिवर्षी भेटी देऊं उभयतां । अलंकापुरीं हूनि जातां उत्सवासी । ६ ।
नामा म्हणे देवा कृपा केली फार । दिधला कीं वर भक्तराजा । ७ ।

५४२. निवृत्ति मुक्ताइनें धरियेलें मौन । वटेश्वर सोपान त्यागियेला । १ ।
समाधि पताकांची पडली सावली । उतरले खालीं योगीराज । २ ।
पांडुरंगासंगें गेले ऋषेश्वर । सोपान वटेश्वरा बैसविलें । ३ ।
शिवाचा अवतार सद्‌गुरू निवृत्ति । मुक्ताबाई सखी तुम्हापाशीं । ४ ।
अंतरींचें जाणतां बा पंढरीनाथ । आले अश्रुपात सोपानासी । ५ ।
सोपानाची बोळवण करितसे हरी । दीर्घध्वनि करी नामदेव । ६ ।

५४३. सोपान समाधी बैसला । सकळीं पुष्प वर्षाव केला ।
जयजयकारें भूगोल कोंदला । आनंद दाटला महीवरी । १ ।

हे कडवे म्हणून पुष्पवृष्टी करावी. निवृत्ती ज्ञानदेव सोपान मुक्ताई एकनाथ नामदेव तुकाराम हे संत भजन करावे. शेवटी पारंपारिक आरती म्हणावी.

धन्य धन्य हा सोपान । वर्णितसे श्रीभगवान ।
क्षणोक्षणीं माझी आठवण । उद्विग्न मन होतसे । २ ।
नारद तुंबर अक्रुर उद्धव । पुंडलिकादि करूनि सर्व ।
मुनिदेवगण गंधर्व । स्तुतिस्तव बोलती । ३ ।

म्हणती चौघेजण भाग्याचें । जें निधान ब्रह्मादिकांचें ।
तें निजध्यान शंकराचें । सकळ जीवांची जीवनकळा । ४ ।
तो प्रत्यक्ष येऊनि अनंत । याची परीचर्या करित ।
भक्ता साह्य होऊनि भगवंत । पूर्ण आर्त करावया । ५ ।
निजभक्तांचे कौतुक । करोनी ब्रह्मांडनायक ।
तया वर्णिती सनकादिक । वरकड मशक बापुडें । ६ ।
पुंडलिक विस्मय बोलती । हे चौघे भाग्याच्या मूर्ती ।
याच्या नामें जग उद्धरती । पावे विश्रांति जगासी । ७ ।
नामा म्हणे सकळ जगाचा । उदय जाहलासे दैवाचा ।
सुकाळ केला स्वानंदाचा । ब्रह्मविद्येचा मृत्युलोकीं । ८ ।

५४४. धूप आणि दीप उजळिल्या ज्योती । तेव्हां ओसंडती अवघे जन । १ ।
सोपान वटेश्वरें केला नमस्कार । उतरलें पार भवसिंधू । २ ।
घेतियेलें तीर्थ तंव झाले विकळ । झांकियेले डोळे ब्रह्मबोधें । ३ ।
निवृत्ति मुक्ताई राहिली बाहेरी । आतां तुम्हीं हरी सांभाळावें । ४ ।
देव ऋषेश्वर निघाले बाहेर । केला नमस्कार नामदेवें । ५ ।

५४५. जयजयकारें टाळी पिटली सकळां । घातियेली शिळा समाधीसी । १ ।
निवृत्ति मुक्ताईनें घातियेली घोन । करितो समाधान पांडुरंग । २ ।
सोपान वटेश्वर सुखधामीं शेजा । करिताती पूजा समाधीची । ३ ।
खेद दुःख झालें अवघ्या साधुजनां । केली प्रदक्षिणा समाधीसी । ४ ।
निवृत्ति मुक्ताईनें वंदिली समाधी । देहभान शुद्धि हारपली । ५ ।
नामा म्हणे देवा उठा अवघेजण । करूं आचमन भोगावती । ६ ।

५४६. वैष्णवांनीं केली समाधि प्रदक्षिणा । गेले आचमना भोगावतीं । १ ।
सारी रात्र कीर्तन केलें त्रयोदशीं । चतुर्दशी दिवशीं भोजनें केलीं । २ ।
अमावास्ये जागरण केलें परिपूर्ण । प्रतिपदे गमन वैष्णवांचें । ३ ।

निवृत्ति मुक्ताई झाली उदासी । आतां हृषिकेशी बोळवावें । ४ ।
चांगा म्हणे माझी करा बोळवण । घेऊनि नारायण समागमें । ५ ।
नामा म्हणे देवा माघमास नेमा । चांगदेवा प्रेमा समाधि देऊं । ६ ।

५४७. सव्व ह्रातें नगर येती ऋषेश्वर । केला नमस्कार समाधीसी । १ ।
परतले देव आणि सुरगण । चालली विमानें वैष्णवांची । २ ।
निवृत्ति मुक्ताबाई चांगदेव संगें । रुक्मिणी पांडुरंग समुदायेसी । ३ ।
नामा म्हणे देव गंधर्व ऋषिमुनी । जाती उत्तरायणीं निवृत्तिराज । ४ ।

५४८. निवृत्तिदेवासंगें देव ऋषीश्वर । उठावले भार वैष्णवांचे । १ ।
प्रतिपदे देव निघाले बाहेर । केला नमस्कार समाधीसी । २ ।
अवघियासहित वैष्णव मंडळी । सवें वनमाळी चालताती । ३ ।
गोदातीरा जाया निवृत्ति उद्देशी । सह समुदायेसी उठावले । ४ ।
नामा म्हणे घेतला नारायण संगें । चालिले अनेगे भक्तराज । ५ ।

संत चांगदेवांची समाधी, श्रीक्षेत्र पुणतांबे, जि. अहमदनगर

माघ वद्य त्रयोदशी शके १२१८

५४९. निवृत्तिदेवा योग्य गंगेचें तें स्नान । करूं अवघेजण आवडीनें । १ ।
तीर्थयात्रा होईल देवसमागमें । केवढा महिमा रामें सांगितला । २ ।
मार्गी चालताती भक्त आणि हरी । आले भुलेश्वरीं अवघेजण । ३ ।
भुलेश्वरालागीं पूजा केली सांग । भक्त पांडुरंगे तीन रात्रीं । ४ ।
तेथून वैष्णव चालियेले हरी । आले सिद्धेश्वरीं देवभक्त । ५
पाराशर ऋषीचें स्थळ पुरातन । राहिले नारायण पंचरात्र । ६
नामा म्हणे देवा जावें कपिलेश्वरा । आनंद ऋषीश्वरा झाला फार । ७

५५०. कौतुकानें तेथें आले सावकाश । उभे हरीदास कीर्तनासी । १
दहा दिवस तेथें राहियेले स्वस्थ । अवघ्यांचा मनोरथ पूर्ण झाला । २

क्षेत्रींचा महिमा पुसिती देवासी । जना आगळी काशी सांगितली। ३ ।
येथोनियां वाट जाते वाराणसी । मुनि आणि ऋषि आनंदले। ४ ।
नामा म्हणे देवा दिवस झाले फार । लागेल उशीर समाधीसी। ५ ।

५५१. चालिले घेऊनि देव ऋषीश्वरा। आवघिया पुढारा गरूड देव। १ ।
दिवसानुदिवस चालिले सत्वर । पहावें गोदातीर म्हणोनियां। २ ।
धन्य गोदातीर धन्य कचेश्वर । जाती ऋषीश्वर स्नानालागीं। ३ ।
सारा पौष मास गेला कचेश्वरीं। नित्य गंगातीरीं स्नानसंध्या । ४ ।
पाहिला कचेश्वर पाहिली ती गोदा । आली प्रतिपदा माघमास। ५ ।
नामा म्हणे देवा जावें पुण्यस्तंभा । मनोहर जागा सिद्धेश्वर। ६ ।

५५२. उठले वैष्णव कीर्तन गजरीं । आले सिद्धेश्वरीं आश्रमासी। १ ।
पौर्णिमेपावेतों राहिले निश्चळ । नेमा आतां स्थळ समाधीसी। २ ।
निवृत्ति मुक्ताई संगें आला चांगा। म्हणती पांडुरंगा उठा आतां। ३ ।
ज्ञानदेवासाठीं उत्सव अलंकापुरीं। तैसा कन्हेतीरीं सोपानासी। ४ ।
तैसी चांगयाची पुरवावी आळी । नामा वनमाळी उठावले। ५ ।

५५३. दशमीचे दिवशीं ठेविलें प्रस्थान। साधियेला येणें देव गुरू। १ ।
दिधला मंडप सिद्धेश्वरासमोर। उठावले भार वैष्णवांचे। २ ।
सर्व स्वस्थ तेथें बैसले मिळून । नारद कीर्तन पुढें होत। ३ ।
धन्य पुण्यस्तंभ धन्य गंगातीर । धन्य दिसती भार पताकांचे। ४ ।
नामा म्हणे देवा निज भक्तीसाठीं । अंगें होसी कष्टी पांडुरंगा। ५ ।

५५४. गोदातीरीं उत्सव करिती जगजेठी। चांगदेवासाठीं समारंभ। १ ।
निवृत्ति मुक्ताबाई संगें पंढरिनाथ। आले मंडपांत समुदायेसी। २ ।
निवृत्ति पांडुरंग बैसले निवाडे। चांगदेव पुढें उभे ठेले। ३ ।
जोडियेलें कर चांगदेवें पुढती। करिती विनंति वोसंडोनी। ४ ।
नामा म्हणे देवा उठिलें अंत:करण । नाहीं देहभान चांगयासी। ५ ।

५५५. चवदाशें वर्षें शरीर केलें जतन । नाहीं अज्ञानपण गेलें माझें । १ ।
अहंकारें माझें बुडविलें घर । झालों सेवा थोर स्वामीसंगें । २ ।
तापत्रयीं तापलों मह्य अग्नीं जळालों । अविवेकीं झालों मंदमती । ३ ।
काय माझा देह वायावीण व्यर्थ । आलों शरणागत पांडुरंगा । ४ ।
अभिमानें आलों श्रीअलंकापुरीं । अज्ञान केलें दुरी मुक्ताईनें । ५ ।
नामा म्हणे योग दुःखाचें शरीर । काय याचा घोर करुनियां । ६ ।

५५६. नाना दुःख माया आठवती मना । आतां नारायणा कृपा करीं । १ ।
माझ्या पातकांचा लागूं नेदी अंत । ऐसें माझें चित्त साक्ष असे । २ ।
ज्ञानाग्नि माझी करा तृणवत । होऊनि कृपावंत श्रीहरी । ३ ।
योगीराज यासी नाहीं पापदोष । केला उपदेश मुक्ताईनें । ४ ।
नामा म्हणे देवा पेटलें अंतर । करा आतां स्थीर योगीराज । ५ ।

५५७. अवघ्या विघ्नंचा करूनि अभ्यास । पावलों मी क्लेश देवराया । १ ।
मुक्ताबाई योगें उतरलों भवसिंधु । तैसी दीनबंधु कृपा करीं । २ ।
पतितपावन नाम तुझें थोर । करीं अंगिकार अनाथाचा । ३ ।
धन्य आमुचें भाग्य जाहलें दर्शन । अंगें नारायण साहित्य करी । ४ ।
चांगदेवें ऐसें आठविलें फार । केला नमस्कार नामा म्हणे । ५ ।

५५८. कृपावंत झाली जेव्हां मुक्ताबाई । स्वरूप दिशा दाही दाखविलें । १ ।
पाठीं पोटीं स्वरूप केलें सद्गुरूनें । तंव अभिमान गेला माझा । २ ।
याच्या उपकाराची काय वर्णू थोरी । ज्यांच्या संगें हरि जोडियेला । ३ ।
पुरे पुरे आतां आठविसी फार । होईल उशीर समाधीसी । ४ ।
नामा म्हणे देवा उठा संतजन । करूं आतां स्नान गौतमीसी । ५ ।

५५९. हरिपाठ गजरें केला जयजयकार । उठावले भार वैष्णवांचे । १ ।
टाळ मृदंग वाजती अपार । मिरविती भार वैष्णवांचे । २ ।
दोही बाहीं उभे पातकांचे भार । मध्यें मनोहर गौतमी ते । ३ ।

विसोबा खेचरें पुंडलिका हातें । आणिलें साहित्य समाधीचें । ४ ।
नामा म्हणे हरि चांगदेवा स्नान । घाली आवडीनें प्रेमयुक्त । ५ ।

५६०. निवृत्ति मुक्ताई गोविंद गोपाळ । उठले सकळ स्नानालागीं । १ ।
राही रखुमाई सहसमुदायेसी । मुनि आणि ऋषि उठावले । २ ।
करूनियां स्नान निघाले सकळ । नाचती गोपाळ गोदातीरीं । ३ ।
चांगदेवें सोंवळें होऊनियां त्वरें । देव ऋषीश्वर पूजियेले । ४ ।
धन्य गोदातीर आदि हें अनादि । उकरिली समाधि यथासांग । ५ ।
नामयाचे पुत्र नारा विठा गोंदा । जागा झाडी महादा समाधीची । ६ ।

५६१. चांगदेव योगी निष्काम चांगला । स्वरूपीं रंगला केशवाच्या । १ ।
सुगंध अक्षता पुष्पें परिमळ । पूजिले सकळ साधुसंत । २ ।
राही रखुमाई आणि पांडुरंग । पूजियले सांग चांगदेवें । ३ ।
पूजिली मुक्ताई सद्गुरू निवृत्ति । आणिक विभूति गौरविले । ४ ।
नामा म्हणे आतां नका राहूं स्थीर । होईल उशीर समाधीसी । ५ ।

५६२. उठियेले देव गोपाळ मंडळी । बैसले ते पाळीं समाधीचे । १ ।
निशीं सर्व कीर्तन वद्य माघमासीं । व्रत एकादशी गोदातीरीं । २ ।
द्वादशी पारणें वैष्णव सोडिती । बैसल्या त्या पंक्ती सिद्धेश्वरीं । ३ ।
सिद्धेश्वरीं पूजा केली चांगयानें । पात्रें नारायण टाकूं लागे । ४ ।
राही रखुमाई करिती पक्कान्नें । सोडितो पारणें चांगदेव । ५ ।
चांगदेवासंगें निवृत्ति मुक्ताई । बैसली ते पाहीं वैष्णवांत । ६ ।
नामा म्हणे आतां करावीं भोजनें । ताटें रखुमाईनें विस्तारिलीं । ७ ।

५६३. एकमेळीं जेविती वैष्णव सकळ । वाढिती गोपाळ सकळांसी । १ ।
पांडुरंगें केला चांगोबाचा सोहळा । माळ घाली गळां पुंडलिक । २ ।
गंध आणि अक्षता विसोबाचे हातीं । महापूजा होती चांगोबाला । ३ ।
आरत्या पंचारत्या करिती आनंदानें । नामा म्हणे प्रेमें वोसंडलें । ४ ।

५६४. निवृत्ति मुक्ताईचे वोसंडले नयन । करितो समाधान पांडुरंग । १ ।
विसोबा खेचराचे भगोनि येती डोळे । परिसा तळमळे पुंडलिक । २ ।
नाना खेद करुनि सारिलें भोजना । जाती आचमना गंगेलागीं । ३ ।
आंचवले देव वैष्णव ते ऋषी । जाती समाधीसी चांगदेव । ४ ।
जेवूनियां संत बैसले निवाडे । गोंदा महादा विडे वांटिताती । ५ ।
नामा म्हणे सर्वे उठे नारायण । आले अवघेजण समाधीपाशीं । ६ ।

५६५. मुक्ताईनें चांगा घेतलासे पोटा । उठा आतां भेटा लहान थोर । १ ।
भेटले ऋषीश्वर वैष्णव सकळी । बैसले ते पाळी समाधीच्या । २ ।
निवृत्ति मुक्ताईसी केला नमस्कार । उतरिले पार भवसिंधू । ३ ।
विठ्ठल रखुमाईसी केली प्रदक्षिणा । मग शुद्ध नमना आरंभिले । ४ ।
नामा म्हणे देवा निवृत्ति मुक्ताई । चांगा लागे पायीं जाऊनियां । ५ ।

## संत चांगदेवांचें नमन

५६६. नमो अनादि चक्रपाणि । नमो निवृत्ति ज्ञान स्वामी ।
नमो सोपान संजीवनी । मुक्ताबाई । १ ।
नमो सद्गुरु मुक्ताई । नमो स्वस्वरुप ठायीं ठायीं ।
नमो वंदितसे पायीं । नमो नमो परमपद । २ ।
नमो मूर्येधशनी । नमो भ्रुमध्य आटणी ।
नमो माय कुंडलिणी । योगियांची । ३ ।
नमो त्रिविध ताप हरण । नमो विषय निवारण ।
नमो स्वामी निष्काम । कर्ता हर्ता नमो । ४ ।
नमो अर्ध नासिक धमनी । नमो पाळीपोटीं दाटणी ।
नमो जनीं वनीं । चिन्मयछत्र । ५ ।
नमो योगमाया दिगंबर । नमो व्यापक चराचर ।
नमो दाही अवतार । परब्रह्म नमो । ६ ।

कंद कळीकाळ हरणा नमो। तुझेनि परब्रह्म गमो।
शांति अव्यक्त शमो। श्रीहरी ।७।
नमो संसार निरसिता। नमो माया हर्ता।
नमो अद्वय अनंता। पांडुरंगा ।८।
नमो पातकसंहारी। नमो परब्रह्म खेचरी।
नमो योग अगोचरी। परमात्मा आत्मा ।९।
नमो शिवशिवेशा। नमो आदिगुरु जगदीशा।
नमो प्रकाश प्रकाशा। परब्रह्मा ।१०।
पुरे पुरे येरझारा। नमो वेव्हार सारा।
नमो शारंगधरा। अंत:करण पाहसी।११।
नमो मुक्ताईच्या उपदेशा। नमो आदि अनंता जगदिशा।
स्वरुपादि परेशा। जगद्गुरु नमो नमो।१२।
नमस्ते नमस्ते निवृत्ति। नमस्ते नमस्ते ज्ञानमूर्ति।
नमस्ते नमस्ते सोपान ज्योती। परेशा नमो।१३।

५६७. लाविली कौंपिन पितांबरी एक। त्यागिली अनेक महत्माया। १।
सव्य हातें घेतलें संतसाधुजनां। केली प्रदक्षिणा समाधिसी। २।
समाधीचे पाळी निवृत्ति बनमाळी। अंतरी कळवळी मुक्ताबाई। ३।
आणिकांच्या डोळां अश्रुपात येत। होईल कीं गुप्त योगिराज। ४।
चांगदेवा दिधलीं विठोबाची पाउलें। तीर्थ तें घेतलें देवगुरुचें। ५।
नामा म्हणे हरि झाली आळवण। करा बोळवण चांगोबाची। ६।

५६८. पुंडलिकें धरिलां चांगोबाचा हात। तंव सकळ संत कळवळती। १।
पताकांचे भार समाधी भोंवतें। तेव्हा साधुसंत उठावले। २।
यांच्या या ज्ञानाचा अंतपार नाहीं। भली मुक्ताबाई ओसंडली। ३।
संतसमागम फळला तुजला। एकांत फावला मुक्ताई। ४।

मसुरंप्रमाणे दावियेली खूण । तेंचि पूर्णब्रह्म योगियांचें । ५ ।
फार दिवस तुम्ही रक्षिलें शरीर । मुक्ताईनें पार उतरिलें । ६ ।
नामा म्हणे देवा सद्गुरुचा महिमा । व्याप पूर्ण आम्हां पांडुरंग । ७ ।

५६९. कुंकुम केशराचे समाधीस सडे । पहाती निवाडे जनलोक । १ ।
गोदातीरीं महोत्सव चांगदेवा । पूर्ण तूं विसावा पांडुरंगा । २ ।
समाधीभोंवतें उभे साधुसंत । उतरले आंत चांगदेव । ३ ।
निवृत्ति पांडुरंग गेले समागमें । वैष्णव रामराम बोलताती । ४ ।
राही रखुमाबाई उभ्या दोही बाही । मध्यें मुक्ताबाई संबोखिती । ५ ।
नामा पुंडलिक करिती समाधान । स्थीर करा मन बोधभावें । ६ ।

५७०. समाधीसी शेज घातली मनोहर । बैसविले वर चांगदेव । १ ।
आनंदाने टाळ्या पिटती वैष्णवभार । लाविती पदर डोळियांसी । २ ।
टाळ मृदंगाचा झाला झणत्कार । गेले योगेश्वर समाधीसी । ३ ।
सांडिली भूषणें भस्म आभरणे । झाले निमग्न परब्रह्मी । ४ ।
झांकियेले नेत्र उन्मनीच्या संगें । निवृत्ति पांडुरंग ओसंडले । ५ ।
नामा म्हणे झाला समाधिस्थ योगेश्वर । निघाले बाहेर देवभक्त । ६ ।

शेवटचे कडवे म्हणून पुष्पवृष्टी करावी, निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताई एकनाथ नामदेव तुकाराम भजन करावे. शेवटी पारंपारिक आरती म्हणावी.

५७१. भूचरी खेचरी चाचरी निश्चळा । अगोचरी डोळा स्थिरावली । १ ।
झांकिली समाधि संतसज्जनांनीं । तुळसी पुष्पें वरुनि वर्षताती । २ ।
निवृत्तिनें मिठी विठोबाच्या गळां । आणिकांच्या डोळां अश्रु येती । ३ ।
केलें समाधान विठ्ठल रखुमाईनें । निवृत्ति म्हणे राहणें काय आतां । ४ ।
गेलें योगिराज राहिले ठायीं ठायीं । आतां मुक्ताई जाईल कीं । ५ ।
स्वरुपींचे ओघ जातील स्वरुपीं । नामा म्हणे निरोपी पांडुरंग । ६ ।

५७२. देवें समाधान केलें अवघेजणा । चला आचमना गौतमीसी । १ ।
वद्य त्रयोदशी दिधली समाधी । महोत्सव गोविंदीं समर्पिला । २ ।
गर्जती वैष्णव विठोबाच्या नामा । थोर तुझा महिमा दीनबंधू । ३ ।
समाधि प्रदक्षिणा केली अवघेजणें । झाली बोळवण चांगयाची । ४ ।
कीर्तन करीत आले गौतमीसी । देव मुनि ऋषि आंचवले । ५ ।
अवघ्यांनीं आचमनें केलीं गोदातीरीं । नामा म्हणे हरी उठा आतां । ६ ।

५७३. आचमन करुनि आले सिद्धेश्वरा । हरि ऋषिश्वरा आर्जविती । १ ।
निवृत्ति मुक्ताईला त्यागूं नये कोणी । आतां उत्तरायणीं गमन करूं । २ ।
पांच दिवस उत्सव केला चांगदेवा । विश्वाचा विसांवा श्रीहरी । ३ ।
वैष्णवांनीं समाधि बांधिली साजिरी । सुवर्णाचा वरी पिंपळ तो । ४ ।
केला नमस्कार वैष्णवांनीं जेंव्हां । मुक्ताई तेव्हां वोसंडली । ५ ।
नामा म्हणे देवा तीर्थक्षेत्र चांगलें । चित्त मन रंगले चांगयाचें । ६ ।

५७४. शुद्ध फाल्गुन मासीं वैष्णव हर्षकेली । पंचमीचे दिवसीं सिद्ध झाले । १ ।
निवृत्तिराज म्हणे जावें म्हाळसापुरीं । जेथें ज्ञानेश्वरी पूर्ण झाली । २ ।
उठावले भार देवऋषीश्वर । केला नमस्कार समाधीसी । ३ ।
सव्यहातें क्षेत्र घेतलें वैष्णवांनीं । चाललीं विमानें नेवाशासी । ४ ।
नामा म्हणे देव निघाले बाहेर । कीर्तन गजर पुढें होती । ५ ।

संत मुक्ताईची समाधी, मुक्ताईनगर, जि. जळगांव

वैशाख वद्य दशमी शके १२१९

५७५. तेथोनि वैष्णव आले नेवाशासी । सहसमुदायेसी देवराव । १ ।
म्हाळसेलागीं पूजा केली असे निगुती । राहिले दहा रात्रीं हृषीकेशी । २ ।
येथोनि चलावें पुढती शारंगधरा । जावें टोकेश्वरा स्नानालागीं । ३ ।
चहूं युगा आदि स्थळ पुरातन । आले नारायण गोदातीरीं । ४ ।
नामा म्हणे येथें रहावें हृषीकेशी । विजया दशमीसी सिद्ध होऊं । ५ ।

५७६. देव म्हणे गह्नणें न घडेचि येथें । जावें आतां पुढतें उद्योगासी । १ ।
निवृत्तिराज म्हणे शुद्ध प्रतिपदा । जाऊंजी गोविंदा प्रतिष्ठाना । २ ।
अनादि जें स्थळ दाविलें नारायणें । मग प्रतिष्ठाना येते जाह्नले । ३ ।
चक्रतीर्थी पोहा म्हणती आला थोर । वैष्णवांचे भार उतरले । ४ ।
नामा म्हणे हरी सहज आली वाट । आपेगांव कोठें सांगा स्वामी । ५ ।

५७७. मायभूमि पाहूं यांची आम्ही डोळां । चलावें गोपाळा सहजासहज । १ ।
भक्त त्र्यंबकपंत मूळ पुरूष आदि । तयाची समाधि आपेगांवीं । २ ।
आपेगांवीं आले देव ऋषीश्वर । उतरले भार वैष्णवांचे । ३ ।
धन्य यांचें कूळ धन्य यांचा वंश । धन्य यांचे कुशीं योगीराज । ४ ।
नामा म्हणे आम्हां दाविलें नारायणें । आली चौघीजणें याचि क्षेत्रीं । ५ ।

५७८. निवृत्ति मुक्ताइनें पाहूनि स्थळ डोळां । आलासे उमाळा ओसंडोनी । १ ।
तात आणि माता गेलीसे येथून । तेव्हां आम्ही लहान पांडुरंगा । २ ।
निवृत्ति ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न । सांभाळी सोपान मजलागीं । ३ ।
तुझ्या योगें हरी क्रमियेले काळा । फुटलासे मेळा तापसांचा । ४ ।
नामा म्हणे यांचें कळवळिलें मन । करी समाधान पांडुरंग । ५ ।

५७९. पाहिली गे माय पूर्वभूमि आपुली । बहुत सन्मानिली वैष्णवांनीं । १ ।
चैत्रमास शिवरात्र उत्सव आगळा । जावें पां वेरूळा धृष्णेश्वरा । २ ।
दशमीचे दिवशीं निघाले बाहेर । उठावले भार वैष्णवांचे । ३ ।
वेरूळ नगर असे पुरातन । विश्वकर्मा यानें किर्ति केली । ४ ।
अगाध तें पुण्य बोलताती ऋषि । जावें वेरूळासी नामा म्हणे । ५ ।

५८०. मुक्ताई उदासी झाली असे फार । आतां हें शरीर रक्षूं नये । १ ।
त्यागिले आहार अन्नपाणी सकळी । निवृत्तिराज तळमळी मनामाजी । २ ।
गंधर्व सुरगण उठले सहमेळा । गेले ते वेरूळा अवघेजण । ३ ।

वेरूळाचा महिमा सांगे हृषिकेशी। जना आगळी काशी म्हणोनियां । ४ ।
वेरूळाची यात्रा केली यथासांग। मग पांडुरंग निघते झाले । ५ ।
चालिले श्रीरंग वैष्णवांचे भार । पाहावें तापीतीर नामा म्हणे। ६ ।

५८१. निवृत्तीराज म्हणे आतां पंढरीनाथा। मुक्ताईला जपा अवघेजण । १ ।
वेधली चित्तवृत्ति स्वरूपीं निमग्न। नाही देहभान मुक्ताईला। २ ।
अवघेजण जपती जपे नारायण। चालती घेऊन मध्यभागीं । ३ ।
निवृत्तिराजें धरिली मुक्ताई हातीं। सांभाळीत जाती निशीदिनीं। ४ ।
पदोपदीं जपे निवृत्तिराज करें। आणिक ऋषीश्वर सांभाळिती। ५ ।
नामा म्हणे देवा जातां तातडीनें । पुढें स्थळ कोण नेमियेलें । ६ ।

५८२. तापीचिये तीरीं महत् ग्राम थोर। असे सोमेश्वर पुरातन। १ ।
वद्य वैशाख मास दशमी निर्मळ। उष्णकाळ फार तापतसे । २ ।
तेथें परशुरामें मारियेला बाण। पाहती पुरातन पश्चिमेस। ३ ।
पाहिलें माय आम्हीं तापीतीर। उतरले भार वैष्णवांचे। ४ ।
धन्य तापीतीर दिसे मनोहर । दोही थडी भार पताकांचे। ५ ।
नामा म्हणे हरी आवडीचें स्थळ। कण्हेर कमळ उदय झाला। ६ ।

५८३. फुलले अनेक तरूवर तेथें। दुर्वा दर्भ आंत डंवरले। १ ।
करंज जांभळी लागली एक थाटी। वरी बहु दाटी तरूवरांची। २ ।
अमृतफळें अपार विस्तारले फार। त्यामाजी मयूर टाहो देती। ३ ।
कंठ कोकिळा त्या सुस्वर गायन। तरूवर सुमनें परिमळते। ४ ।
पारिजातकांची दाटी थाटी झाली भारी। आंत मैलागिरी डुल्लताती। ५ ।
नामा म्हणे देवा भला हा एकांत। मार्कंडेयें येथें तप केलें। ६ ।

५८४. सोनियाचीं झाडें अनेक कर्दळी। त्यांत रानकेळी फोंफावल्या। १ ।
सिताफळी भरीत अवघि तापी थडी। दाट दिसती गाढी रामफळें। २ ।
तापीतीरीं ऋषि आणि शारंगधर। पाठीमागें भार वैष्णवांचे। ३ ।

धन्य महत्‌नगर धन्य सोमेश्वर । धन्य तापीतीर योगियांचें । ४ ।
उष्णकाळीं छाया आवडती फार । म्हणती ऋषीश्वर रम्य स्थळ । ५ ।
नामा म्हणे देवा रंगलें अंत:करण । उतरनी विमानें गंधर्वांचीं। ६ ।

५८५. उदित कमळें नानावर्ण सुंदर । फुल्लले तरूवर नानारूपें । १ ।
श्वेतपीतरक्त भ्रमर रूणझुण । होताती श्रवण वैष्णवांसी । २ ।
गुंजारव भ्रमती रत्नकळा फांकती। मनोहर दिसती सुरवरांला । ३ ।
तरूवर गगनीं अंकुरले भारी। विजा तैं कोंदल्या बहुतांपरी। ४ ।
गंधर्वें गायनें आलापित सुस्वरीं। केलें स्पष्ट नयनीं गुह्य गौप्य। ५ ।
नामा म्हणे देवा मन झालें स्थीर। पडियेला विसर अविद्येचा। ६ ।

५८६. निवृत्तीनें एकांत केला मुक्ताईशीं । गमन कोणे दिवशीं आरंभिलें। १ ।
मुक्ताई म्हणे जावें यावें कोठें। अवघें निघोट स्वरूप स्वामी। २ ।
गर्जतां गगन कडाडली वीज । स्वरूपीं सहज मिळियेली। ३ ।
मावळला दीप ज्योत कोठें होती। सहज सामावती निरंजनीं। ४ ।
नामा म्हणे हरी जाईल पाहतां । ऐसें माझे चित्ता कळों आलें। ५ ।

५८७. आमुच्या स्वस्थानीं नाहीं पां अंधार। अवघी चराचर प्रकाशत्वें। १ ।
उदयु आणि अस्तु नाहीं स्वरूपासी। ऐसें मुनि ऋषि जाणताती। २ ।
आम्ही कधीं आलों स्वरूप मोडोन। जावें पालटोन जेथिल तेथें। ३ ।
अंतर बाहेर स्वामीचें स्वरूप । स्वयें नंदादीप उजळिला। ४ ।
वद्य वैशाखमासीं दशमीचे दिवशीं । गेले ते स्नानासी तापीतीरीं । ५ ।
नामा म्हणे गोविंदा मनोहर पद्मनाभा। अंकुरला गाभा विराटाचा। ६ ।

५८८. टाळ विणे मृदंग सुस्वर गायन। कोंदले गगन दाही दिशा । १ ।
प्रळयींच्या विजा वर्षती अपार । झाला धुंधकार दाही दिशा । २ ।
करोनियां स्नान बैसले बाहेर । म्हणती अंधकार फार झाला। ३ ।

झुंजाट सुटला वारा कांपूं लागे धरा । नभचि अंतरा काळवलें । ४ ।
नामा म्हणे देवा झाली कैसी गती । पडलीसे भ्रांति अवघ्या जनां । ५ ।

५८९. निवृत्तिराज म्हणे प्रळयींचा वारा । सुटला शारंगधरा ऐसें वाटे । १ ।
हालतें गगन डोलती विमानें । गेलें देहभान अवघियांचें । २ ।
अवघियांचे डोळे झांकले एकट । माध्यान्हीं अभूट वळुनि आलें । ३ ।
निवृत्ति पांडुरंग राही रखुमाई । धरा म्हणती घाई मुक्ताईला । ४ ।
नामा म्हणे केशवा जाहला उबाळा । कांहीं केल्या डोळा उघडों नेदी । ५ ।

५९०. ऋषि म्हणती हरि पातलेंसें विघ्न । आतां कैसे प्राण वांचतील । १ ।
कोणाचिया शुद्धि नाहींचिया कोणा । म्हणती नारायणा मृत्यु आला । २ ।
कडाडली वीज निरंजनीं जेव्हां । मुक्ताई तेव्हां गुप्त झाली । ३ ।
वैकुंठी लक्ष घंटा वाजती एकघाई । झाली मुक्ताई स्वरूपाकार । ४ ।
एक प्रहर झाला प्रकाश त्रिभुवनीं । जेव्हां निरंजनीं गुप्त झाली । ५ ।
गेलें निवारूनी आकाश अभुट । नामा म्हणें कोठें मुक्ताबाई । ६ ।

कडवें पाचवें म्हणून पुष्पवृष्टी करावी. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई, एकनाथ, नामदेव, तुकाराम भजन करावें. शेवटी पारंपारिक आरती म्हणावी.

५९१. उघडिल्या दिशा उघडिलें गगन । पाहिलें वदन भास्कराचें । १ ।
निवृत्तिराजातें कळवळा वाटे भारी । आतां आम्हां हरि आज्ञा द्यावी । २ ।
जयजयकारें टाळ्या पिटिती सकळ । नाचती गोपाळ तापीतीरीं । ३ ।
सकळांचे चित्तीं येतो कळवळा । मुक्ताई डोळां पाहिली नाहीं । ४ ।
नानापरि खेद करिती योगेश्वर । लाविती पदर डोळियांसी । ५ ।
नामा म्हणे देवा कैसें आतां कांहीं । आम्हा मुक्ताबाई बोलली नाहीं । ६ ।

५९२. ज्ञानेश्वरा तुम्हीं निरविलें सोपान । केली बोळवण पांडुरंगा । १ ।
तो आम्हीं उत्सव पाहिलासे डोळां । चांगोबाचा सोहळा दाविला हरी । २ ।
होती ऐसी नाहीं झाली मुक्ताई । संत ठायीं ठायीं स्फुंदताती । ३ ।

रम्य स्थळ म्हणोनि राहिले एक मास। युगा ऐसे दिवस क्रमियेले। ४ ।
अर्ध मास वैशाख अर्ध मास ज्येष्ठ। फार होती कष्ट निवृत्तिराजा। ५ ।
मुक्ताई मुक्त केली केशवराजें। नामा म्हणे पूजा तापीतीरा। ६ ।

५९३. पूजियेली तापी पूजिला सोमेश्वर। उठावले भार वैष्णवांचे। १ ।
कांहीं कोणावरी नाहीं पडलें ओझें। कष्टी निवृत्तिराज होत असे। २ ।
आली गेली कैसी आम्हां कळलें नाहीं। कोठें मुक्ताई विसर्जिली। ३ ।
नामा म्हणे देवा उठवा ऋषीश्वरा। निवृत्तीचें करा समाधान। ४ ।

संत निवृत्तीनाथांची समाधी, त्र्यंबकेश्वर, जि. नाशिक
ज्येष्ठ वद्य द्वादशी शके १२१९

५९४. निवृत्तिराज म्हणे भलें केलें देवा। आतां जी केशवा सिद्ध व्हावें। १ ।
निवृत्तिराज म्हणे सहजासहज हरी। बोळविलीं सारीं सुखधामा। २ ।
दाही दिशा चित्त झालें असे सैरा। आतां शारंगधरा सिद्ध व्हावें। ३ ।
आतां माझे श्रम नको घेऊं हरी। जावें त्र्यंबकेश्वरीं समाधीसी। ४ ।
फार माझा प्राण आला असे कंठीं। आतां जगजेठी सिद्ध व्हावें। ५ ।
नामा म्हणे देवा दिवस नाहीं आतां। त्वरें वेगीं संतां सिद्ध करा। ६ ।

५९५. विमानीं बैसली विठ्ठल सुखमूर्ती। घेतला निवृत्ति मध्यभागीं। १ ।
राही रखुमाई बैसले सुरगण। उठलीं विमानें गंधर्वांचीं। २ ।
गोपाळांचे भार उठले तातडीनें। चालिलीं विमानें सुरवरांचीं। ३ ।
आतां त्वरें चला तुम्ही सप्तशृंगा। कार्य हें गोविंदा सिद्धि न्यावें। ४ ।
आदिमाया तेथें होईल दर्शन। संत साधुजन भेटतील। ५ ।
नामा म्हणे धन्य तुझ्यायोगें हरी। तीर्थयात्रा सारी घडली आम्हां। ६ ।

५९६. टाळ हे मृदंग गायन पुढती। रंजविती निवृत्ति अवघेजण। १ ।
गीतार्थ करिती योगी मुनिजन। रंजविती मन निवृत्तीचें। २ ।
आत्मसुख एक बोलती बोलणीं। ज्ञानराज मनीं आठवतो। ३ ।
ज्ञानराजें आमुचे निववीले डोळे। आतां ऐसे खेळे नाहीं कोणी। ४ ।

ऐकावा हा अर्थ मुक्ताईच्या मुखीं। आतां ऐसी सखी नाहीं कोणी। ५ ।
नामा म्हणे स्वामी सांगतां प्रमाण। ऐकतां श्रवण खेद वाटे। ६ ।

५९७. अविट बोलणें बोलावें अनादि। जें गुह्य वेदीं सांपडेना। १ ।
कीर्ति पैं वैराग्य केलें सामराज्य। गुरुत्वासी लाज नाहीं आली। २ ।
नाशिवंत शरीर केलें अविनाश। घडविला विलास अध्यात्मींचा। ३ ।
अविट बोलणीं आठवती मनीं। आतां त्रिभुवनीं दिसेनात। ४ ।
तुझ्यामुळें हरि चालतो उगला। देहा आधीं गेला प्राण माझा। ५ ।
नामा म्हणे देवा करितां ऐसा घोर। सांडील शरीर निवृत्तिराज। ६ ।

५९८. जं जं सुख आम्हीं अनुभविलें मना। त्याचा नारायणा आठव होतां। १ ।
ऐसें पदोपदीं निवृत्तिराज कष्टी। कोणकोणाच्या गोष्टी आठवाव्या। २ ।
ज्येष्ठाच्या आधीं कनिष्ठाचें जाणें। केलें नारायणें उफराटें। ३ ।
उफराटें फार कळलें माझे मनीं। वळचणीचें पाणी आढ्या गेलें। ४ ।
अवघ्यापरिस कष्टी केलें मुक्ताईनें। कांहीच बोलणें घडलें नाहीं। ५ ।
नामा म्हणे विठोबा ऐकशी बोलणें। अवघियांचीं मनें कळवळती। ६ ।

५९९. गहिनीनाथें मज सांगितलें सार। केली ज्ञानेश्वरें व्याख्या त्याची। १ ।
काढिला शोधून अनुभव मुक्ताईनें। तें ज्ञान सोपानें संपादिलें। २ ।
अनुभवें निवविला चांगा वटेश्वर। विसोबा खेचर सिद्ध झाला। ३ ।
त्या ज्ञानें झाला चांगदेव विकळ। त्यागियेली सकळ अविद्या माया। ४ ।
अज्ञानासी ज्ञान झालें तें सहज। ऐसें निवृत्तिराज आठविती। ५ ।
सप्तशृंगीं आले देव सुरगण। उतरिलीं विमानें नामा म्हणे। ६ ।

६००. देवीं देवेश शिवीं शिवेश। अगम्य सुरस आदिमाया। १ ।
अष्टदिशा अगोचरें अष्टभुजा संहारकरें। असुरादि मंथन विरें कुलस्वामिनीये। २ ।
वदताती देव आणि सुरगण। उतरिलीं विमानें ठायीं ठायीं। ३ ।
सकळांनीं पूजा केली आनंदानें। करिती कीर्तनें अंबेपुढें। ४ ।

मंडपीं बैसले निवृत्ति नारायण । नारद कीर्तनें पुढें होत । ५ ।
नामा म्हणे देवी पद्मावती सकळ । पूजिती गोपाळ आनंदानें । ६ ।

६०१. सप्तश्रृंगालागीं केली प्रदक्षिणा । आतां नारायणा सिद्ध व्हावें । १ ।
मार्गी आदिमाया पूजिली आनंदीं । म्हणती धन्य मांदी वैष्णवांची । २ ।
चालतां चालतां दिवस झाले फार । होईल उशीर समाधीसी । ३ ।
तीन रात्र येथें राहिले गोपाळ । मग म्हणती सकळ चला आतां । ४ ।
नामा म्हणे देव बैसले गरूडावर । उठावले भार वैष्णवांचे । ५ ।

६०२. वंदिली अंबिका निघाले बाहेर । कीर्तन गजर पुढें होत । १ ।
गोदातीरीं क्षेत्र धन्य त्र्यंबकेश्वर । उतरले भार वैष्णवांचे । २ ।
म्हणती पांडुरंगें दावियेलें स्थळ । निवृत्तिराज विकळ फार झाले । ३ ।
पंचमीचे दिवशीं गेले पंचवटीं । उतरले तटीं गौतमीचे । ४ ।
नामा म्हणे शेवट केला वनमाळी । रहाती ये स्थळीं निवृत्तिराज । ५ ।

६०३. सुंदर नारायण गौरविले फार । केला नमस्कार वैष्णवांनीं । १ ।
सुरस सर्व तीर्थें आदि पुरातन । केली नारायणें तीर्थयात्रा । २ ।
विसोबा खेचर परिसा भागवत । अनेक ते संत बैसविले । ३ ।
मध्यें निवृत्तिराज पांडुरंग पुंडलिक । पाहाती कौतुक गौतमीचे । ४ ।
दशमीचे दिवशीं केलें ते प्रस्थान । विधि नारायण सांगतसे । ५ ।
नामा म्हणे श्रीरंगा गौरविले सकळ । झालासे विकळ निवृत्तिराज । ६ ।

६०४. सह समुदायेंसी उठावें शारंगधरा । हरिहरेश्वरा जाऊं आतां । १ ।
उठले वैष्णव आणि हृषिकेशी । आले त्र्यंबकासी निवृत्तिराज । २ ।
एकादशी व्रत वद्य ज्येष्ठ मासीं । उत्सव निवृत्तीसी देवें केला । ३ ।
द्वादशी पारणें सोडितां वैष्णव । समारंभ देव करीतसे । ४ ।
राहिली ते शक्ति गळालें शरीर । देह अहंकार त्यागियेला । ५ ।
कोणाची करावी पूजा कोण कोणा । अवघे नारायणा करणें येथें । ६ ।
नामा म्हणे देवा मुक्ताईची गती । सांडिलें निवृत्ति शरीरासी । ७ ।

. आपुलिया अंगें साहित्य श्रीरंगें। पूजियेले सांग संतसाधू । १ ।
तदेवें केली विठोबाची पूजा । उभारिल्या ध्वजा पताकांच्या। २ ।
ामेसी स्थळ अनादि ममूळ । उघडिली शीळ समाधीची । ३ ।
ी योगेश्वर अनादि या शेजा । चिद्रत्नें ती पूजा केली असे। ४ ।
म्हणे देवा जागा निरंजनीं। युगादि हे धुणी धुपतीये। ५ ।

. तुळसी बेल पुष्पें समर्पिलीं वर। पाहाती ऋषीश्वर पहिली पूजा। १ ।
विठा गोंदा पाठविला महादा । झाडावया शेजा पुढें झाले। २ ।
वतीं जागा झाडिली निर्मळ। अनादि हें स्थळ निवृत्तिराजा। ३ ।
वती दीप लाविले समाधी । म्हणती पूजा आधीं केली असे। ४ ।
दि हे पूजा केली म्हणती संत। आतां कोणी आंत उतरूं नये। ५ ।
म्हणे हरि काय स्थळ चांगलें। दुर्वा दर्भ फुलें वाहियेलीं। ६ ।

७. पुष्करणींच्या कांठीं वैष्णवांचे भार। देव ऋषीश्वर जेवताती। १ ।
घियां पात्रें वाढिलीं नारायणें। सोडिती पारणें निवृत्तिराज। २ ।
ोबा रखुमाईनें घेतला निवृत्ति। जेविताती पंक्ति गोपाळांच्या। ३ ।
ाले वैष्णव आणि हृषिकेशी । गेले आचयनासी पुष्करणीतें । ४ ।
घे संत तेथें बैसले निवाडे । पुंडलिक विडे वांटीतसे । ५ ।
ा म्हणे केशव बैसले कीर्तनास। होतो कासावीस निवृत्तिराज। ६ ।

८. निवृत्तिदेवांसाठीं स्फुंदती ऋषीश्वर। लाविला पदर डोळियांसी। १ ।
डावर पुंडलिकें घातियेला साज। जाती निवृत्तिराज समाधीसी। २ ।
ळती विमानें वाजतसे घंटा । उठा आतां भेटा अवघेजण । ३ ।
ाधीभोंवते कुंकुमाचें सडे । पाहाती निवाडे योगीराज। ४ ।
र्तन गजरीं गेलीसे मंडळी। बैसली ते पाळीं समाधीच्या। ५ ।
ना म्हणे पुढें उभे नारायण । आरंभिलें नमन निवृत्तिराजें । ६ ।

## संत निवृत्तीनाथांचें नमन

नमो गणपति गजानना । नमो सरस्वति मंगलध्याना ।
अगाध ब्रह्मपरायणा । नमो नमो स्वामी । १ ।
आदिमायादि सागरा । नमो चिदानंद दिगंबरा ।
एकत्व एक सारा । नमो नमो तुज । २ ।
मत्स्येंद्रनाथा अनादि । नमो सर्वव्यापका बुद्धी ।
जुनाट युगादि । तुज नमो । ३ ।
सत्यकाळनाथ त्रिगती । नमो पुढत पुढती ।
योगेश्वरा आदिअंतीं । नमो नमो स्वामी । ४ ।
गहिनीनाथ अविनाशा । नमो सहजासहज प्रकाशा ।
व्यापुनि दाही दिशा । आदि गुरू तुज नमो । ५ ।
गुप्तनाथ तुज नमन । नमो सद्गुरु परब्रह्म पूर्ण ।
स्वरूपीं अनुसंधान । नमस्ते नमस्ते । ६ ।
गहिनीनाथ आदिगुरू । तूं संकटीं आदि तारूं ।
संसारहर्ता हरू । सद्गुरूनाथा तुज नमो । ७ ।
कर्ता हर्ता नारायणा । नमो उदया अस्तु गगनघना ।
विराटपुरूषा जगज्जीवना । नमस्ते नमस्ते कुळस्वामी । ८ ।
त्रिपुटी गुप्तधना । नीलवर्णा कलंकी कोंदणा ।
ज्योतिर्मय दारूणा । नमो नमो जगद्गुरू । ९ ।
पांडुरंग दयाळा । नमो गोविंदा गोपाळा ।
वैष्णवां सकळां । योगियां ऋषीश्वरां नमो नमो । १० ।
सर्व चराचर । नमो अंतरबाहेर ।
दहाही अवतार । जगद्भूषणा तुज नमो । ११ ।
नेणों कैसें व्यापी । नमन रंगलें विश्वरूपीं ।
चिन्मय गुह्य गोप्यीं । नमो सर्व भूतीं निजगुरू । १२ ।

६१०. धूप पंचारती गंधाक्षता वाहती। पूजिला निवृत्ति वैष्णवांनीं। १ ।
प्रेमें आसुवें येती सकळांचिये डोळां। माळ घाली गळां पुंडलिक। २ ।
निवृत्तिदेवें ग्रंथ केला होता सार। ठेविला समोर विठोबाच्या। ३ ।
अवघ्या जनालागीं केला नमस्कार। उठावले भार वैष्णवांचे। ४ ।
गोविंद गोपाळ आले ते सकळ। प्रेमें होती विकळ निवृत्तिराज। ५ ।
केलीं आचमनें पुष्करणींचे तटीं। आले उठाउठी समाधीपाशीं। ६ ।
नामा म्हणे देवा निवृत्तिसारखा योगी। नाहीं आतां जगीं दावावया। ७ ।

६११. समाधीच्या पाळीं बैसलीं सकळीं। केला त्या गोपाळीं जयजयकार। १ ।
निवृत्तीच्या संगें पुंडलिक पांडुरंग। सिद्ध झाले सांग समाधीसी। २ ।
निवृत्तिदेवीं वंदिलीं सकळांचीं पाउलें। तीर्थ तें घेतलें विठोबाचें। ३ ।
पताकांची छाया समाधीसी आली। उतरले खाली निवृत्तिदेव। ४ ।
पुंडलिक पांडुरंग गेले बरोबरी। बैसले आसनावरी निवृत्तिराज। ५ ।
नामा म्हणे देवा काय पाहावें आतां। गेला पंढरीनाथा चिद्धानु तो। ६ ।

६१२. निवृत्तिराज बैसले समाधी सुचित। चिन्मय ते ज्योत उजळली। १ ।
पुंडलिकें मिठी निवृत्तीच्या गळां। अवघियांच्या डोळां आसुवें येती। २ ।
विठोबाचें हृदय आलेंसे भरून। झांकियेले नयन निवृत्तिराजें। ३ ।
पुंडलिकें आणिलें विठोबासी बाहेर। केला नमस्कार वैष्णवांनीं। ४ ।
राही रखुमाबाई बैसल्या गहिंवरत। आणिक संत महंत वोसंडती। ५ ।
नामा म्हणे हरि शुद्धि नाहीं सकळां। घाला आतां शिळा समाधीसी। ६ ।

शेवटचे कडवे म्हणून पुष्पवृष्टी करावी. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई, एकनाथ, नामदेव, तुकाराम हे संत भजन करावे व पारंपारीक आरत्या म्हणाव्या.

६१३. नारा महादा गोंदा विठा विकळ झाला। झांकियेली शीळा समाधीची। १ ।
गंधर्व आणि देव चिंतावले भारी। दीर्घ ध्वनि करी नारा विठा। २ ।
गोंदा आणि महादा सांडिती शरीर। विसोबा खेचर फार कष्टी। ३ ।

लोपलासे भानु पडला अंधार। गेला योगेश्वर निवृत्तिराज। ४ ।
गेल्या त्या विभूति अनादि अवतार। आतां देवा फार आठवतें। ५ ।
नामा म्हणे हरि धरवेना धीर। येती गहिंवर वोसंडोनी। ६ ।

६१४. परम्या भागवत करितसे शोक। म्हणती देवा दुःख अति झालें। १ ।
द्वादशी समाधि दिधली निवृत्तीसी। झाले उदासी अवघे जण। २ ।
देव म्हणे उठा करा आतां पूजा। घालूं पुष्पशेजा समाधीसी। ३ ।
उठले सकळ होताती विकळ। गेले ते गोपाळ समाधीसी। ४ ।
घेतली समाधि सव्य वैष्णवांनीं। पूजिताती सुमनीं समाधीसी। ५ ।
नामा म्हणे अवघे करा प्रदक्षिणा। चला आचमना पुष्कर्णीसी। ६ ।

## पुण्यक्षेत्र त्र्यंबकेश्वराचे महिमेचा अभंग

६१५. वाचे म्हणता गंगा गंगा। सकळ पापें जाती भंगा। १ ।
कुशावर्ती करितां स्नान। त्याचे वैकुंठीं राहणें। २ ।
दृष्टी पडतां ब्रह्मगिरी। त्यासि नाहीं यमपुरी। ३ ।
नामा म्हणे प्रदक्षिणा। त्याच्या पुण्या नाही गणना। ४ ।

६१६. पांच दिवस उत्सव केला निवृत्तीसी। काला आमावस्येशी त्र्यंबकेश्वरीं। १ ।
प्रतिपदेसी हरि निघाले बाहेरी। कीर्तन गजरी पुढें होत। २ ।
कांहीं ऋषीश्वर राहियेले तेथें। गेले ते बहुतेक अलंकापुरा। ३ ।
गरूडावरी सिद्ध झाले नारायण। चाललीं विमानें गंधर्वांचीं। ४ ।
नामा म्हणे देवा जात्रे आपाढीसी। आले एकादशी पंढरीये। ५ ।

६१७. जयजयकारें टाळी पिटिली सकळां। चालली मंडळी वैष्णवांची। १ ।
पंढरीचा पोहा निघाला बाहेरी। कीर्तन गजरीं पुढें होत। २ ।
विठोबा रखुमाई बैसली गरूडावर। केला नमस्कार वैष्णवांनीं। ३ ।
म्हणती तीर्थयात्रा झाली यथासांग। पाहिले प्रसंग समाधिचे। ४ ।
गेले योगिराज अनादि जे आदि। राहिल्या समाधि जगामाजी। ५ ।
नामा म्हणे देवा गेले मुनिजन। राहिलें तें ज्ञान जगामाजी। ६ ।

६१८. गेले दिगंबर ईश्वर विभूति । राहिल्या त्या कीर्ति जगामाजी । १ ।
वैराग्याच्या गोष्टी ऐकिल्या त्या कानीं । आतां ऐसें कोणी होणें नाहीं । २ ।
सांगतील ज्ञान म्हणतील खूण । नयेची साधन निवृत्तीचें । ३ ।
परब्रह्म डोळां दावूं ऐसें म्हणती । कोणा नये युक्ति ज्ञानोबाची । ४ ।
करतील अर्थ सांगतील परमार्थ । नये पां एकांत सोपानाचा । ५ ।
नामा म्हणे देवा सांगुनियां कांहीं । न ये मुक्ताबाई गुह्य तुझें । ६ ।

६१९. नानापरी खेद आठविती मना । आतां नारायणा सिद्धि न्यावें । १ ।
समाधिसी केली आरती पंचारती । राहिली निवृत्ति स्वरुपी तुझ्या । २ ।
सुखाचे साधन झाली चौघेजणें । केली नारायणें बोळवण । ३ ।
पंचक्रोशावरी उभे ठेले भार । केला नमस्कार समाधीसी । ४ ।
नामा म्हणे आतां जावें पंढरपुरा । समाधीचा सारा विधि झाला । ५ ।

६२०. शेवटची समाधि झाली जैशी तैशी । तुज हृषिकेशी समर्पिली । १ ।
आपुल्या सत्ताबळें चालविलें हरी । विष्णुदासावरी कृपा केली । २ ।
नेणों कैसा होईल समाधीचा प्रसंग । बोलिलेती अंगें पांडुरंगा । ३ ।
मुकियाला वाचा दिधली श्रीरंगें । इच्छिला प्रसंग सिद्धि नेला । ४ ।
नामा म्हणे देव मायबाप विठ्ठल । म्हणोनि माझे बोल स्विकारीले । ५ ।

६२१. काय म्या बोलावें किती माझी मती । तुम्ही रमापति गोड केलें । १ ।
विश्वरूप घडी उघडिली धडफुडी । आतां काय थोडी कृपा म्हणूं । २ ।
चिन्मय लहरी येती उन्मळुनी । दया नारायणी थोर केली । ३ ।
समाधि चरित्र केलें यथामती । रखुमाईचा पति आर्जविला । ४ ।
समाधिचरित्र जो करील श्रवण । तयालागी येणे वैकुंठीचे । ५ ।
नामा म्हणे देवगुरु धरील चित्तीं । उद्धरील पति रुक्माईचा । ६ ।

६२२. समाधि श्रवण करिती निशिदिनीं । त्यासी चक्रपाणि देईल भेटी । १ ।
समाधिश्रवणाचा धरील जो विश्वास । नाहीं नाहीं दोष पातकाचा । २ ।

समाधि विठ्ठलाची पतिताला वाराणशी । कोटि कुळें त्यासी उद्धरील । ३ ।
जो कोणी बैसेल समाधिश्रवणा । तया प्रदक्षणा पृथ्वीची हे । ४ ।
स्वहित साधन सांगितलें येथ । परिसा भागवत लेखकु झाला । ५ ।
नामा म्हणे हरि बोलिलों तुझिया बळें । वाहिलीं तुळसीदळें स्वामीलागीं । ६ ।

६२३. रखुमाई माता राही ओंवाळिती । नित्य पंचारती हरीच्या दासा । १ ।
नित्य भक्तां हरि यालागीं विनट । पंढरीची पेठ वसविली । २ ।
धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान । धन्य हा निधान ज्ञानदेव । ३ ।
खेचर सांवता धन्य जगमित्र । यांसि कवळ देत हरी ब्रह्म । ४ ।
पांडुरंग पिसा यालागीं जाहला । मुक्ताई फावला प्रेम पान्हा । ५ ।
नामा म्हणे खूण जाणती सज्ञान । अखंड तें ध्यान निवृत्तिदेवा । ६ ।

६२४. अगा पांडुरंगा भक्तजन कैवारी । सेवकजन द्वारीं तिष्ठताती । १ ।
निवृत्ति ज्ञानदेव सोपान हा पाहीं । आली मुक्ताबाई चांगदेव । २ ।
खेचर विसोबा असंद सुदामा । चोखा पुरुषोत्तमा आला असे । ३ ।
भैराळ जनक वत्सरा तो नारा । विठा सारंगधरा आला असे । ४ ।
परसा भागवत सांवता नरहरी । राका बंका द्वारी कूर्मदास । ५ ।
नटनाट्यकुसरी कान्होपात्रा द्वारीं । चवरें विंजणें हरी जाणविती । ६ ।
माचंगा अनंता नरसीपुरीं होता । तो हा पंढरीनाथा आला असे । ७ ।
मच्छिंद्र गोरक्ष चरपटी चौरंगी । गोपीचंद योगी आला असे । ८ ।
इडा ती पिंगळा सूक्ष्म ती आवळा । षड्रस गोपाळा घेऊनि आली । ९ ।
तेथें टाळ दिंडी घेऊनियां नामा । भेटी पुरुषोत्तमा आला असे । १० ।

संत गोरोबा कुंभार जीवन व समाधी, श्रीक्षेत्र तेर, जि. उस्मानाबाद.

चैत्र वद्य १३, शके १२३९

६२५. प्रेम अंगीं सदा वाचे भगवंत । प्रेमळ तो भक्त कुंभार गोरा । १ ।
असे घराश्रमी करीत व्यवहार । न पडे विसर विठोबाचा । २ ।

कालवुनी माती तुडवीत गोरा । आठवीत वरा रखुमाईच्या । ३ ।
प्रेम आंगीं असे झांकुनी नयन । करीत भजन विठोबाचें । ४ ।
तयाचि ते कांता आणूं गेली जळ । खेळतसे बाळ आंगणांत । ५ ।
रांगत लेंकरूं गेलें असे तेथें । तुडविलें त्यातें न कळतां । ६ ।
तत्क्षणीं त्याचा गेला तेव्हां प्राण । घेउनी जीवन आली कांता । ७ ।
पाहती तें चिखलांत दिसे रक्तमांस । केला तो अक्रोश मोठा तिनें । ८ ।
पिटीयेलें तेव्हां आपुलें वदन । जळो हें भजन तुझें आतां । ९ ।
डोळे असोनियां जाहलासी आंधळा । कोठोनी कपाळा पडलासी । १० ।
कसाबासी तरी कांहीं येती दया । बारे बाळराया तुडविलें । ११ ।
विठोबानें कैसें लावियेलें वेड । नाहीं मागेंपुढें पाहिलेंसी । १२ ।
निर्दयाची तुज लागली संगती । अधर्मी श्रीपति देखियेला । १३ ।
काय तुझा यानें केला असे अन्याय । दूर परता होय चांडाळा तूं । १४ ।
हातीं लोटोनियां केला तो परता । आग लाव आतां विठोबासी । १५ ।
ऐकूनियां शब्द सावध तो जाहला । कां गे भंग केला भजनाचा । १६ ।
विठोबासी माझ्या कां गे त्वां गांजिलें । कर्म ओढवलें बाळकाचें । १७ ।
सांग मज ऐसें कोणाचें तें जालें । पुण्य फळा आलें लेंकुराचें । १८ ।
याजसाठीं माझ्या गांजिलेंसे देवा । पाठी लागे तेव्हां मारावया । १९ ।
हात बोट मज लावशील आतां । आण तुज सर्वथा विठोबाची । २० ।
ऐकतांचि ऐसें ठेवियेली काठी । राहिला उगाची गोरा तेव्हां । २१ ।
न करी तो कांहीं तयेसीं भाषण । वर्जियेली तेणें कांता तेचि । २२ ।
विनवीते कांता गोरिया लागुनी । न मोडीं तो आण विठोबाची । २३ ।
जाली तेव्हां श्रमी वंश बुडविला । विठोबा कोपला मजवरी । २४ ।
मनामाजी तिने केला तो विचार । करावें दुसरें लग्न याचें । २५ ।
बोलाविला तिनें आपुला तो पिता । सांगितली वार्ता पाहूं आतां । २६ ।
कनिष्ठ हे कन्या दे माझ्या भ्रतारा । नको या विचारा पाहूं आतां । २७ ।

अवश्य म्हणुनियां विनविला गोरा। लग्नाची हे त्वरा केली तेव्हां। २८।
लग्न झाल्यावरी घाली वोसंगळा। दोघींसही पाळा समानची। २९।
न पाळिनां आण तुम्हा विठोबाची। धरा या शब्दाची आठवण। ३०।
अवश्य म्हणोनियां निघाला तो गोरा। आला असे घरा आपुलिया। ३१।
कनिष्ठ स्त्रियेसी आलें असे न्हाण। न करी भाषण तिसीं कांहीं। ३२।
येरु म्हणे बाई कैसा हा भ्रतार। करूं मी विचार कैसा आतां। ३३।
पहिली ती कांता विनवी गोरियातें। अंगिकारा इतें स्वामी आतां। ३४।
मामानें ही मज घातलीसे आण। दोघींचें पाळण समान करा। ३५।
गेला तरी आतां जावो माझा प्राण। न मोडीं मी आण विठोबाची। ३६।
जाहल्या दोघी श्रमी कपाळ पिटिती। पुरविली पाठी विठोबानें। ३७।
वंश बुडविला ह्या मेल्या काळ्यानें। जळो थोरपण याचें आतां। ३८।
वेडे मेले लोक घेती दरूशन। नसावें भाषण यासीं कांहीं। ३९।
होवोनियां श्रमी बैसल्या घरांत। काढियेली युक्ती कनिष्ठेनें। ४०।
म्हणे बाई आतां मोडूं याची आण। करील भाषण आपणची। ४१।
निजतो हा जेथें तेथें हो जाऊन। करावें शयन दोघींनीं तें। ४२।
निद्रेमाजी उरस्थळीं याचे हात। ठेऊं अवचित आपुलिया। ४३।
मग हा करील सहजचि भाषण। न लगे सांगणें कोणासी तें। ४४।
निद्रेमाजी गोरा जाहला तो निमग्न। दोघींनीं शयन केलें तेथें। ४५।
उचलोनियां कर ठेविले शरीरीं। नाहीं देहावरी गोरा तेथें। ४६।
सावध होवोनि पाहियेलें तेणें। अन्याय हातानें केला माझ्या। ४७।
विठोबाची माझ्या मोडियेली आण। टाकावे तोडून हातचि हे। ४८।
घेऊनियां शस्त्र तोडियेले कर। आनंदला फार गोरा तेव्हां। ४९।
समजलें तेव्हां लोकां त्या सकळां। भक्त हा आगळा देखियेला। ५०।
कैसा बाई आतां करावा विचार। बुडाला संसार सर्वस्व हा। ५१।
आतां शरण जाऊं तया पांडुरंगा। करील तो चिंता आमुचीये। ५२।

सांगूं सर्वमान रुक्मिणीजवळी । विनवीं वनमाळी आम्हांविसीं ।५३।
शरणागतां हरी नेदीच अंतर । वर्णितानी शास्त्रें मोठींमोठीं ।५४।
संत हें गातातो बाई सदोदीत । पाहूं तो अनंत कैसा असे ।५५।
दोघी तेव्हां गेल्या रुक्मिणीजवळी । विनविली बाळी रुक्मिणी ते ।५६।
सांगितला तिसी सकळ वृत्तांत । विनवी हा कांत आम्हाविसीं ।५७।
ऐकेल गे बाई तुझें तो वचन । समजलें पूर्ण आम्हांलागीं ।५८।
करीं माते आम्हा येवढा उपकार । न पडे विसर जन्मोजन्मीं ।५९।
करुनी प्रार्थना आल्या त्या आश्रमा । उभा होता नामा किर्तनासी ।६०।
आवडीनें गोरा करीत श्रवण । आणिक सज्जन हरिभक्त ।६१।
नामयानें टाळी पिटिली गजरें । गोरियासी कर फुटले ते ।६२।
रांगत लेंकरूं आलें तयावेळीं । मातेच्या जवळी आनंदानें ।६३।
आलिंगुनी तिनें धरिलें हृदयीं । झाली विठाबाई कृपावंत ।६४।
आलिंगुनी गोरा बोले मेघःशाम । करीं घराश्रम सुखें आतां ।६५।
संशयाची जात नको धरूं चित्ता । आण तुज आतां माझी असे ।६६।
ऐकोनियां गोरा वर्ते घराश्रमी । लक्ष असे नामीं विठोबाच्या ।६७।
ऐसियां संतांचे आठवितां गुण । जाती हे जळोन सर्व दोष ।६८।
नामदेव त्यासी करी विनवणी । ठाव द्या चरणीं तुमचीया ।६९।
हेंचि तुम्ही आतां मज द्यावें दान । आठवीन गुण वारंवार ।७०।

६२६. आषाढी पर्वणी आला यात्राकाळ । निघाले सकळ वारकरी । १ ।
यांचे समागमें जात असे खुळें । स्मरे वेळोवेळे विठ्ठलासी । २ ।
धन्य पुण्यतिथि आली एकादशी । पावले क्षेत्रासी विश्वजन । ३ ।
स्नानविधि करोनि समस्तां भेटला । किर्तनीं बैसला हरिदास । ४ ।
निवृत्ति ज्ञानदेव सोपान सांवता । नामयाची कथा ऐकताती । ५ ।
तंव तो म्हणे करा नामाचा उच्चार । टाळीचा गजर करुनियां । ६ ।
गोरियाचे नेत्रीं आले जळबिंदु । मज कां गोविंदु विसरला । ७ ।

कां गा केशिराजा मोकलिलें मातें । शरण कोणातें जाऊं आतां। ८ ।
तुजवीण मज न दिसे निर्वाणीं। माय बाप धनी गण गोत। ९ ।
आतां माझी लाज राखें पंढरीनाथा। तुजवीण आतां कोणी नाहीं। १० ।
अनाथाचा नाथ दिनाचा कैवारी। पावला झडकरी आपुल्या दासा। ११ ।
गोरियाचे हात आले तत्क्षणीं । गर्जोनि नामध्वनी उभा ठेला। १२ ।
सकळ संतजनीं देखोनि नयनीं। टाळिया पिटोनि गर्जताती । १३ ।
निधडा म्हणती भक्त हा वैष्णव। अघटीत भाव न कळे याचा। १४ ।
कैसा येणें केला ऋणी पंढरीनाथ। आहे सदोदित याचे उदरीं। १५ ।
पूर्वी तो प्रल्हाद श्रवणीं ऐकिला। किंवा हा देखिला संतांमधीं। १६ ।
नामा येऊनियां चरणासी लागला। हृदयीं आलिंगिला भक्तराज। १७ ।

६२७. माती तुडवितां नाहीं देहस्थिती । आठवीत चित्तीं पांडुरंग । १ ।
गोरोबाची कांता पाणियासी जातां। पुत्राला पाहतां खेळतसे । २ ।
दृष्टी असों द्यावी स्वामी बाळावरी । नाहीं कोणी घरीं सांभाळाया। ३ ।
नामा म्हणे नाहीं गोरा देहावर । सर्वही निर्धार पांडुरंगीं। ४ ।

परंपरप्रमाणें पुष्पवृष्टी करावी. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई, एकनाथ, नामदेव, तुकाराम हे संतभजन करावे. पारंपारिक आरती म्हणावी.

संत चोखामेळा जीवन व समाधि, महाद्वार, श्रीक्षेत्र पंढरपूर

निर्वाण गुरुवार वैशाख वद्य पंचमी, समाधि शुक्रवार वैशाख वद्य त्रयोदशी शके १२६०

६२८. चोखामेळियानें पाजियेलें दही। पडों दिलें नाहीं उणें त्याचें। १ ।
त्याचें चरित्र परिसावें सादर । करितों नमस्कार संतजनां। २ ।
त्याची जे कांता तयाचि सारिखी। भावार्थ नेटकी आवडीची । ३ ।
साधन द्वादशी आली एके काळीं । उठोनि प्रात:काळीं काय बोले। ४ ।
उठीं उठीं कांते स्वयंपाक करीं। आतां येतील हरि पारण्यासी। ५ ।
तंव एक्या ब्राह्मणें आइकिली मात। तेणें दिवाणांत सांगितलें। ६ ।
दिवाणानें दूत पाठविले त्यासी । चोखामेळियासी धरूनि आणा। ७ ।

दूतीं जाऊनियां धरूनी आणिलें । म्हणे काय झालें चोखामेळा । ८
विठोबासी दहीं पाजीत असतां । कांहो माझ्या हाता आंसडीलें । ९
रडतो हा कां रे सभेसी पुसती । तो म्हणे वृत्तांत ऐसा झाला । १०
रुसूनियां विठो गेला म्हणऊनि । रडे दीर्घध्वनी करूनियां । ११
म्हणती या महारानें देव बाटविला । जिवें मारा याला बैल जुंपा । १२
बांधोनियां पाय हांकियलें बैल । धरूनि शिवळ विठो उभा । १३
उडती आसुड बैलांचे पाठी । मारितां हिंपुटीं थोर झाली । १४
तयाची ते कांता उभी राहुनियां । म्हणे देवराया हात काढी । १५
खादलें जेविलें त्याचा हा उपकार । दुबळीचा भ्रतार मारूं पाहसी । १६
पाळिलें पोसिलें माझिया धन्याशीं । उतराई झालासी ओढवण्या । १७
अन्नाची त्वां क्रिया नाहीं रे राखिली । रांडकी त्वां केली चोखियाची । १८
काढीं हात आतां जाय परता उसण्या । जाय पोट पोसण्या येथूनियां । १९
चोखा म्हणे रांडे विश्वाचा पोसणा । संतांचा देखणा विठो माझा । २०
जन लोक पुसती कोणा बोलतीस । ते म्हणे तुम्हांस काय दिसे । २१
अनंत ब्रह्मांडें जयाचे उदरीं । त्यानें चहुंकरीं धरियेलें । २२
पीतांबरधारी घन:शाम मूर्ती । रखुमाईचा पति विठ्ठल हा । २३
समस्तांसी तेव्हां दिलें दरूशन । केलें समाधान नामा म्हणे । २४

## संत चोखोबांचे स्त्रीचें बाळंतपण

६२९. चोखोबाची कांता असे ती गर्भिण । झाले तीस पूर्ण नव मास । १
करूनि विनंति पतीसी बोलत । असावें साहित्य घरामाजी । २
ऐकुनियां चोखा करीत विचार । कोणें ऐसा घोर वागवावा । ३
न पुसतां गेला बहिणीच्या गांवा । आनंदे केशवा आळवीत । ४
दोन प्रहर झाले न येती भोजना । कांता विचारणा करीतसे । ५
शोध करितांना संध्याकाळ झाला । पति माझा गेला कोणीकडे । ६
विरक्तासी मी तों सांगितलें काम । कैसा झाला भ्रम माझे बुद्धि । ७

अहो पांडुरंगा आणा त्यासी आतां । न सांगें मी वार्ता संसाराची ।
झाली तेव्हां श्रमी प्रसूत वेळा आली । विठाई धांवली तेचिवेळां ।
चोखोबाची बहिण झाला सारंगधर । बहिनी उघडा द्वार हांका मारी । १
दोघीही भेटल्या तेव्हां आनंदानें । आलें तें रूदन चोख्याकांतें । १
बरें बाई तुम्हां देवानें धाडिलें । पती माझा गेला कोणीकडे । १
चाणाक्ष बायका तुम्ही अनिवार । अज्ञान भ्रतार तुमचे गांवी । १
म्हणोनियां तुम्ही सांगतां त्या काम । विरक्तासी श्रम वाटतसे । १
दादा माझा मुज्ञ आधींच हें श्रुत । होयाचें तें होत आपणची । १
केली त्वां सूचना आला माझ्या घरा । त्यानें केली त्वरा मजलागीं । १
सर्वहि साहित्य दिलें म्हणे आतां । नको करूं चिंता बहिनी कांहीं । १
सर्वहि साहित्य होतें तिजपाशीं । रिद्धीसिद्धि दासी तयाचिया । १
प्रसूत ते झाली पुत्र झाला तिला । आनंद वाटला पांडुरंगा । १
वांटिली शर्करा सर्वत्र यातीसी । माझ्या चोखोबासी पुत्र झाला । २
लावुनि उटणें न्हाणियेलें तिला । श्रम तिचा गेला सर्वांगाचा । २
पांचवीही केली तिनें आनंदानें । घातलें भोजन यातीलागीं । २
तेरावे दिवशीं बाळ ते पाळणां । घालितसे राणा वैकुंठींचा । २
साडी आणि चोळी आंगडें टोपडें । आणियलें कोणें रखुमाईनें । २
बोलावुनि सुवासिनी पाळणां घातलें । नाम तें ठेविलें कर्ममेळा । २
बारसेंहि केलें तिनें आनंदानें । घातलें भोजन सर्व याती । २
चोखोबासी मास झाला बहिणी घरीं । विचारी अंतरीं चोखा तेव्हां । २
सोडोनियां आलों प्रपंचाचे भयें । अंतरले पाय देवाजीचे । २
सद्गदित झालें तयाचें अंतर । प्रेम अश्रुनीर वाहे डोळां । २
येतों बाई आतां कृपा असों द्यावी । सांगोन पाठवीं आपुल्या हातें । ३
आतां जातें वहिनी आपुल्या गांवाला । रागें भरतील मला धनी माझे । ३
ऐकूनियां बोले चोखोबाची कांता । नका जाऊं आतां बाई तुम्ही । ३

येऊं द्या घरधनी करतील बोळवण। काय मी उत्तीर्ण होऊं आता। ३३
काय काय आठवूं तुमचे उपकार। न पडे विसर जन्मोजन्मी। ३४
दादा माझा असे पांडुरंग भक्त। सदा त्याचें चित्त देवावरी। ३५
मान्य करीं वहिनी तयाचें वचन। तेणेंचि कल्याण असे तुमचें। ३६
सद्‌गदित झालें दोघींचें अंतर। प्रेम अश्रुनीर वाहे डोळां। ३७
सांभाळीं हा आतां माझा कर्ममेळा। येईल चोखामेळा घरीं आतां। ३८
थांबा बाई आतां शिवतें मी चोळी। न लगे वनमाळी बोलतसे। ३९
पुसोनि सर्वांसी गेला तो सांवळा। आला चोखामेळा घरालागीं। ४०
येवोनियां कांता वंदीत चरण। दिलें उचलोन बाळ हातीं। ४१
बाई आतां गेल्या भेटल्या वाटेसी। खंती या जिवासी वाटे त्याची। ४२
सांगितला त्यासी सकळ वृत्तांत। सद्‌गदित चित्त चोखा झाला। ४३
कैंची बाई येथें आले पांडुरंग। धन्य तुझें भाग्य भेटी झाली। ४४
सद्‌गदित झालें दोघांचें अंतर। प्रेम अश्रुनीर वाहे डोळां। ४५
भक्तांसी संकट पडों नेदी देव। घालीतसे धांव त्यांच्या काजा। ४६
विष्णुदास नामा वंदी त्याचे चरण। वर्णितसे गुण वारंवार। ४७

## संत चोखामेळा समाधीचे अभंग

६३०. मंगळवेढ्याभोंवतें कुसूं घालावया। महारासी न्यावया दूत आले। १
महारासमागमें चोखामेळा गेला। काम तें लागला करावया। २
सर्वकाळ वाचे विठ्ठलनाम छंद। आठवी गोविंद वेळोवेळां। ३
चार महिने याचि रितीनें लोटिले। कुसूं कडाडिलें अकस्मात्। ४
तयाखालीं महार बहु चूर झाले। चोख्यानें अर्पिले प्राण देवा। ५
देव म्हणे नामया त्वां जावें तेथें। त्याच्या अस्थि येथें घेऊनि याव्या। ६
नामा म्हणे देवा कैशा ओळखाव्या। विठ्ठलनाम जयामध्यें निघे। ७

६३१. ऐकोनिया कानीं अंचळीं भगव्या । आणोनियां द्याव्या आम्हापाशीं ।
शालिवाहन शके बाराशें साठ । प्रमाथी नाम स्पष्ट संवत्सर ।
वैशाख वद्य पंचमी सुदिन । गुरुवारी प्रयाण करी चोखा ।
चोखा माझा जीव चोखा माझा भाव । कुळ धर्म देव चोखा माझा ।
काय त्याची भक्ति काय त्याची शक्ति । मीहि आलों व्यक्ति तयासाठीं ।
माझ्या चोखियाचे करिती जे ध्यान । तया कधीं विघ्न पडों नेदीं ।
नामदेवें अस्थि आणिल्या पारखोनी । घेत चक्रपाणि पीतांबरी ।

६३२. देवाचे अंचळीं उठिला गजर । विठ्ठलनामें अंबर गर्जतसे ।
संत समुदाय पताकांचे भार । लोटले गजर ऐकावया ।
वद्य त्रयोदशी वैशाख शुक्रवार । नामाचा गजर महाद्वारीं ।
ऐसी आनंदानें नामाच्या गजरीं । दिली महाद्वारीं समाधि त्या ।

वरिल कडवे म्हणून पुष्पवृष्टी करावी.
निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई, एकनाथ, नामदेव, तुकाराम हे संतभ करावे. पारंपारिक आरती म्हणावी.

अस्थी निक्षेपण आपुलीया हातें । करूनि अनंतें पाषाण ठेवी ।
राही रखुमाई कुर्वंडी करिती । सत्यभामा आरती ओंवाळीत ।
नामा म्हणे धन्य विठोबाची कृपा । जाईन माझ्या बापा ओंवाळून ।

## संत जनाबाई जीवन

६३३. नामयाचे घरीं असे दासी जनी । तिनें चक्रपाणि वश केला ।
करितां कामधंदा ध्यानीं नारायण । करीत चिंतन अहोरात्र ।
देखोनियां भाव तिचा पांडुरंग । काम करूं लागे जनीलागीं ।
रात्रीं येऊनियां जनीचिया घरीं । दळूं लागे हरी तिजलागीं ।
दळितां काढिली माळ वैजयंती । ठेविली परती शालजोडी ।
जनीचें आवडे देवाजीस गाणें । झालासे तल्लिन पांडुरंग ।

प्रात:काळ झाला तेव्हां त्या समयासी । जात हृषिकेशी तांतडीनें ।
घेऊनियां गेले जनीची वाकळ । विसरले माळ शालजोडी ।
तेव्हां पुजाऱ्यानें उघडिलें द्वार । पाहिला तो वर रुक्मिणीचा ।
देवाच्या अंगावर देखिली वाकळ । नाहीं गळां माळ शालजोडी ।
एकमेकां तेव्हां पुसती पुजारी । कोणें केली चोरी देवाजीची ।
शोध करितांना जनीची वाकळ । आले ते सकळ तिच्या घरीं ।
शालजोडी माळ होती तिचे घरीं । दाविती पुजारी सर्वांलागीं ।
बांधियेली तेव्हां त्यांनीं दासी जनी । नामया लागुनी श्रुत केलें ।
नामा म्हणे जने कांगे केली चोरी । बोलतसे खरें जनी त्यासी ।
रात्रीं माझ्या घरा आले पांडुरंग । दळितां श्रीरंगा घाम आला ।
काढियेली माळ तेव्हां शालजोडी । गातसे आवडी मजसवें ।
प्रात:काळीं देव गेले ते उठोनि । न कळे करणी कैसी केली ।
बापा मी सांगतें हेंचि हो प्रमाण । पुसावें जाऊन पांडुरंगा ।
नामा म्हणे तुम्हां कळेल तैसें करा । नका या विचारा पुसों मज ।
नामा म्हणे जने केलें असें कर्म । जाणे एक वर्म पांडुरंग ।
धमकावुनी नेली त्यांनी दासी जनी । सकळ ब्राह्मणीं मिळोनियां ।
श्रुत केली वार्ता गांवींच्या राजाला । तो म्हणे जनीला शुळीं द्यावें ।
शूळ तो रोंविला चंद्रभागेतीरीं । पाहती नरनारी दृष्टी तेव्हां ।
जनी आठवीत तेव्हां पांडुरंगा । कां गा तूं श्रीरंगा मोकलिसी ।
घडी घडी येत होतासी तूं देवा । आज कां केशवा निद्रा आली ।
कोठें गुंतलासी भक्तिचिया काजा । धांवें महाराजा येईं आतां ।
प्रल्हादाकारणें नृसिंह झालासी । स्तंभीं प्रकटसी क्षणमात्रें ।
दीनांचा दयाळु तुझें नांव बापा । कां हो अवकृपा केली मज ।
द्रौपदीनें केला जेव्हां तुझा धांवा । आलासी केशवा क्षणामाजी ।
माझा तुज देवा आला हो कंटाळा । आळ हा घातला मजवरी ।

समजलें मज होतें तुझे मनीं। नसावी हे जनी पांडुरंगा
करितां कामधंदा तुज आला शीण। कंटाळलें मन देवा तुझे
कासयासी बोल ठेवूं तुज देवा। प्रारब्धाचा ठेवा फळा आल
आतां ऐक माझी हेंचि विनवणी। भेट चक्रपाणि एक वेळां
न मागें मी कांहीं देवा तुज आतां। पायां पै अनंता ठाव देईं
ऐकुनियां ऐसी जनीची विनवणी। आले चक्रपाणि धांवोनियां
जनीच्या सांगातें होते राजदूत। नेलीसे त्वरित शुळापाशीं
जनीनें तो शूळ पाहातां नयनीं। अकस्मात् पाणी झालें त्याचें
शस्त्रें जीं कां होतीं राजदूतां करीं। विरालीं तीं सारी पाणी झालें
विठोबानें तेव्हां आलिंगिली जनी। म्हणे माय बहिणी श्रमलीसी
जनी म्हणे देवा तूं पाठीसी असतां। नाहीं भय चिंता आम्हांलागीं
श्रुत झाली वार्ता राजया लागोनि। शूळासुद्धां पाणी शस्त्रें झालीं
समजलें तेव्हां तयाचे अंतरीं। जनीला श्रीहरी सांभाळितो
चला जाऊं आतां जनीच्या दर्शना। सिद्ध झाली सेना पाय चाली
क्षमा करीं माते आमुचे अन्याय। कृपा दृष्टी पाहें आम्हांकडे
देऊनियां वस्त्रें भूषणें जनीसी। गेला आश्रमासी राजा तेव्हां
समजलें तेव्हां पंढरीच्या लोकां। जनीचा हा सखा पांडुरंग
जनीचे अभंग लिहीत नारायण। करिती श्रवण साधुसंत
धन्य तेचि जनी धन्य तिची भक्ति। नामदेव स्तुति करीतसे

६३४. सोयरिक सांडिली सर्वांची। जोडी केली विठ्ठलाची
लोभ सांडिला सर्वांचा। संग धरिला विठोबाचा
जालों निधडा नि:शंक। गायनाचें कौतुक
प्रेमभरित सर्वदा। मुखीं नाम हरि गोविंदा
ऐसा सर्वकाळ गाय। भावें विठोबाचे पाय
नामा म्हणे ऐकें हरी। दासी जनीची वाट करी

संत सांवता माळी समाधी, श्रीक्षेत्र अरण, जि. सोलापूर
आषाढ वद्य चतुर्दशी

६३५. धन्य तें अरण रत्नाची खाण। जन्मला निधान सांवता तो । १ ।
सांवता सागर प्रेमाचा आगर । घेतला अवतार माळ्या घरीं। २ ।
धन्य त्याची माता धन्य त्याचा पिता। सांठविला दाता त्रैलोक्याचा। ३ ।
नामा म्हणे त्याचा जन्म सुफळ झाला । वंश उद्धरिला माळियाचा। ४ ।

वरिल कडवे म्हणून पुष्पवृष्टी करावी. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई, एकनाथ, नामदेव, तुकाराम हे भजन करावे. पारंपारीक आरती म्हणावी.

## संत राका कुंभार जीवन

६३६. कुंभार तो राका कांता त्याची बंका। कन्या नाम वंका तिघे जण। १ ।
पंढरीक्षेत्रांत राहतां आनंदें। वाचे गोविंद आळविती। २ ।
करिती आपुला स्वकर्म व्यवहार। वाचे निरंतर रामनाम। ३ ।
घडोनि भाजणें ठेविली घरांत। व्याली डेरियांत मांजर ते। ४ ।
न देखितां त्यानें आवा तो रचिला। अग्नि तो लाविला तेचि वेळां। ५ ।
फिरूनि मांजर घरासि ते आली। नाहीत तीं पिल्लीं डेरा तोही। ६ ।
आव्यापाशीं तेव्हां आली ती धांवत। आरडत फिरत भोवताली। ७ ।
पाहुनि राका समजला मनीं । आहा चक्रपाणि काय केलें। ८ ।
जळो जळो माझा प्रपंच व्यवहार। नाही म्यां विचार केला देवा। ९ ।
करावया गेलों प्रपंचाचें हित। पापाचे पर्वत झाले माथां।१०।
अज्ञान ही बाळे जळतील आतां। धांव पंढरीनाथा येचि वेळां।११।
पांडव ते रक्षिले लाक्षातें जोहरी। तैसी करी परि पिल्लियांसी।१२।
आगीमाजी तुवां प्रल्हाद रक्षिला। अगाध हें तुला काय झालें।१३।
रक्षीं यासी आतां येऊनियां अंगें। घेईन वैराग्य नवस हाचि।१४।
तिघांजणीं तेव्हां त्यजिलें अन्नपाणी। धांव चक्रपाणि लवलाहीं।१५।
तीन रोज झाले शांत झाला अग्नि। पाहाती उकलूनि आवा तेव्हां।१६।

सर्वस्व भाजणें भाजुनियां गेलीं । खेळताती पिल्लीं डेरियांत । १७ ।
कच्चा असे डेरा नसे आंच त्याला । नवसास पावला पांडुरंग । १८ ।
पाहती सकळ पंढरीचे लोक । अगाध कवतुक देवाजीचें । १९ ।
आनंदोनी राका बोलवी ब्राह्मण । दिलें तें लुटून घर तेव्हां । २० ।
वेंचुनियां चिंध्या लाविती ढुंगासी । भावें हृषिकेशी आळविती । २१ ।
जाऊनियां वनीं वेंचिताती काष्ठें । उदरापुरतें विकिताती । २२ ।
अखंड करिती नामाचा गजर । ध्यानीं मनीं वर रखुमाईचा । २३ ।
बंका बोले बाई चंद्रभागे स्नाना । नामयाचि कन्या धुवा आली । २४ ।
बंका बोले बाई सितोडे येतील । ऐकुनियां बोले येरी तिसी । २५ ।
जातीची कुंभार कामीक वैराग्य । घेतलेंसे सोंग कासियासी । २६ ।
ऐकूनियां बंका करीत उत्तर । बौद्ध अवतार पांडुरंग । २७ ।
रडका हा नामा घेतलीसे आळी । त्यानें वनमाळी बोलविला । २८ ।
अबोल हा देव बोलविला यानें । काय थोरपण आलें यासी । २९ ।
वाढविली किर्ति जगांत डांगोरा । बोलविला खरा पांडुरंग । ३० ।
चंद्रभागे तीरीं झाला वृत्तांत । श्रुत झाली मात नामयासी । ३१ ।
नामदेव तेव्हां आले राउळासी । विनंति देवासी करूनी बोले । ३२ ।
राका कुंभारानें घेतलेंसे वैराग्य । कांहो केला त्याग संसारींचा । ३३ ।
बोले पांडुरंग निष्काम हे भक्ती । दावितों प्रचिती तुजलागीं । ३४ ।
विठ्ठल रखुमाई नामा असे संगें । आली तेव्हां तिघें वनाप्रती । ३५ ।
रुक्मिणीनें तेव्हां काढुनी कंकण । ठेविलें झांकून काष्ठामाजी । ३६ ।
राका बंका बंका वेंचिताती काष्ठ । आली अवचित तया ठायां । ३७ ।
उचलितां काष्ठ देखिलें कंकण । दिलें तें ढाकून तेचि वेळां । ३८ ।
म्हणती याजलागीं विटाळ जाहला । न घेती तयाला म्हणोनियां । ३९ ।
पाहुनी रुक्मिणी विस्मय करीत । निष्काम हे भक्त देखियेले । ४० ।
बोले रखुमाबाई अहो पांडुरंगा । भेटावें श्रीरंगा याजलागीं । ४१ ।

नामा म्हणे देवा वंदितों मी चरण। धरा आलिंगून तिघांजणा।४२।
होती हे आवडी देवाजीचे चित्तीं। आलिंगिलीं प्रीतीं तिघेजण।४३।
राका बंका वंका वंदिती चरण। कांहो येणें केलें देवराया।४४।
उष्णकाळ दिन श्रमली माझी आई। बैसा रखुमाबाई छायेखालीं।४५।
ऐसी असे ज्याची देवावरी माया। करी त्यासी दया पांडुरंग।४६।
नामदेव बोले त्याचा मी हा दास। शरण तयास वारंवार।४७।

संत जगमित्र नागा जीवन, श्रीक्षेत्र परळी, जि. बीड

समाधी कार्तिक शुद्ध एकादशी

६३७. परळी वैजनाथीं जगमित्र नागा। ध्यानीं पांडुरंगा आठवीत।१।
सर्वांभूतीं त्यासी दिसे वासुदेव। नाहीं दुजाभाव त्याचे मनीं।२।
निंद्य आणि वंद्य लेखितो सारिखे। पाहे ब्रह्मरूप सर्वत्रांसी।३।
रात्रंदिवस करी हरीचें भजन। सुखें आनंदानें राहतसे।४।
सज्जन हे त्यासी बहुत मानिती। दुर्जन द्वेषिती त्याजलागीं।५।
परि त्याचे चित्तीं वाटेना हें दुःख। मानी प्रेमसुख आनंदानें।६।
दुर्जनांनी त्याच्या घरासी तो अग्नि। लाविला येऊनि रात्रीमध्यें।७।
अग्नि मोठा तेव्हां प्रदिप्त तो झाला। वृत्तांत कळला सज्जनांसी।८।
धांवुनी ते आले पाहती नयनीं। कांहो चक्रपाणि ऐसें केलें।९।
तुजवीण कोण राखे यासी आतां। धांव तूं अनंता येचि वेळां।१०।
पांडव राखिले लक्षांतून जोहरी। तैसी करीं परी नागयासी।११।
येथें नाहीं देवा कोणाचा उपाय। घालीं आतां धाय पांडुरंगा।१२।
प्रल्हाद रक्षिला अग्नि तो माझारी। तैसी करीं परी त्यासी आतां।१३।
ब्रीद हें सांभाळीं आपुलें अनंता। राखीं आतां भक्तां आपुलिया।१४।
ऐकोनियां स्तुति आले नारायण। शांत झाला अग्नि तेचि वेळां।१५।
स्वस्थ असे नागा आनंदानें सुखें। पाहती सर्वलोक परळीचे।१६।
सज्जन संतोष अंतरीं मानिती। धांवण्या श्रीपति धांविन्नला।१७।
दुर्जनांचीं तेव्हां तोंडें जाहलीं काळीं। साह्य वनमाळी भक्तालागीं।१८।

चाहुर एक भूमी इनाम त्या दिली। पत्रिका लिहिली त्याच्या नांवें। १९।
ग्रामवासी त्यासी पिकवुनी धान्य। देती तें नेऊन नाग्या घरीं। २०।
वारसीक नेम चालविती लोक। आला नवा एक अंमलदार। २१।
करोनि पाहणी मागतसे सारा। नायके विचारा कोणाचिया। २२।
तयासी उत्तर करिती ग्रामवासी। नवसिलें देवासी सर्वत्रांनीं। २३।
जगमित्र नागा हरिचा तो भक्त। सांगती वृतांत त्याजलागीं। २४।
याचे मनीं नाहीं कांहीं दुजा भाव। सर्वांभूतीं देव पाहतसे। २५।
कृपावंत असे यासी चक्रपाणि। नका तुम्ही मनीं आणूं दुजें। २६।
मनामाजी त्याने केला तो विचार। पाहूं चमत्कार याचा आतां। २७।
जगमित्र नागा त्यानें बोलाविला। बोलता त्या झाला सुभेदार। २८।
आमुचिया घरीं मुलीचें तें लग्न। व्याघ्राचें कारण असे आम्हां। २९।
घेऊनियां आतां यावा तुम्ही व्याघ्र। म्हणवितां जगमित्र पाहूं कैसें। ३०।
व्याघ्ररूप असे माझा नारायण। येतों मी घेउनी आतांची हो। ३१।
आनंदानें नागा निघाला तेथुनी। आला असे वनीं अरण्यांत। ३२।
धांवुनियां तेथें आले पांडुरंग। पुसतसे अंगें त्याजलागीं। ३३।
कोठें जासी बापा घोर अरण्यांत। भय असे तेथें श्वापदांचें। ३४।
मारतील तुज फिर तूं माघारी। येरू म्हणे हरि रक्षीं आम्हां। ३५।
सुभेदार माझा असे परम मित्र। पाहिजे हा व्याघ्र त्याजलागीं। ३६।
येरू म्हणे सुभेदार आहे नष्ट। काय त्याची गोष्ट ऐकसी तूं। ३७।
तया चांडाळासी वधितों मी आतां। झाला तो बोलतां जगन्मित्रा। ३८।
तूंचि हा चांडाळ बोलसी या गोष्टी। नको करूं कष्टी मित्र माझा। ३९।
जाय तूं वाटेनें आपुल्या या आतां। होतसे बोलतां उशीर मज। ४०।
व्याघ्र तेचि वेळां जाहले नारायण। धरी आलिंगुनी नागा त्यासी। ४१।
गळां त्याचे तेव्हां बांधिलें अंगवस्त्र। घेऊनियां व्याघ्र आला नागा। ४२।
भयाभीत झाले तेव्हां ग्रामवासी। लावियेल्या वेसी गांवीचिया। ४३।

ग्रामवासी यांनीं लावियेलें द्वार। करी सुभेदार विचार तेव्हां। ४४।
करीत गर्जना भयानक व्याघ्र। कांपती थरथर सकळ लोक। ४५।
जगमित्र नागा आला वेसीपाशीं। उघडा द्वारासी हांका मारी। ४६।
ऐकोनियां कोणी न देती उत्तर। मोडियेलें द्वार व्याघ्रानें तें। ४७।
प्रवेशला नागा सुभेदार घरीं। हांका त्यासी मारी यावें आतां। ४८।
करा कार्य सिद्धि घेऊनियां व्याघ्र। हांका वारंवार मारीतसे। ४९।
द्वारपाळ त्याचे नुघडिती द्वार। मोडोनिया व्याघ्र शिरे आंत। ५०।
करीत गर्जना आपटूनि पुच्छ। जाहले भयाभीत सकळ लोक। ५१।
सुभेदार होते जया मंदिरांत। व्याघ्र नागा आंत गेले दोघे। ५२।
सुभेदार बोले द्वाराचे आंतून। देई जीवदान मज आतां। ५३।
पतीत मी पापी तुझा शरणागत। होई कृपावंत जगमित्रा। ५४।
कर जोडोनियां करितों विनंती। अज्ञानाची भ्रांति झाली मज। ५५।
वारंवार तुज घेतों लोटांगणीं। देई बा सोडोनी वनीं व्याघ्र। ५६।
कृपावंत साधु वर्णिताती वेद। करीं अपराध क्षमा माझा। ५७।
ऐकोनियां व्याघ्र गर्जना करीत। भक्षावया धांवत त्याजलागीं। ५८।
जगमित्र नागा अवरीत त्यासी। चाल तूं वनासी मायबापा। ५९।
घेऊनियां व्याघ्र चालिला जगमित्र। पाहती सर्वत्र लोक तेव्हां। ६०।
भक्तांनीं जिंकिला भाव बळें देव। घालीतसे धांव संकटीं तो। ६१।
संतांचा महिमा न वर्णवे कांहीं। जाहला लीन पायीं नामदेव। ६२।

संत नरहरी सोनार, समाधी महाद्वार मार्ग,

श्रीक्षेत्र पंढरपूर माघ वद्य तृतीया

६३८. हा हा: कार झाला मानवा दानवी। ऋषि वृंदी पाही देवादिकी। १।
नरहरी बैसला हरि कटि स्थानीं। पाहती लोचनी संत मेळे। २।
खुणा खुण व्यक्ति खुणाचे ते अव्यक्त। संत ते भाषिक एकसरा। ३।
नामा म्हणे तेव्हां होतों मी जवळी। नरहरी वनमाळी एक झाला। ४।

६३९. देवाचें समोर नरहरी सोनार। हृदयी निरंतर हरिहर। १
पार्थीव संवत्सरें बारामे सात। उगवला दिवस सोमवार। २
नरहरी दोन प्रहरी देवाचें कटीशी। माघ वद्य तृतीयेसी बैसलासे। ३
नामदेव म्हणे नरहरी महाद्वारी। नामाचे गजरी गुप्त झाला। ४

वरील कडवे म्हणून पुष्पवृष्टी करावी. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई, एकनाथ, नामदेव, तुकाराम हे संतभजन करावे. पारंपारीक आरती म्हणावी.

६४०. संत समागमें चाले दळभारु। आशा तृष्णा दंशधडी अहंकारु। १
दुम दुम दुम दुम भेरी वाजे। आले अयोध्येसी श्रीरघुनाथ राजे। २
भक्तभद्रजाती दोही बाहीं चालत। विष्णुदास नामा कीर्ति वाखाणित। ३

६४१. पैल आला रामराणा। लंका दिधली विभीषणा। १
नळनीळ जांबुवंत। मध्यें चाले रघुनाथ। २
मागें वानराचे थाट। पुढें गर्जताती भाट। ३
केला अयोध्या प्रवेश। म्हणे नामा विष्णुदास। ४

## गुढीपाडवा अभंग

६४२. आनंदु वो माये नगरी उत्साओ। आजि येईल रामरावो।।
मोतिया तांदुळ कांडिती बाळा। गाती वेळोवेळा रामचंद्र।।
अजिंक्य जिंकोनि आले कौसल्यानंदन। धन्य आजि दिन सोनियाचा।।
कनक दंड चवऱ्या ढळताती रामा। विष्णुदास नामा गुढीयेसी।।

गुढी उभारून पूजन करून हा अभंग व युगे अठ्ठावीस आरती म्हणावी.

## श्री मत्स्य जयंती, चैत्रशुद्ध तृतीया

६४३. मीनरूप झाला प्रथम तो हरी। ज्याचा चराचरी वास होता। १
मार्कंडेयालागी दाखविली माया। वटपत्री तया रूपासी हो। २
बाळमुकुंदानें स्वरूप दाविता। श्वासोच्छ्वास घेता चौदाकल्प। ३
पाहोनिया माया अंतरी निमाला। घाबरा तो झाला ऋषिराज। ४
आश्वासून तया दाखविली माया। धन्य देवराया नामा म्हणे। ५

'युगे अठ्ठावीस' व 'जन्मला पांडुरंग' आरती म्हणून उपसंहार करावा.

## मर्यादा पुरुषोत्तम प्रभु श्री रामचंद्रांचा जन्मकाळ

चैत्र शुद्ध नवमी, माध्यान्ही, खालील अभंग म्हणावे.

६४४. देवांगना हाती आणविला शृंगी। यज्ञ तो प्रसंगी आरंभिला। १ ।
विभांडिका क्रोध आला असे भारी। अयोध्ये भीतरी वेगी आला। २ ।
राजा दशरथ सामोरा जाऊनी। अति प्रिती करूनी सभे नेला। ३ ।
पुत्र स्नुषा दोन्ही देखता नयनी। आनंदला मनी नामा म्हणे। ४ ।

६४५. आनंदानी म्हणे राया धन्य केले। इच्छिले सोहळे पुरवीन। १ ।
यज्ञाचा आरंभ करी लवलाह्या। पुसोनी आचार्या वसिष्ठासी। २ ।
सर्व ऋषिजन मिळाले सकळ। मंत्राचा कल्लोळ करिताती। ३ ।
नामा म्हणे शृंगी मुख्यत्वे शोभला। यज्ञ आरंभिला तेव्हा तेणे। ४ ।

६४६. आरंभिला यज्ञ संतोष सर्वत्र। आनंदे नगर दुमदुमीत। १ ।
यज्ञ नारायण संतोष पावला। प्रत्यक्ष तो आला कुंडातुनी। २ ।
पायस ते पात्र घेऊनिया करी। शृंगीस झडकरी बोलतसे। ३ ।
विलंब करीता विघ्न वोढवेल। सत्वर वहिला भाग करा। ४ ।
नामा म्हणे देव येईल पोटासी। ऐसे गुज त्यासी अग्नी सांगे। ५ ।

६४७. कुळगुरू वसिष्ट सांगे नृपवरा। असती गरोदरा तुझ्या कांता। १ ।
धर्मशास्त्र ऐसें डोहळे पुसावे। त्यांचे पुरवावे मनोरथ। २ ।
ऐकोनियां ऐसें आनंद मानसीं। कैकयी सदनासी जाता झाला। ३ ।
मंचकीं बैसली होती ते पापिणी। देखतां नयनीं पहूडली। ४ ।
सुंदरपणाचा अभिमान मनीं। त्यावरी गर्भिणी नामा म्हणे। ५ ।

६४८. राया म्हणे इच्छा तुझिये मानसीं। डोहळे मजसीं सांग आतां। १ ।
वैरी म्हणे ऐसें वाटतसे जीवा। कनिष्टासी द्यावा राज्यपट। २ ।
ज्येष्ठासी धाडावें दुरी दिगंतरा। नये समाचार त्याचा आम्हां। ३ ।
जनांत हें निंद्य वेदबाह्य कर्म। करितां अधर्म पाप वहू। ४ ।

माझियें मस्तकीं ठेवावा हा दोष । तुम्हांकडे लेश नाहीं नाहीं । ५ ।
निंदितील जन मज वाटे सुख । ऐकतांची दुःख राया झालें । ६ ।
वृश्चिकाचे पेंवी तक्षक पडत । घालितातीं घृत अग्निमुखीं । ७ ।
ऐशी व्यथा होय नामा म्हणे त्यासी । उठिला त्वरेंसी तेथूनियां । ८ ।

६४९. येतसे दशरथ सुमित्रामंदिरीं । देखतां सामोरी येती झाली । १ ।
न माये आनंद तियेचे मानसीं । ठेवी मस्तकासी चरणांवरी । २ ।
घालोनि आसन प्रक्षाळी चरण । सर्वांगीं लेपन तीर्थोदकें । ३ ।
गंध धूप दीप पुष्पांचिया माळा । अर्पूनी तांबुला उभी राहे । ४ ।
कैकयीचें दुःख विसरला राव । पाहोनियां भाव सुमित्रेचा । ५ ।
होती जे डोहळे तुझिये मानसीं । सांग मजपाशीं पतिव्रते । ६ ।
प्राणनाथा ऐसें वाटतसें जीवा । वडिलांची सेवा अहर्निशीं । ७ ।
आवडे हें ऐक नावडे आणिक । द्यावें मज एक हेंचि आतां । ८ ।
ऐकतांचि ऐसें कांतेचें वचन । आनंदें निमग्न मन होय । ९ ।
घेऊनियां हातीं रत्नाचें भूषण । टाकी ओंवाळून नामा म्हणे । १० ।

६५०. दशरथ राजा उठिला तेथुनी । कौसल्ये सदनीं जातां झाला । १ ।
पाहातसे दृष्टी तेव्हां श्रावणारी । न माये अंतरीं तेज तिचे । २ ।
तुझिये मानसीं होती जे डोहळे । सांग वो वेल्हाळे मजपाशीं । ३ ।
उदरांत असे भक्तांचा कैवारी । तेथें कैंची उरी देहभावा । ४ ।
सदा समाधिस्थ रामरूप झाली । कौसल्या माउली नामा म्हणे । ५ ।

६५१. न बोलेची कांहीं इसी काय झालें । भूतें झाडपिलें निश्चयेंसी । १ ।
माझिये अदृष्टीं नाहीं हा नंदन । म्हणोनियां विघ्न ओढवलें । २ ।
निवारीं हें दुःख वैकुंठनायका । रक्षीं या बाळका सुदर्शनें । ३ ।
तुझा मी किंकर आजी अंबुजाक्षा । द्यावी मज भिक्षा हेंचि आतां । ४ ।
नामाचा उच्चार ऐकतांचि कानीं । नेत्र उघडोनि पाहती झाली । ५ ।

राजा म्हणे कांहो ऐसी हे अवस्था । कांहो भ्रम चित्ता झाला असे । ६ ।
विश्वाचा मी आत्मा स्वयें असें राम । मजमाजी भ्रम कैंचा असे । ७ ।
अवतार महिमा वाणी वेद माझा । सुरवरांच्या काजा नामा म्हणे । ८ ।

६५२. रावणें हें केलें लग्नामाजी विघ्न । असे कीं स्मरण तुजलागीं । १ ।
आणी रें धनुष्य मारीन रावणा । लंका बिभिषणा देईन मी । २ ।
अंगद सुग्रीव जांबुवंत वीरा । हनुमंत पाचारा लवकरी । ३ ।
टाकोनि पर्वत बुजवारे सागरा । पायवाट करा जावयासी । ४ ।
लंके पुढें मोठें माजवीण रण । तोडीन बंधन सुरवरांचें । ५ ।
विश्वामित्र याग नेईन मी सिद्धी । मारीन कुबुद्धि दोघांजणां । ६ ।
खर दूषणांचा घेईन मी प्राण । धनुष्य मोडीन भुजाबळें । ७ ।
ध्याती मज त्याची बहुत आवडी । न विसंबें घडी त्यासी एक । ८ ।
बोलिला वाल्मिक तैसेंचि करीन । वर्तोनि दावीन नामा म्हणे । ९ ।

६५३. परब्रह्म पूर्ण आलें माझे घरीं । न कळे अंतरीं नृपाचिया । १ ।
करी ती बडबड होती भूत चेष्टा । पाचारा वसिष्ठा लवकरी । २ ।
येऊनि वसिष्ठ पाहे कौसल्येसी । नावरती तयासी अष्टभाव । ३ ।
राजा म्हणे कैसें विपरीत झालें । वसिष्ठा झडपिलें महाभूतें । ४ ।
श्रावणवधाचें अघ नाहीं जळालें । दुजें हें निर्मिलें प्रारब्धासी । ५ ।
ऐकतांचि हांसे सावध होऊनि । बोलतसे झणीं नामा म्हणे । ६ ।

६५४. विरंचीचा बाप क्षीरसागरवासी । ध्याती योगी त्यासी निरंतर । १ ।
परेहूनिपर वैखरीहूनि दुरी । कौसल्येचे उदरीं तोचि असे । २ ।
बोलियेलें जें जें नव्हे असत्य वाणी । न येऊं दे मनीं शंका कांहीं । ३ ।
माझें हें संचित धन्य धन्य आतां । पाहीन मी कांता लक्षुमीच्या । ४ ।
धन्य धन्य धन्य अयोध्येचे लोक । वैकुंठनायक पाहातील । ५ ।
धन्य पशुपक्षी श्वापदें तरुवर । राजा रघुवीर पाहातील । ६ ।
त्रैलोक्यांत धन्य तूंचि एक नृपा । नामयाच्या बापा पाहशील । ७ ।

६५५. उत्तम हा चैत्रमास। ऋतु वसंताचा दिवस। १
शुक्लपक्ष ही नवमी। उभे सुरवर ते व्योमीं। २
माध्यान्हासी दिनकर। पळभरी होय स्थीर। ३
सुशोभित दाही दिशा। आनंद नरनारी शेषा। ४
नाहीं कौसल्येसी भान। गर्भी आलें नारायण। ५
अयोनीं संभव। प्रगटला हा राघव। ६
नामा म्हणे डोळां। पाहीन भुवनत्रयपाळा। ७

६ वें कडवें म्हणून पुष्पवृष्टी करावी. राम राम राम राम सीताराम सीताराम भज करावें. सुंठवड्याचा नैवेद्य द्यावा व वाटावा. पारंपारिक किंवा 'युगे अठ्ठावीस' व 'जन्मला पांडुरंग' आरत्या म्हणाव्यात व उपसंहार करावा.

६५६. सुवर्णाचा शोभे मस्तकीं मुगुट। हिरे घनदाट तयावरी। १
विस्तीर्ण कपाळ व्यंकटा भृकुटीं। टिळक ल्लाटीं केशराचा। २
कमळाकार नेत्र आकर्ण शोभती। कुंडलें झळकती कर्णी ज्याच्या। ३
सरळ नासिक लावण्य मुखचंद्र। हनुवटी सुंदर राघवाची। ४
कंठाचा आकार कंबुग्रीवा ऐसा। हृदयावरी ठसा द्वीजपद। ५
सुकुमार सुरेख जयाचें उदर। ब्रह्मांडें अपार वसती जेथें। ६
नाभीकमळींचा ब्रह्मा नेणे अंत। कडदोरा शोभत कटीं ज्याच्या। ७
दंडीं पेट्या करीं जडित मुद्रिका। पिवळा नेटका पीतांबर। ८
केशराची उटी सरळ बाहुदंड। चिमणा कोदंड हातीं ज्याच्या। ९
गर्जती नेपुरें कोमळ चरणीं। वज्रांकुश चिन्हीं विराजीत। १०
कौस्तुभ मुक्तमाळा रूळे वैजयंती। भ्रमर भुलती नामा म्हणे। ११

६५७. सांगताती दाया। तुम्हां पुत्र झाला राया। १
ऐकतांचि ऐसें कानीं। हर्ष न समाये मनीं। २
उठा उठा हो त्वरेंसी। पाचारावें वसिष्ठासी। ३
ब्राह्मणासी पाचारा। सांगा सर्व नारीनरा। ४

फोडा फोडा रे भांडारें। आणवा गाईचीं खिल्लारें। ५।
उभवा उभवा रे गुढी। सोडा वस्त्रांचीं गाठोडीं। ६।
झाडोनियां टाका खडे। घाला केशराचे सडे। ७।
नामा म्हणे भूमंडळा। स्वामी माझा पहा डोळा। ८।

६५८. अनंत ब्रह्मांडें जयाचे उदरीं। ध्यातसे त्रिपुरारी अहर्निशीं। १।
पाहातसे मुख दशरथ त्याचें। भाग्य मी तयाचें काय वर्णु। २।
गंध पुष्प वस्त्रें अर्पोनियां द्विजां। समभावें पूजा सकळांसी। ३।
साखरेच्या गोण्या घाली हत्तीवरी। धाडीं घरोघरीं नामा म्हणे। ४।

६५९. करितसे स्नान अजाचा बालक। वस्त्रें अमोलिक परिधान। १।
लावोनियां भाळीं कस्तुरी केशर। करी नमस्कार वसिष्ठासी। २।
पुण्याहवाचनीं बैसे दशरथ। त्रिभुवनीं समर्थ तूंचि एक। ३।
वेदमंत्र घोष करिती ऋषेश्वर। पुष्पें सुरवर वरूषती। ४।
आणिती आहेर अयोध्येचे जन। करिती गायन गायक जे। ५।
नाचती अप्सरा वाजती नगारें। वाजंत्री तुतारे भोंवारे ही। ६।
गुलालाची धूम रंग वस्त्रावरी। बंदीजन द्वारीं गर्जताती। ७।
नामा म्हणे इंद्रें पाहोनियां सभा। नाहीं ऐसी शोभा चित्तीं म्हणे। ८।

६६०. बाई कशाच्या नवबता। पुत्र झाला दशरथा। १।
चला चला तेथें जाऊं। कौसल्येचें बाळ पाहूं। २।
नवसें बहुत। तिशीं पावला भगवंत। ३।
घ्या गे घ्या गे त्वरें वाण। झबले टोपडे पेहरण। ४।
करूनि शृंगारा। येती राजयाच्या घरा। ५।
पाहतां सुकुमार सांवळा। लवूं विसरला डोळा। ६।
सार्थक जन्माचें। नामा म्हणे झालें त्यांचे। ७।

६६१. वस्त्रें अलंकार दिली सुवासिनी । लेवविली लेणी आनंदाची । १
पुत्राचा सोहळा आयोध्येत होत। राजा दशरथ धन्य धन्य । २ ।
भांडारी येऊनि करिती प्रार्थना । द्विजांसी दक्षणा काय द्यावी। ३ ।
जया लागे जितुकें तितुकें त्यानें घ्यावें । तुम्हीं न रहावें उभें येथें । ४ ।
धांवतातीं तेव्हां विप्र सकळिक। एकावरीं एक पडतातीं । ५ ।
करूं नका घाई सर्वांसी पुरेल । न राहे दुर्बळ यांत कोणी। ६ ।
नामा म्हणे ऐसें धन वाटी राजा । सुखी केल्या प्रजा सकळीक। ७ ।

६६२. ब्राह्मणांची इच्छा पूर्ण झाली तेव्हां । आशिर्वाद तेव्हां वदतातीं। १ ।
कल्पकोटी यासी नाहीं नाहीं भय। सकळांचें ध्येय हेंचि असे । २ ।
तपाचिया राशी जाहल्या बहुत। म्हणोनियां सुत झाला तुज । ३ ।
तथास्तु म्हणोनि जोडीत अंजुळ । पायांवरी भाळ नामा म्हणे। ४ ।

६६३. बाई कौसल्येचा पुत्र । दिसे सर्वांही विचित्र । १ ।
ऐसें वाटे माझ्या चित्तीं । प्रगटली विष्णुमूर्ती । २ ।
झणीं होईल या दृष्ट । मोडतातीं कानीं बोट । ३ ।
तिच्या भाग्यें असो सुखी । नामा म्हणे सर्वांमुखी। ४ ।

६६४. धन्य ते संसारीं पवित्र ते वाणी। अखंड उच्चारणी रामनाम। १ ।
तयांचीच एक सरली येरझार । उतरले पार भवनदी। २ ।
वधोनी ताटीका सुबाहुही देख। सिद्धि नेला मख कौशिकाचा। ३ ।
पहावया यावें स्वयंवर सीतेचें । आलें जनकाचें पत्र तेथें। ४ ।
मारगीं चालतां ब्रह्मीयाची बाळा । उद्धरली शिळा पदरजें। ५ ।
मोडील धनुष्य तया हे देईन । केला होता पण जनकानें। ६ ।
रावणादि राजे आले थोर थोर । त्यांचा उतरला नूर पाहतांची। ७ ।
अहर्निशीं जया ध्यानीं ध्याय भोळा। तो उठला सांवळा बाप माझा। ८ ।
सुरां असुरां असाध्य ऐसें तें प्रचंड । ती ठायी कोदंड मोडियलें । ९ ।
पाहोनि ऐसें नामा म्हणे बळ । सीता घाली माळ रघुवीरा । १० ।

६६५. गुंडाळिल्या जटा तोचि माथा फेटा । गोजिरा गोमटा रामचंद्र । १ ।
वैकुंठींचा राजा म्हणवितो योगी । दावावया जगीं योग करी । २ ।
आकर्ण लोचन हातीं चापबाण । वल्कलें भूषणें नेसोनियां । ३ ।
पितृवचनालागीं मानोनि साचारी । झाला पादचारी वनीं हिंडे । ४ ।
देवांचिया काजीं ठेवोनियां निज । सर्वांपरी सज्ज झाला अंगें । ५ ।
नामा म्हणे त्याचें न कळे कौतुक । आपुलिया सुख वाढावया । ६ ।

## सीताशुद्धि

६६६. हनुमंत गेला सीताशुद्धिलागीं । लंका मध्यभागीं घेऊनियां । १ ।
माता जानकीच्या करीत शुद्धीसी । हिंडे गृहदेशीं राक्षसांच्या । २ ।
न देखे तो सती सीतादेवीमाया । अकस्मात तया वनामाजी । ३ ।
शिंसीवावृक्षाचे असे तळवटीं । समीप निकटीं राक्षसींचे । ४ ।
न चले उपाय कांहीं तो बोलाया । स्मरे रामराया तयेकाळीं । ५ ।
श्रीरामें मुद्रिका दिली होती संगें । तयासी अव्यंग सोडावया । ६ ।
वृक्षाचिया माथां बैसोनियां बळी । देत करकमळीं सोडूनियां । ७ ।
जानकी अवलोकी श्रीरामाची मुद्रा । कोठोनी कपींद्रा आणलीसे । ८ ।
सुखी रामराणा कवणिये वना । माझिया तूं प्राणा बोलें वेगीं । ९ ।
ऐकोनि कपींद्र चरणासी वंदी । म्हणे रामचंद्र सुखी असे ।१०।
सहितसौमित्र वनामाजी आहे । शुद्धीलागीं पाहे पाठविलें ।११।
तुझेनि वियोगें रामराजा दुःखी । यालागीं तुज देखीं पाठविलें ।१२।
ऐकतांची वाणी करीत अक्रोशा । म्हणे राम कैसा सांडियेला ।१३।
नानापरी खेद आलाप करूनी । हा हा राम वाणी बोलतसे ।१४।
समीप जे होते रक्षपाळ बळी । ऐकोनि आरोळी दूर झाले ।१५।
तये संधीमध्यें हनुमंत खालीता । येवोनियां माता वंदितसे ।१६।
क्षुधाक्रांत भारी म्हणे काय खाऊं । सांगसी उपाऊ तरी येथें ।१७।
वनामाजी मेवा घेऊनियां कांहीं । क्षुधेसी ते पाहीं शांतवावी ।१८।
म्हणे सीता दूता रक्षपाळ होती । निरोध करिती तुजलागीं ।१९।

म्हणोनियां पाहीं भूमीगत कांहीं । घेऊनि स्वदेहीं विश्रांतीसी । २० ।
पडलें तें घेई ऐसी आज्ञा पाही । वंदोनियां पायीं संतोषला । २१ ।
करोनी उड्डाण वृक्षमाथां बैसे । उपडोनि झाडास हालवीत । २२ ।
खालीं पाडी फळें तयांचें भोजन । करूनियां वन विध्वंसिलें । २३ ।
क्षपाळ सारे मिळोनि कपींद्रा । धरावया मारा यत्न केला । २४ ।
न चढे हातासी बहुबळ त्यासी । राक्षसां विध्वंसी हातपायीं । २५ ।
वृक्षाचेनि वायें मारिले उपायें । ऐसी बळें सोय दाखवीत । २६ ।
जंबूमाळी बागीं तया अधिकार । धांवोनि सत्वर रायापाशीं । २७ ।
गात ते घेउनि आला तो धांवुनि । कपीराज वनीं आला एक । २८ ।
यानें सर्व वन पाडिलें उपडोन । कोणाचा तो कोण कळेना हो । २९ ।
राजा करी आज्ञा धरा बांधा त्याला । मारा वानराला वेगीं जारे । ३० ।
एकतांचि वाणी भूपामुखींची हो । उठिले लवलाहो राक्षसगण । ३१ ।
धावोनि वेढिला कपीराज राणा । धनुष्यासी बाणां लावुनियां । ३२ ।
मारितां बाणासी न लागे कपिसी । तेव्हां युक्ति कैसी आरंभिली । ३३ ।
करूनि फांसासी धरूं म्हणती त्यासी । नये तो फांसासी आटोपितां । ३४ ।
रितीं जरी बाहीं निघोनियां जातां । न चढे तो हातां कवणाच्या । ३५ ।
थोर जरी फांसा होत तो लहान । जाय तो निघोन फाशांतुनी । ३६ ।
लहान जरी केला तरी होतो थोर । फाशांचा विचार व्यर्थ करीती । ३७ ।
ऐशापरी झाले श्रमातुर भारी । कपि तो विचारी कार्य पुढें । ३८ ।
म्हणोनि फांशांत पडे तो तेधवां । धरोनि वानरा नेती दूत । ३९ ।
सन्मुख रावणें देखुनि कपीसी । करी कौतुकासी अपूर्व हो । ४० ।
कधीं नाहीं ऐसें स्वरूप देखिलें । येणें फार केलें नाशालागीं । ४१ ।
पत तूं कोण कवण कार्यालागीं । पातलासी वेगीं याच ठायीं । ४२ ।
वानर म्हणे आलों मूर्खा रावणा रे । रामदूत खरें सीताशुद्धि । ४३ ।
कोनि रावण म्हणे यासी जाळा । शेंपूट गुंडाळा अग्नि लावा । ४४ ।
पीसी पुसिलें मरण कोणी ठायीं । येरू पुच्छ दावी म्हणोनियां । ४५ ।

समग्र लंकेचीं आणोनियां वस्त्रें । कपीपुच्छ पुरें न होयची । ४६ ।
तेव्हां राजधानी आणोनि वेष्टितां । परी तो पुरतां न होयची । ४७ ।
तेव्हां तेल घाला म्हणे तो रावण । दूत ते धांवोन टाकिताती । ४८ ।
लावुनि अग्निसी केला मोठा ज्वाळ । वानर तत्काळ उडाला हो । ४९ ।
लंकेची ते केली सारी तेणें होळी । सहित मंडळी राजघरें । ५० ।
भुभुक्कार केला वानर उडाला । लंकेमाजी झाला प्रळय हो । ५१ ।
अग्निचा उबाळा धुरानें दाटला । देखे कपि त्याला सुखरूप । ५२ ।
मुखासी लागला पाहतांची डोळां । म्हणोनि तो झाला शामवर्ण । ५३ ।
येवोनि लवलाहीं श्रीरामातें पाही । नमूनि सर्वही सांगितलें । ५४ ।
तेव्हां नामा म्हणे होतों मी जवळा । चरणकमळां ध्यात तेथें । ५५ ।

## रावण मंदोदरी संवाद

६६७. मंदोदरी सांगे रावणाप्रती । स्वप्न देखिलें म्यां मध्यरातीं ।
नेणों वान्नर मिळाले किती । शिळा सागरू बांधिला । १ ।
दोघे धनुर्धर वीर वान्नर । उतरोनि आले पैलसागर ।
एकापरीस एक गा वीर । ते बडीवार बोलताती । २ ।
नेणों त्याचा बळीया आला । लंकेभोवता वेढा घातला ।
सभामंडप उडोनि नेला । जो केला त्रिकुटेसी । ३ ।
लंकेभोंवता रूधिराचा पूर । रणीं पडिला कुंभकर्ण वीर ।
तो तुमचा सखा सहोदर । निद्रा करी सा मास । ४ ।
सत्य तुझीं छेदील दशशिरें । येणें रामें रणरंगधीरें ।
लंका जाळोनि केली जोहरें । अंबरीं तुरे गर्जताती । ५ ।
हें स्वप्न सत्य होईल जाणा । लंका दान बिभीषणा ।
शरण जाईं रघुनंदना । नामयाच्या स्वामीसी । ६ ।

६६८. विनंती करी मंदोदरी । परिसा स्वामी दशकंधरी । १ ।
वांयां आणिली जानकी घरीं । लाज झाली तिहीं लोकीं । २ ।

मज पाहातां हे विवसी। क्षय आणिली कुळासी। ३ ।
अभिलाषितां पर सती। हे तों नव्हे राजनीती। ४ ।
कोण आमुचा हितकरु। सांगे निर्मळ विचारु। ५ ।
नामया स्वामीसी शरण जावें। स्वहित आपुलें करावें। ६ ।

६६९. ज्यातें ध्यानीं ध्याती योगी। तो मज येतो भेटीलागीं। १ ।
तया रामासी विन्मुख होणें। जळो जिणें लाजिरवाणें। २ ।
व्रतें तपें ज्या साधिती। तो मज नित्य ध्यातो चित्तीं। ३ ।
जो अगम्य वेद पुराणां। तो मज येतो समरंगणा। ४ ।
नामया स्वामीच्या दर्शनें। मग कैंचि भवबंधनें। ५ ।

६७०. मंदोदरी करी विनंती। परिसा स्वामी लंकापती। १ ।
सोडा रामाची अंतुरी। जंव तो राम आहे दुरी। २ ।
उदकीं तारिले पाषाण। हा तो प्रताप नव्हे सान। ३ ।
झाला बिभीषण शाहाणा। देखोनि तुमच्या दुश्चिंतपणा। ४ ।
जाउनि रामासी भेटला। मृत्युपासूनि सुटला। ५ ।
नामयास्वामी रघुनंदन। वेगीं करावा प्रसन्न। ६ ।

६७१. तेहतीस कोटींची केली सोडवण। तो हा राम जपून धरा वेगीं। १ ।
राघवाचें नाम वाचेसी उच्चारा। निजाचा सोयरा रामचंद्र। २ ।
सागरीं हा शिळा तारिल्या अवलीळा। ब्रह्मयाची बाळा उद्धरिली। ३ ।
रावण कुंभकर्ण विदारिले बाणीं। दिधली राजधानी शरणागता। ४ ।
वाल्मिक भविष्य कथूनियां गेला। रामें पवाडा केला तिहीं लोकीं। ५ ।
नामा म्हणे रामनाम हें दुर्लभ। शिव स्वयंभ हेंचि जपे। ६ ।

६७२. राम पिता सिता माता। लक्ष्मण सोयरा चुलता। १ ।
तयांसी भेटों जाऊं आतां। चित्रकुटींच्या पर्वता। २ ।
नामा म्हणे माझें गोत। चित्रकुटीं असे नांदत। ३ ।

६७३. काळे गोरे धनुर्बांडे । ते चालताती रामापुढें । १ ।
राम निळिये गुढारी । कनक दंड चवरे वरी । २ ।
चला चित्रकुटीं जाऊं । राम दशरथाचा पाहूं । ३ ।
अयोध्ये केला अवतारू । राम नामया दातारू । ४ ।

६७४. गोरे सांवळे धनवंटे । एक चालती एकापुढें । १ ।
राम निळीये गुढारी । कनकदंड चौरे वरी । २ ।
राम लक्ष्मण विजयी झाले । आनंदें अयोध्ये आले । ३ ।
चंद्रगिरीचे तळवटीं । राम सीतेसी झाली भेटी । ४ ।
चंद्रगिरीं चला जाऊं । राम दशरथी पाहूं । ५ ।
चंद्रगिरीं केला वास । म्हणे नामा विष्णुदास । ६ ।

६७५. म्हणसी बिभिषण शाहणा । परि तो महा मूर्ख जाणा । १ ।
काय तो रामासी भेटला । अवघा रामचि नाहीं झाला । २ ।
राम दृष्टी देखतांची । पदवी न घेववेचि त्याची । ३ ।
कोण हित केलें तेणें । राम नाकळी चिंतनें । ४ ।
जरी तो झाला लंकापती । नाश पावेल कल्पांतीं । ५ ।
नामया स्वामी तें जाणोन । अवघा रामचि होईन । ६ ।

६७६. श्रीराम सोयरा आला माझ्या घरा । दिधला म्यां थारा हृदयीं माझ्या । १ ।
पावलों विश्रांति धालें माझें मन । न लगे आतां ध्यान शिकावया । २ ।
ज्या साठीं हिंडणें जटामौन नग्न । धरिलें तेणें ठाणें हृदयीं माझ्या । ३ ।
योग याग तप करावें साधन । तोहि ओंठीं जाण सदा वसे । ४ ।
तीर्थयात्रा देव ज्यासाठीं करावे । तें ब्रह्म बरवें नांदे देहीं । ५ ।
ब्रह्मचर्यादिक आश्रम साधावे । केली तया देवें देहीं वस्ती । ६ ।
वेदशास्त्र पुराण ज्यासाठीं पठण । तो नांदे परिपूर्ण हृदयीं माझ्या । ७ ।
ऐसा तो सज्जन जिवलग सांगाती । दिधली मज विश्रांति नामसंगें । ८ ।
तैसें नव्हे ज्ञान फुटक्या हांडोऱ्याचें । धरूनियां साचे खोरखा वाजे । ९ ।

स्वधर्मी विचार वेंचाचे अन्वयें। लाधले हे पाय गुरुकृपें। १० ।
अभंग भंगेना फोडितां फुटेना । गुरुकृपें जाणा प्राप्त जालें । ११ ।
चावळी वटवट बोलणे बाम्पर । हे तंव अवघे चार मर्कटाचे। १२ ।
परनिंदा परद्रोहो करणें या संतांचा। जाळावी ते वाचा ज्ञान त्याचें। १३ ।
न लगे सोंग धरणें देह ताप करणें । ऐसें निजध्यान हातां आलें। १४ ।
नाम घेतां रूप हृदयीं बिंबलें । सर्वत्र देखिलें तेंचि डोळां । १५ ।
नाममंत्र बीज नाहीं जंववरि। केशव तंववरि प्राप्त नाहीं। १६ ।
नामाचे धारक ते केशवरूप देख। वैकुंठींचें सुख रूळे पायीं। १७ ।
नामेंविण ज्ञान नपुंसक ऐसें। नातळती कैसे साधुसंत। १८ ।
नाम तेंचि रूप रूप तेंचि नाम। नामरूपाभिन्न नाहीं नाहीं । १९ ।
आकारला देव नामरूपा आलें। म्हणोनि स्थापिलें नामदेवें । २० ।
नामापरता मंत्र नाहीं तो आणिक। सांगती ते मूर्ख ज्ञानहीन। २१ ।
नामा म्हणे ज्ञान केशव केवळ। जाणती प्रेमळ भले भले । २२ ।

## श्री हनुमान जन्मकाळाचे अभंग

चैत्र शुद्ध पौर्णिमा, खालील अभंग म्हणावेत.

६७७. देवांगना हातीं आणविला शृंगी। यज्ञ तो प्रसंगी आरंभिला। १ ।
विभांडिका क्रोध आला असे भारी । अयोध्ये भीतरी वेगी आला। २ ।
राजा दशरथ सामोरा जाऊनी। अति प्रिती करूनी सभे नेला। ३ ।
पुत्र स्नुषा दोन्ही देखता नयनी। आनंदला मनी नामा म्हणे । ४ ।

६७८. आनंदोनी म्हणे राजा धन्य केलें। इच्छिले सोहळे पुरवीन। १ ।
यज्ञाचा आरंभ करी लवलाहा। पुसोनी आचार्या वसिष्ठासी। २ ।
सर्व ऋषिजन मिळाले सकळ। मंत्राचा कल्लोळ करिताती । ३ ।
नामा म्हणे शृंगी मुख्यत्वें शोभला । यज्ञ आरंभिला तेव्हा तेणे। ४ ।

६७९. आरंभिला यज्ञ संतोष सर्वत्र। आनंदे नगर दुमदुमीत । १ ।
यज्ञ नारायण संतोष पावला। प्रत्यक्ष तो आला कुंडातुनी । २ ।
पायस ते पात्र घेऊनिया करी । शृंगीस झडकरी बोलतसे । ३ ।

विलंब करीना विघ्न वोढवेल । सत्वर वहिला भाग करा । ४ ।
नामा म्हणे देव येईल पोटासी । ऐसे गुज त्यासी अग्नी सांगे । ५ ।

६८०. विभाग सत्वर वसिष्ठाने केले । राया बोलाविले संन्निधर्चा । १ ।
प्रथम तो भाग कौसल्येसी दिला । तेणे क्रोध आला कनिष्ठेसी । २ ।
येतांचि क्रोध विघ्न वोढवले । मुखी झडपिलें पिंड घारी । ३ ।
आसुडोनि पिंड घारीन पैं नेला । नामा म्हणे घातिला अंजनी करी । ४ ।

६८१. ऋषिमुख पर्वती ध्यानस्थ अंजनी । सांगतसे कानी खूण वायु । १ ।
तंव करी पिंड पडताचि सत्वर । भक्षी तो निर्धार स्मरणमात्रे । २ ।
शिव स्मरणे पिंड प्राशन पैं केला । जन्मासी तो आला बळियारूद्र । ३ ।
नामा म्हणे जन्म पावतांचि बाळ । झाला असे काळ रविमंडळा । ४ ।

६८२. पिंड घारीने झडपिला । अंजनीने तो सेविला । १ ।
अंजनीच्या तपासाठी । महारुद्र आले पोटी । २ ।
चैत्र शुद्ध पौर्णिमेसी । सूर्योदय समयासी । ३ ।
महारूद्र प्रगटले । नामा म्हणे म्यां वंदिले । ४ ।

वरील अभंग म्हणून शेवटी पुष्पवृष्टि करावी. राम लक्ष्मण जानकी जय बोलो हनुमान की भजन करावे. सुंठवड्याचा नैवेद्य करावा. पारंपारिक आरत्या किंवा 'जन्मता पांडुरंगे' आरती म्हणून उपसंहार करावा.

## ❖ श्री भगवान परशुराम जयंती अक्षय्य तृतीया, माध्यान्ही ❖

६८३. मारावया राजे ब्राह्मणाचे घरी । रेणुका उदरी अवतार । १ ।
करुनियां पृथ्वी निःक्षत्रिय बहुवेळां । दान ते सकळां विप्रां दिली । २ ।
खुंटविला चिरंजीव अद्यापि तो आहे । आत्मरूपीं पाहे निजानंदी । ३ ।
दाशरथी रामा समागम झाला । तेणे एक बाण दिला म्हणे नामा । ४ ।

अक्षय्य तृतीया ही पितृतिथी आहे. तेव्हा ब्रह्ममूर्ती संत व धन्य तोचि देश हे ही अभंग म्हणावे व खालील आरत्या म्हणाव्या.
'युगे अठ्ठावीस' व 'जन्मता पांडुरंगे' या आरत्या म्हणून उपसंहार करावा.

## ↔ श्री नृसिंह जयंती वैशाख शुद्ध चतुर्दशी, सायंकाळी ↔

६८४. दैत्य राजा थोर महा बळीवंत। जगीं तो विख्यात हिरण्यकश्यप । १ ।
करुनियां तप तोषवी ब्रह्माया। मागे वर तया दैत्यराव । २ ।
वरदान मागे नसावा तो मृत्यु। कवणाचे हातु देव सुरां। ३ ।
गंधर्व मानव सकळांचें भय । नसावें तिळप्राय कवणेकाळीं। ४ ।
दिवसां ना रात्रीं तिथीं हो नक्षत्रीं । अंतरिक्ष क्षितीं मरण नसो । ५ ।
घरीं राजधानीं चोहटा मंदिरीं । कवणे ते स्थळीं मृत्यू नसो । ६ ।
ऐसा वर मागे दिला ब्रह्म देवें । तपाचे स्वभावें तये काळीं। ७ ।
वर मागुनियां हरियलें पद । देवांसहित इंद्र स्थानभ्रष्ट। ८ ।
तयेकाळीं देव लपोनियां हरी । स्तविती अंतरीं त्राहीं त्राहीं। ९ ।
देवराया आली कृपा ते समयीं। म्हणे सर्व होई काळयोगें । १० ।
तयाचे उदरीं भक्तराजराणा। प्रल्हाद सुजाणा होईल तो । ११ ।
तयासी छळितां पावेल शासन। हाचि भरवसेन नेम आहे । १२ ।
नामा म्हणे देवें केलें समाधान। आनंदें निमग्न आले स्थाना। १३ ।

६८५. ऐसें हो असतां देव खेळे मेळा । सहित गोपाळा चाल केली । १ ।
भय तें मानुनी स्त्री पाठवी माहेरा। होता तो उदरा भक्तराज। २ ।
अकस्मात् वाटे नारद भेटला । उपदेश केला दैत्यपत्नी। ३ ।
हरिमंत्र शुद्ध पडतां श्रवणीं। गर्भस्थ ते क्षणीं स्वहित मानी। ४ ।
आठवीत नाम हृदय गुंफेत। कालें तो प्रसूत होता झाला। ५ ।
आनंदें भरित मेदिनी भरली । राजा मात आली पुत्र झाला। ६ ।
भिकाऱ्यासी दान सभाग्यें करुनि। संतोषला मनीं दैत्यभूप। ७ ।
देव होते करीत अनुष्ठान सिद्धी । झाला भक्तनिधी महाराज । ८ ।
स्वर्गी ध्वज उभे केले देवें सर्व। आनंदे वैभव संतोषोनि। ९ ।
ऐशापरी बाळ पावतां वृद्धीसी। पंच कर्म त्यासी संस्कार । १० ।
मग करवी त्याला विद्या अभ्यासाला। गुरू शुक्र झाला सांगावया । ११ ।

शंडामर्क नामें शिक्षेसी ठेविला। पढूं तो घातला कुमरवर। १२।
समस्त ते बाळ पढती जें कांहीं। गुरूचे ते ठायीं भावयुक्त। १३।
प्रल्हादासी पूर्वी गर्भवास झाला। उपदेश फळला नारदाचा। १४।
त्याचि छंदें गात हरिनाम अंतरीं। वाचेमाजी हरि आठवीत। १५।
गुरू वैरभाव सांगत हरीचा। न मानी तयाचा उपदेश। १६।
समस्तां बाळकां सांगे हरिनाम। प्रेमें तो आपण वाखाणितो। १७।
तेणें तीं लेंकुरें हरिरूप जपतांची। हरिरूप साचीं झालीं पाहा हो। १८।
गुरू करी चिंता काय रायाप्रती। जाऊनि निगुती सांगों आतां। १९।
आपण तो कांहीं न शिके बोलिलें। समस्त लेंकुरें नाशियेलीं। २०।
जाऊनि हे मात रायासी निवेदी। कोप करूनि आधीं राजा बोले। २१।
मग म्हणे आणा अधमासी येथें। गुरूराज पंथें नेत जात। २२।
नाही कांहीं भय चिंतनीं हरीचे। आनंद करीत साचें चालिला तो। २३।
नामा म्हणे ऐसा भक्तराज बळी। स्मरे वनमाळी हृदयांत। २४।

६८६. घेऊनियां गुरू आले राजसभे। वंदूनियां उभे सन्मुख तो। १।
म्हणे काय पढसी तूं सांग। म्हणे लागूं वेगें हरीहरी। २।
ऐकतां वचन बोले क्रोधावोनि। पापीयासी झणी नका येथें। ३।
माझा जो वैरी तया आठवितो। कुळघात होतो ऐशानेंचि। ४।
म्हणूनि समुद्रीं नेऊनियां टाका। अग्नींत लोटा कां दुराचारी। ५।
शस्त्रघाव वरी मारारे अधम। काळाग्नीतें सम विष पाजा। ६।
पर्वतावरी नेऊनियां टाका। प्राण याचा घ्या कां अवघे दूत। ७।
राजआज्ञा होतां संकोचित दूत। राजा बोले त्यांतें काय पाहतां। ८।
दूतीं राजाज्ञेनें धरूनि हो नेतां। मुखीं त्या अनंता आठवितो। ९।
तयेकाळीं भक्त उभा निर्भय चित्त। काय हो करीत हरि माझा। १०।
नेऊनियां तिरा समुद्राचे पाहीं। म्हणती आतांही ऐक बापा। ११।
येरू म्हणे हरि असे नारायण। तो मज लागून तारील हो। १२।

टाकितां उदकीं बरतीच राहे। म्हणती हा पाहे पोहतसे। १३।
तेथुनि काढिला अग्नींत टाकीला। शीतळ हो झाला अग्नी स्पर्शे। १४।
हरिदासा काय शक्ति हो जाळाया। म्हणोनियां पायां वंदितसे। १५।
मुखीं हरिहरि उच्चार नामाचा। गर्जे भक्त साचा सर्वाठायीं। १६।
अग्नि तो शीतळ होतां मात राया। म्हणे जादु केली या दुर्जनानें। १७।
विष हळाहळ करूनियां वाटी। नेऊनियां होटीं लावितातीं। १८।
भोक्ता नारायण म्हणोनियां प्याला। अमृत तो झाला प्रल्हादासी। १९।
पर्वत शिखरीं बैसऊनि खालें। लोटितां हो बोले सर्व सत्ता। २०।
जळीं स्थळीं व्यापि आहे नारायण। तेथें काय होणें भय दुःख। २१।
पडतांचि खालीं उठोनियां उभा। पाहतां हो सभा भय दुःख मानी। २२।
म्हणे मारायाला शस्त्रघाय वरी। धांवोनियां चिरी महाबळें। २३।
हाणितां शस्त्रानें न लगती कांहीं। मुखीं हरि पाही आठवीत। २४।
म्हणे गजपायीं बांधोनियां मारा। कुंजर ते आणा बोले राजा। २५।
आणोनियां हत्ती घालीत हो वर। पाहे तो समोर विक्राळ सिंह। २६।
दाहि दिगंतर उलंघुनी गेले। उपाय न चाले कांहीं त्यासी। २७।
श्रमयुक्त झाला राजा कांहीं केल्या। भक्त राजा भला न ढळेचि। २८।
नामा म्हणे भक्त निर्भय सर्वांसी। काय हो तयासी उपेक्षी हरी। २९।

६८७. आयात न चले आणखी नवळी। म्हणे कोण बळी साहाकर्ता। १।
कोठें राहतो कैसा कोण सांग। येरू म्हणे वेग नाहीं कोठें। २।
सर्वां ठायीं आहे व्यापुनी सगळा। नाहीं तो निराळा कोठें पाहतां। ३।
जळीं काष्ठीं आहे माझा अंतरंग। सखा पांडुरंग मायबाप। ४।
ऐकतांचि बोल राजा कोपावत। म्हणे तो निश्चीत काष्ठीं आहे। ५।
सभास्तंभीं आहे संदेह तो काय। ऐकतां स्वयमेव उठीयला। ६।
कोपोनिया लाथ मारीत स्तंभासी। करीत नादासी हरिरूप। ७।

भक्ताच्या वचना कोरडिया काष्टीं। सत्य करी गोष्टी नारायण। ८।
महानाद झाला त्रिभुवन भ्याला। गर्भपात झाला स्वर्गलोकीं। ९।
फुटों पाहे अंड बुडों पाहे क्षिती। ऐसी होती गति तये काळीं। १०।
स्तंभ तो चिरला नरहरी देखिला। भयाभीत झाला राजा तेव्हां। ११।
परी शूर क्षेत्रीं न टाकी धैर्यासी। घेऊनि खडगासी धांवियला। १२।
धांवोनियां जातां धरिला तात्काळ। चिरीतां ते वेळ मांडीवरी। १३।
नखें घाय केला हृदयीं चिरीला। काढी अंत्रमाळा पोटांतुनी। १४।
रूधिर जिव्हेनें चाटी करी शोष। भय बहु त्रासें उग्ररूपीं। १५।
मानव शरीर सिंहवदन हरी। गुरगुर तो करी देवराव। १६।
अवतार वेळा वैशाख मासी। चतुर्दशी संधीसीं अर्धबिंब। १७।
दिवा ना रात्रीं स्वाती नक्षत्रासी। प्रगटला ज्योतीसी दैत्यहर्ता। १८।
घरीं ना मंदिरीं सभे ना बाहेरी। उंबरीयावरी मारीयेला। १९।
शस्त्रानें न मरे ऐसा वर होता। म्हणोनि नखें त्याचा अंत केला असे। २०।
वर राखोनियां केला वध पाही। दासाची नवाई वाढवीत। २१।
शब्द जो कां झाला प्रगटतां रूप। तेणें अंतराळीं अमूप नाद भरे। २२।
नक्षत्रें पडती भूमीं रिचवती। भयेंचि खालती आघात ते। २३।
ब्रह्मादिकां भय त्रास उपजला। धांऊनियां आला दर्शनासी। २४।
सहित देवगण करीत स्तुतिसी। न होय शांतीसी कांहीं केल्या। २५।
रमा पूर्ण माये आली ते समयीं। तीसी ते वैभवी साहवेना। २६।
तये काळीं देवीं प्रल्हाद प्रार्थिला। सन्मुख गेला उग्ररूप। २७।
प्रेत टाकियेलें शांतरूप झाला। प्रल्हाद पावला आनंदातें। २८।
पाहतांचि बाळ वोसंगा घेतला। हातें कुर्वाळिला भक्तराज। २९।
देव सुर राज्यीं बैसऊनि हरी। स्वरूप संहरी उग्रभाव। ३०।
राज्यीं बैसविला प्रल्हाद निजभक्त। केली जगीं ख्यात नामा म्हणे। ३१।

६८८. अज्ञानबाळकें तुझा हाकार केला । तेणें तये वेळां स्वर्ग भेदिला ।
ऐकुनि तो धांविन्नला । अत्रो देवी खेचरें । १
स्तंभीं प्रगटलीसे हाक । कापिन्नले तिन्हिं लोक ।
भेणें पळतीं शंखादिक । आणि कैलास आंदोळले । २
आली त्रिभुवन देवता । नाभी नाभींरे म्हणतां ।
माझा प्रल्हाद केउता । तो कवणें रे गांजिला । ३
वदन पसरूनि विक्राळ । झरझरीत झरे लाळ ।
नेत्र जैसे वडवानळ । शोषूं पाहे जळनिधि । ४
संहार झाला नागकुळ । भ्याले अष्टहि लोकपाळ ।
स्वर्गीं सुटली खळबळ । अमरावतीं इंद्रासी । ५
मग दैत्यातें पाचारित । लोह खणखणा वाजत ।
हाकीं अंबर गर्जत । तेणें कांपे मेदिनी । ६
कवटाळुनि चहूं हातीं । विदारिलें चपेटघातीं ।
जैसा रूद्र प्रळयांतीं । तैसा हरी दिसतसे । ७
दैत्य न मरे कवणें परी । मग तो धरिला जान्हूवरी ।
नखें उदर फाडुनि सत्वरीं । अस्थि चूर्ण केली या । ८
मौजे नाचती देवता । मुक्ति दिली दैत्यनाथा ।
नामया स्वामि वरदहस्ता । अभयदाता भक्तांसीं । ९

६८९. वर्णावया रूप कांहीं स्फुर्ती देई । नरसिंह तूं होई साह्यभूत । १
मुख तें सिंहाचें शरीर मानवाचें । भयंकर देवाचें रूप असे । २
अनंत भूषणें जडित बाहूचीं । गळां पदकाची थाटी बहू । ३
केशर चंदन लावियलें अंगा । अखंड श्रीरंगा देवाजीचे । ४
नवनीत तुळशीचीं सुगंधित फुलें । माळा गुंफियलें चंपकानें । ५
कांसे पीतांबर जडित सुंदर । कडदोरा अपार शोभिवंत । ६
तोडर ब्रीदाचा विराजत भारी । आनंदला हरी नामा म्हणे । ७

६९०. अंबऋषि रुक्मांगद । नारद महामुनि प्रल्हाद । १ ।
मिळोनि सनकादिका भारु । पांडुरंगीं हरि जागरु । २ ।
शंख भेरी नादाकार । नादें गर्जत अंबर । ३ ।
योगनिद्रेस्मी पहुडला । आदिपुरुष उपवर झाला । ४ ।
देवी उतरोनी विमानीं । आली क्षीरसागर भुवनीं । ५ ।
सुरवर बोळंगती जगन्निवास । गातो नामा विष्णुदास । ६ ।

६९१. वैकुंठिहूनि धांवत आला । खांबा आड उभा ठेला । १ ।
खांब गडगडिला गडगडिला । वीर नरसिंह पावला । २ ।
पावला नामया स्वामी । जग उद्धरिलें याचे नामीं । ३ ।

६९२. पहाहो कडकडिलें गगनीं । भेणें कापते मेदिनी । १ ।
तो देव दैत्यां अंतकु । होय भक्तांसी नायकु । २ ।
भोजें प्रल्हाद नाचतु । नामया स्वामी रे अनंतु । ३ ।

६९३. तडक फुटला अंबरीं । आला प्रल्हाद कैवारी । १ ।
आला आला हांक देतु । सिंहनादें रे गर्जतु । २ ।
दैत्यां दचकु नरहरी । नामया स्वामी नरकेसरी । ३ ।

६९४. निरंतर नाम जपे । पिता प्रल्हादास कोपे ।
उदरा आला वैरिरूपें । म्हणवुनि धात्रीं त्रासिला । १ ।
कोपें कोपला नरहरी । कवण तयातें सांवरी ।
खटखटा वाजती दांतोरी । दैत्यावरी उठावला । २ ।
हांक देऊनि अवचितीं । आंदोळली त्रिजगती ।
समुद्रपाणी उसळती । उलथों पाहती गिरिवर । ३ ।
सिंहवदन प्रगटला । मर्गज अवचिता उठला ।
भेणें वासुकी मोवाळला । गजबजिला पाताळीं । ४ ।
जैसा प्रळयांत काळीचा मेघु । तैसा गडगडिला वेगु ।
अरे मर्गजाच्या खांबीं सवेगु । क्षणामाजीं प्रगटला । ५ ।

केला भक्तांचा कुडावा। शिक लाविली दानवा।
नामयास्वामी वोळंगावा। नरहरि विसावा भक्तांचा। ६।

६९५. भक्त प्रल्हादाकारणें। वैकुंठींहुनि धांवणें। १।
नरहरी पातला पातला। महा दोषा पळ सुटला। २।
शंख चक्र पद्म गदा। ना भी ना भी रे प्रल्हादा। ३।
दैत्य धरी मांडीवरी। नखें विदारी नरहरी। ४।
पावला गरुडध्वज। नामया स्वामी केशवराज। ५।

६९६. कायरे गडगडित दुमदुमीत। ब्रह्मकटाह उलथूं पहात। १।
तो देव आला रे नरहरी। आतां कवण सांवरी। २।
प्रल्हादासी दिधलें जैत्य। हर्षे नामा गुढी उभारीत। ३।

वरील अभंग म्हणून पुष्पवृष्टि करावी. 'युगे अठ्ठावीस' व
'जन्मता पांडुरंग' आरती म्हणून उपसंहार करावा.

## श्री कुर्म जयंती, वैशाख शुद्ध पौर्णिमा व श्री बौद्ध जयंती

६९७. मत्स्य कच्छ क्रोड मृग तं खुजट। जेथूनि प्रगट झाली रूपे। १।
तेचि ब्रह्म उभें भीवरेच्या तिरी। हात कटावरी ठेवूनिया। २।
मातृघाती हिंडे वनी जो रडत। चोर जार घात करी दुष्ट। ३।
दिगंबर अश्वारूढ खड्गधारी। पृथ्वीचा जो करी ग्रास एक। ४।
नामा म्हणे मुंगी आदि ब्रह्मवरी। नाना अवतारी एकलाचि। ५।

६९८. मध्ये झाले मौन देव निजध्यांनी। बौध्य ते म्हणोनि नांवे रूप। १।
पाखांडे बहुत कलिमाजी झाली। वर्णाश्रम सकळी बुडविले। २।
पापाचिया राशी जळतील नामी। निश्चय हरिनामी नामा म्हणे। ३।

दोन्ही प्रसंगी 'युगे अठ्ठावीस' व 'जन्मना पांडुरंग' म्हणून उपसंहार करावा.

## पूर्णब्रह्म अवतार भगवान् श्रीकृष्ण कथामृत

६९९. लंबोदरा तुझा शोभे शुंडादंड। करीतसे खंड दुश्चिन्हांचा। १।
चतुर्थ आयुधें शोभताती हातीं। भक्ताला रक्षिती निरंतर। २।

भव्यरूप तुझें उंदीरवाहना। नमन चरणा करीतसें। ३
तुझें नाम घेतां दोष जळताती। कळिकाळ कांपती तुझ्या नामें। ४
चौदा विद्या तुझे कृपेनें येतील। मुके बोलतील वेदघोष। ५
रुणझुण पायीं वाजताती वाळे। ऐकोनि भुललें मन माझें। ६
भक्तवत्सला ऐकें पार्वतीनंदना। नमन चरणां करितसें। ७
नामा म्हणे आतां देई स्फूर्ती। वर्णीतसें कीर्ति कृष्णजीची। ८

७००. सरस्वती मातें द्यावी मज स्फूर्ती। येतों काकुलती तुजलागीं। १
लाडिकें लडिवाळ मागतसें तुज। वंदीन हे रज चरणींचे। २
त्वरें येवोनिया मस्तकीं ठेवीं हात। जाईल ही भ्रांत तेव्हां माझी। ३
आपुल्या बाळासी धरी आतां हातीं। न करीं फजिती जनामध्यें। ४
विश्वात्मा जो हरी त्याची वर्णीन कीर्ति। आवडीचा ओतीं रस यातें। ५
ऐकोनियां स्तव झालीसे प्रसन्न। नामया अभिमान मजलागीं। ६

७०१. प्रल्हाद नारद पराशर पुंडरीक। व्यास आणि वाल्मिक नमीयले। १
दालभ्य तो भीष्म अंबरीष शौनक। ब्रह्मनिष्ठ शुक नमीयले। २
रुक्मांगद अर्जुन वसिष्ठ बिभीषण। केलेंसे नमन याजलागीं। ३
टीकाकार श्रीधर बहिरंभट चतुर। करा निरंतर कृपा मज। ४
साधुसंतसिद्ध शिरीं ठेवा हात। वर्णीन समस्त कृष्णलीला। ५
नामा मनीं आठवी केशव चरण। तयाच्या कृपेनें सिद्धि जावो। ६

७०२. तरी मी गाणु नव्हे जे गाणीव करी। जेणें तुमतें हरी संतोष उपजे। १
तरी मी जाणु नव्हे जे जाणीव करी। जेणें तुमतें हरी संतोष उपजे। २
तरी मी दाता नव्हे जें दातृत्व करी। जेणें तुमतें हरी संतोष उपजे। ३
तरी मी बहुरूपि नव्हें जें अभिनव नट धरी। जेणें तुमतें हरी संतोष उपजे। ४
तरी मी योगि नव्हे जें मी ध्यान धरी। जेणें तुमतें हरी संतोष उपजे। ५
यावरी जाणसी तें तूं करीं अनंता। नामा विनवी संता विष्णुदासे। ६

७०३. क्षीरसागरांत असशी बैसला । धांवोनि मजला भेटी देई ।
कैलासी शीव पूजितसे तुजला । धांवोनि मजला भेटी देई ।
शेषावरी जरी असशी निजला । धांवोनि मजला भेटी देई ।
योगीयांचे ध्यानी असशी बैसला । धांवोनि मजला भेटी देई ।
गहिंवरोनि नामा बाहात विठ्ठला । धांवोनि मजला भेटी देई ।

७०४. चक्रवाक पक्षी वियोगें बाहाती। झालें मजप्रती तैसें आतां।
चुकलिया माय बाळकें रडती। झालें मजप्रती तैसें आतां।
वत्स न देखतां गाई हुंबरती । झालें मजप्रती तैसें आतां।
जीवनावेगळे मत्स्य तळमळती। झालें मजप्रती तैसें आतां।
नामा म्हणे मज ऐसें वाटे चित्तीं । करीतसें खंती फार तुझी ।

७०५. काय माझा आतां पाहातोसी अंत । येई बा धांवत देवराया।
माझ्या जीवा होय तुजविण आकांत। येई बा धांवत देवराया।
असे जरी काम भेटूनियां जात। येई बा धांवत देवराया।
येरे देवा आतां नामा तुज बाहात । येई बा धांवत देवराया।

७०६. न वर्णवे वाचे जन्ममरणाचें दुःख । दावीं आतां मुख पांडुरंगा ।
कुरळिया केश भाळीं शोभे टिळक। दावीं आतां मुख पांडुरंगा ।
भोंवया व्यंकटा शोभती सुरेख। दावीं आतां मुख पांडुरंगा ।
कमलाकार नेत्र सुंदर नासीक । दावीं आतां मुख पांडुरंगा ।
कर्णीचीं कुंडलें न वर्णवे हाटक । दावीं आतां मुख पांडुरंगा ।
अधर आरक्त दंत इंदुहुनि अधिक । दावीं आतां मुख पांडुरंगा ।
विष्णुदास नामा तुझेंचि बाळक। दावीं आतां मुख पांडुरंगा ।

७०७. बाहुबळें तुवां काढिलें अमृत। ठेवीं बा तो हात शिरावरी ।
जननी माझी जेव्हां ज्याकडे बाहात । ठेवीं बा तो हात शिरावरी ।
देवा बैसवोनि सुधेतें वाढीत। ठेवीं बा तो हात शिरावरी ।

क्षीराचा सागर उपमन्यूशी देत । ठेवीं बा तो हात शिरावरी । ४ ।
घेवोनियां चक्र परिक्षिता रक्षीत । ठेवीं बा तो हात शिरावरी । ५ ।
कवटाळुनि धरिलें ध्रुवासी वनांत । ठेवीं बा तो हात शिरावरी । ६ ।
विदुराच्या घरीं कण्या सांभाळीत । ठेवीं बा तो हात शिरावरी । ७ ।
चिरंजीव करूनियां नगरी सुवर्ण देत । ठेवीं बा तो हात शिरावरी । ८ ।
नामा म्हणे युद्धीं रक्षियेला पार्थ । ठेवीं बा तो हात शिरावरी । ९ ।

७०८. रुणझुण पायीं वाजतानी वाळे । दावीं तीं पाउलें दयानिधी । १ ।
जनक श्रुत घरीं चालुनियां गेलें । दावीं तीं पाउलें दयानिधी । २ ।
गजा धरिलें नक्रें तेव्हां जे धांवले । दावीं तीं पाउलें दयानिधी । ३ ।
वस्त्रहरणीं ज्यातें द्रौपदीनें चिंतिलें । दावीं तीं पाउलें दयानिधी । ४ ।
देखोनियां ज्यातें कौरव भ्याले । दावीं तीं पाउलें दयानिधी । ५ ।
धर्म आणि भीष्म विदुरादिक धाले । दावीं तीं पाउलें दयानिधी । ६ ।
स्वयंवराशी जातां शीळे उद्धरिलें । दावीं तीं पाउलें दयानिधी । ७ ।
नामा म्हणे ज्यातें बळीनें पूजिलें । दावीं तीं पाउलें दयानिधी । ८ ।

७०९. अडखळूनि पडसी वाळं नको जोडा । धांवत दुडदुडां येईं आतां । १ ।
बैसावयासाठीं घेऊं नको घोडा । धांवत दुडदुडां येईं आतां । २ ।
भोजना बैसलासी येथें घेईं विडा । धांवत दुडदुडां येईं आतां । ३ ।
बाहूबळें काढिला देवांचा जो खोडा । धांवत दुडदुडां येईं आतां । ४ ।
कृपाळु बहुत लक्ष्मीचा जोडा । त्याला बाहतसे वेडा नामदेव । ५ ।

७१०. ये ये देवा तुला देईन मी पेढा । वेगीं बाहे वेडा नामदेव । १ ।
ज्याचे पायीं असे ब्रिदाचा तोडा । त्याला बाहे वेडा नामदेव । २ ।
जनीं पुसे सुखी रखुमाईचा जोडा । त्याला बाहे वेडा नामदेव । ३ ।
यावयासी येथें आळस तुम्ही सोडा । घेईन उडापिडा नामा म्हणे । ४ ।

७११. युगा ऐसें पळ तुजविण जाय। पाहातांसी काय अंत माझा। १ ।
कोमळ हृदय तुझें पंढरीच्या राया। कठिण सखया कैसें झालें। २ ।
विचारिलें चित्तीं दुर्लभ हरिहरा। जाऊं कैसा घरा रंकाचिया। ३ ।
अंगिकारावरी अव्हेराची मात। नव्हे हें उचित देवराया। ४ ।
मागें जे कां आली केली वासुदेवा। उदारा केशवा पुरविली। ५ ।
नुपेक्षिसी ऐसा भरंवसा चित्तास। आशेची निरास झाली दिसे। ६ ।
वांचोनियां दुःख भोगावें स्यां आतां। प्राणासी मुकता हेंचि भलें। ७ ।
वर्णितां नामा झाला समाधिस्थ। जहालें विदित पांडुरंगा। ८ ।

७१२. त्वरें धांवोनियां आलासे गोविंद। सावध सावध नामदेवा। १ ।
रूसलासे नामा देवासी न बोले। करें कुरवाळिलें वदन तेव्हां। २ ।
समजावूनि देवें धरिला पोटासीं। बोलें मजपाशीं नामदेवा। ३ ।
नामा म्हणे देवा उशीर कां केला। किंवा माझा आला तुला राग। ४ ।

७१३. वेळोवेळां तुला बाहे वेडा भक्त। राहो नेदी निवांत क्षण एक। १ ।
मागें वहुतांनीं केले रे प्रबंध। तुझे पाहुनि छंद वेडावलों। २ ।
माथां ठेऊनि हात बोले विश्वाचा जो बाप। वर्णि रे प्रताप नामदेवा। ३ ।

७१४. करील जो प्रश्न सांगेल जो कथा। श्रवण करितां उद्धरती। १ ।
कथा भागिरथी स्नान जे करिती। त्याचे उद्धरती पूर्वज ते। २ ।
भागीरथी स्नान श्रम लागे फार। करावें एकाग्र मन येथे। ३ ।
नामा म्हणे ऐसें बोले भागवत। शुक सांगतसे परीक्षिती। ४ ।

७१५. कृष्णराम लीला सर्व त्या गोपाळां। जन्मासी सांवळा कैसा आला। १ ।
विस्तार बोलाया बैस तूं अंतरा। करीं तूं पामरा कृपादान। २ ।
म्हणोनि विनवी पायां पैं निगुती। ऐकावें श्रीपती नामा म्हणे। ३ ।

७१६. भूमि भार झाला चालली उत्क्रांत। धरूनियां रूप गाईचें हो। १ ।
विधीपासीं गेली रडूं ते लागली। समग्र वहिली कथा सांगे। २ ।

नको भिऊं म्हणोनि अभ्यासिलें विधिनें। मत्रें तीस घेऊन गेला ठायां। ३ ।
नामा म्हणे तेचि आधार सर्वांसी। रूप नाम त्यासी कांहीं नाहीं। ४ ।

७१७. तेव्ह क्षिराब्धिसी आले ते सकळ। करूनि निश्चळ मनामाजी। १ ।
प्राणायाम मुद्रा लावुनि अंतरीं। इंद्रादि श्रीहरि चिंतूनियां। २ ।
विराट जें पाहीं संस्कृतें वर्णियेलें। तेंचि चिंतियेलें नामा म्हणे। ३ ।

## ↔ पूर्णब्रह्म भगवान् श्रीकृष्णांचे जन्मकाळाचे अभंग ↔

### श्रावण वद्य अष्टमी

७१८. पापी जे अभक्त दैत्य ते माजले। धरणीसीं झालें ओझें त्यांचें। १ ।
दिधलासे त्रास ऋषि मुनि सर्वां। न पूजिती देवा कोणी एक। २ ।
राहियेले यज्ञ मोडिलें किर्तन। पळाले ब्राह्मण दैत्यां भेणें। ३ ।
वत्सरूपी पृथ्वी ब्रह्म्यापाशीं जाय। नेत्रीं वाहे तोय सांगतसे। ४ ।
बुडविला धर्म अधर्म झाला फार। सोसवेना भार मज आतां। ५ ।
ब्रह्मा इंद्र आणि बरोबरी शीव। चालियेले सर्व क्षिराब्धीशीं। ६ ।
नामा म्हणे आतां करितील स्तुती। सावधान चित्तीं परिसावें। ७ ।

७१९. वासुदेवा हृषिकेशा माधवा मधुसूदना। करिताती स्तवना पुरूषसूक्तें। १ ।
पद्मनाभा त्रिलोकेशा वामना शेषशायी। आम्हां कोणी नाहीं तुजवीण। २ ।
जनार्दना हरि श्रीवत्स गरूडध्वजा। पाव अधोक्षजा आतां आम्हा। ३ ।
वराहा पुंडरीका नृसिंह नरांतका। वैकुंठनायका देवराया। ४ ।
अच्युता शाश्वता अनंता अज अव्यया। कृपेच्या अभया देईं आम्हां। ५ ।
नारायणा देवाध्यक्षा कैटभभंजना। कंरीर मर्दना दुष्टाचिया। ६ ।
चक्रगदाशंखपाणी नरोत्तमा। पाव पुरूषोत्तमा दासा तुझ्या। ७ ।
रामा हयग्रीवा भीष्मा रौद्रोद्भवा। आश्रय भूतां सर्वां तुझा असे। ८ ।
श्रीधरा श्रीपति चतुर्बाहो मेघःशामा। लेंकुरें आम्ही आम्हां पाव त्वरें। ९ ।
नामा म्हणे ऐसें करितां स्तवन। तोषला भगवान क्षिराब्धींत। १० ।

संत नामदेवांना पुरुषसूक्त ज्ञात होते.

७२०. आकाशवाणी होय सांगे सकळांसी । तळमळ मानसीं करूं नका । १ ।
देवकीच्या गर्भी येईल भगवान । रक्षील ब्राह्मण गाई भक्त । २ ।
उतरील भार मारील दैत्यांसी । आनंद सर्वांशी करील तो । ३ ।
रोहिणी उदरीं शेष बळिभद्र । यादव समग्र व्हारे तुम्ही । ४ ।
ऐकोनियां ऐसें आनंद मानसीं । येती स्वस्थळासी नामा म्हणे । ५ ।

७२१. अकस्मात तेथें उठली ते वाणी । नका भिऊं म्हणोनि मेघरूपा । १ ।
ऐकतांचि कानीं हरूषले मनीं । देवाचिया श्रेणी नामा म्हणे । २ ।

७२२. गौळियाचे घरीं रहिवास गोकुळीं । तेथें तुम्ही सकळीं वास कीजे । १ ।
वसुदेव देवकी उदरीं जन्मेन । कंसभयें राहीन गोकुळीं हो । २ ।
तेथें आहे काज कळेल सकळां । आनंद सोहळा पुरवीन । ३ ।
नामा म्हणे ऐसें देव बोलियेले । आपण ते गेले निजधामा । ४ ।

७२३. तयेकाळीं देव गोकुळीं भरले । अगोचर झाले ठायीं रूप । १ ।
सकळ संपत्ति भरूनि उरल्या । दिगंतरी गेल्या विपत्ति त्या । २ ।
नामदेवा तेव्हां आनंद तो झाला । गोकुळीं भरला पांडुरंग । ३ ।

७२४. शेषशायी हरी उठोनि लवकरी । म्हणे सख्या धरीं मनुष्यरूप । १ ।
तुजविण मज न गमे घटिका । म्हणोनि नेटका रूप धरीं । २ ।
देवकी उदरा जाऊनि रिघावें । अंतरीं वसावें रोहिणीच्या । ३ ।
तुझियेचि सवे येतां मी माघारा । नामया दातारा कळों आलें । ४ ।

७२५. शेषाप्रती बोले लक्ष्मीचा वर । चला अवतार घेऊं आतां । १ ।
पृथ्वीवरी दैत्य मातले ते फार । गाऱ्हाणें सुरवर सांगूं आले । २ ।
शेष म्हणे मज श्रम झाले फार । यालागीं अवतार मी न घेचि । ३ ।
रामअवतारीं झालों लक्षुमण । सेविलें अरण्य तुम्हां सवें । ४ ।
चौदा वर्षांवरी केलें उपोषण । जाणतां आपण प्रत्यक्ष हें । ५ ।
नामा म्हणे ऐसें वदे धरणीधर । हांसोनि श्रीधर काय बोले । ६ ।

७२६. पूर्वी तूं अनुज झालासी कनिष्ट। सोशियेलें कष्ट मजसवें । १ ।
आतां तू वडील होईंगा सर्वज्ञा। पाळीन मी आज्ञा तुझी बा रे। २ ।
देवकीउदरीं राहावें जावोनि । मायेसी मागुनि पाठवितों। ३ ।
योगमाया तुज काढील तेथून। घालील नेऊन गोकुळासी। ४ ।
लक्ष्मीशीं सांगे तेव्हां हृषिकेशी। कौंडण्यपुराशी जावें तुम्हीं। ५ ।
नामा म्हणे ऐसा करूनि विचार । घ्यावया अवतार सिद्ध झाले। ६ ।

७२७. वसुदेवा देत देवकी बहीण। लग्नामध्यें विघ्न झालें ऐका। १ ।
आकाशींची वाणी सांगतसे कंसा। मानी हा भरंवसा बोलण्याचा। २ ।
आठवा इचा पुत्र वधील तुजशी। ऐकोनि मानसीं क्रोधावला। ३ ।
घेऊनियां खड्ग माराया धांवला। हात तो धरीला वसुदेवें । ४ ।
देईन मी पुत्र सत्य माझें मानीं। ठेवा बंदीखानीं दूता सांगे । ५ ।
पुण्य सारावया भेटे देवऋषी। वधी बाळकांशी ठेवूं नको। ६ ।
होतांची प्रसूत नेऊनियां देत। साहाही मारीत दुराचारी। ७ ।
धन्य त्याचें ज्ञान न करीच शोक। वधितां बालक नामा म्हणे। ८ ।

७२८. सातवा जो गर्भ योगमाया नेत। आश्चर्य करीत मनामाजी। १ ।
रोहिणी उदरीं नेवोनि घातला। न कळे कोणाला देवावीण। २ ।
कंसाचिया भेणें यादव पळाले। ब्राह्मण राहिले अरण्यांत। ३ ।
नाहीं कोणा सुख तळमळ मानसीं। वधील दुष्टांसी कोण आतां। ४ ।
विश्वाचा जो आत्मा कळलें तयाला। दावितसे लीला संभूतींची। ५ ।
अहर्निशीं ध्यान भक्तांचे मानसीं। स्थापील धर्मासी नामा म्हणे। ६ ।

७२९. देवकी कवण वसुदेव कवण। सांगावी हे खूण अंगवळा। १ ।
ऐकोनि उत्तर देव मनीं पाही। बोलतां लवलाही चित्त देईं। २ ।
सुतपा प्रती ते अनुष्ठानी दोघे। करूनियां तपें वर मागे। ३ ।
तया दिला वर पुत्र मी होईन। यालागीं कारण आहे तेथें। ४ ।

तींचि दोघें झालीं वसुदेव देवकी। म्हणोनि यादवीं जन्म घेणें। ५।
तयाचा वृत्तांत आतां कोळें आहे। सांगेन लवलाहें नामा म्हणे। ६।

७३०. जेथें नाहीं कांहीं नाम रूप गुण। बोलती निर्गुण तयालागीं। १।
तोचि गोकुळांत होऊनि गोवळ। म्हणवितो बाळ यशोदेचा। २।
चिन्मय चिद्रूप अक्षई अपार। परहूनि पर म्हणती ज्यातें। ३।
सर्वां भूतांचें फुटकियें खांळे। भरलें न गळे आत्मपणें। ४।
आनंदी आनंद मातला अपार। वेदालाही पार नाहीं ज्याचा। ५।
नामा म्हणे सर्वरूपें जें रूपस। गोकुळीं विलास मांडियेला। ६।

७३१. अवतरले हरी नंदाचे मंदिरीं। जाणोनियां सुरी तोषिजेत। १।
आतां गेली सर्व आमुची चिंता। भूभार सर्वथा उतरील। २।
यज्ञ दान तप होतील अपार। आमुचा आहार आम्हांलागीं। ३।
दुष्ट दुराचारी मातले राक्षस। यांचा करील नाश क्षणामाजी। ४।
नीति न्याय धर्म वाढेल अपार। भाविकांसी पार उतरील। ५।
नामा म्हणे ऐशा आनंदानें सुर। वर्षताती भार सुमनाचे। ६।

७३२. देवकीचें तेज दिसे जैसा सूर्य। कंसाचें हृदय जळतसे। १।
हरणें पळती देखोनियां व्याघ्र। कांपे थरथर तैशापरी। २।
अजासर्पन्यायें कीटकभ्रमर। दिसती नारीनर कृष्णरूप। ३।
जेवितां बोलतां शेजेसी तो निजे। आला आला मज माराावया। ४।
नाशील हा आतां दैत्याचें तें बंड। फाटलीसे गांड तेव्हां त्याची। ५।
नामा म्हणे भयें लागलेंसे ध्यान। चराचरीं कृष्ण दिसतसे। ६।

७३३. विमानांची दाटी अंतरिक्षीं देव। करिताती सर्व गर्भस्तुती। १।
सत्रा अक्षरांत असे तुझी मूर्ति। यज्ञेशा तुजप्रती नमो नमो। २।
साहाजणें भांडती नवजणी स्थापिती। न कळे कोणाप्रती अंत तुझा। ३।
अठराजण तुझी वर्णिताती कीर्ति। गुणातीता श्रीपति नमो तुज। ४।

चौघां जणां तुझा न कळेचि पार। श्रमसी वारंवार आम्हांसाठीं। ५ ।
अठ्यांशीं सहस्त्र वर्णिताती तुज। ब्रह्मांडाचें बीज तुज नमो। ६ ।
जन्ममरणाचें नाहीं तया भय । आठविती पाय तुझे जे कां। ७ ।
नवजणी तुझ्या पायीं लोळताती। परब्रह्म मूर्ति तुज नमो। ८ ।
नामा म्हणे ऐशी करिताती स्तुती। पुष्पें वाहूनि जाती स्वस्थळासी। ९ ।

७३४. मयूरादि पक्षी नृत्य करीताती। नद्या वाहताती दोहीं थड्या। १ ।
भूमीवरी सडे केशर कस्तुरी। आनंद अंतरीं सकळांच्या। २ ।
विमानांची दाटी सुरवर येती। गंधर्व गाताती सप्तस्वरें। ३ ।
मंदमंद मेघ गर्जना करीती। वाद्यें वाजताती नानापरी। ४ ।
नामा म्हणे स्वर्गी नगारे वाजती। अप्सरा नाचती आनंदानें। ५ ।

७३५. दशरथें मास्लि तोचि होता मास। वर्षाऋतु असे कृष्णपक्ष। १ ।
वसुनाम तिथी बुधवार असे। शुक सांगतसे परीक्षिती। २ ।
रोहिणी नक्षत्र दोन प्रहरारात्र। माया घाली अस्त्र रक्षपाळां। ३ ।
नवग्रह अनुकूळ सर्वांचें जें मूळ। वसुदेव कपाळ धन्य धन्य। ४ ।
जयाचा हा वंश तयासी आनंद। माझे कुळीं गोविंद अवतरला। ५ ।
अयोनीसंभव नोहे कांहीं श्रमीं। नामयाचा स्वामी प्रगटला। ६ ।

जन्माष्टमीला जन्मकाळाचे वरील अभंग म्हणून पुष्पवृष्टी करावी. कृष्णकृष्णजय राधाकृष्णजय भजन करावे. सुंठवडा वाटावा. पारंपारिक वा युगे अठ्ठाविसे आरती म्हणावी. निदान आपले घरी उत्सव करावा.

७३६. कोटिसा आदित्या गोठे एके ठायीं। तेजें दिशा दाही उजळल्या। १ ।
घाबरा होवोनी वसुदेव पाहे। हृदयीं आश्चर्य करीतसे। २ ।
मुकुटावरी रत्न नक्षत्रांचा मेळा। भाळीं शोभे टिळा केशराचा। ३ ।
व्यंकटा भृकुटी कमलाकार नेत्र। नासीक विचित्र शुकचंचू। ४ ।
विद्युल्लते ऐसी झळकती कुंडलें। अधर कोंवळे अरुणोदय। ५ ।
कंबुग्रीव कंठ हृदयीं वत्सलांछन। ब्रह्मयासी सीण न कळे अंत। ६ ।

चतुर्भुज शंखचक्रगदापद्म । चिमणा मेघःशाम वर्ण ज्याचा । ७ ।
कौस्तुभ निर्मळ वैजयंती माळा । कासे सोनसळा हाटकवर्ण । ८ ।
रुणझुण रुणझुण वाजताती वाळे । आरक्त वर्तुळें नखीं शोभा । ९ ।
ध्वजवज्रांकुश जैसीं रातोत्पळें । नामा म्हणे डोळे दिपताती । १० ।

७३७. अयुत गायी ब्राह्मणार्सी । सोडी संकल्प मानसीं । १ ।
ओळखिलें तुज । आतां कळलासी मज । २ ।
धर्म स्थापावया । येथें येसी देवराया । ३ ।
आलिंगितां दोहीं बाहीं । नामा म्हणे डोई पायीं । ४ ।

७३८. सोडा सोडा मिठी । लपवा लपवा जगजेठी । १ ।
झणीं कंसासी कळेल । माझ्या बाळासी मारील । २ ।
वसुदेव चिंता मनीं । तेज न माये गगनीं । ३ ।
नामा म्हणे आलें हासें । देव तेव्हां सांगतसे । ४ ।

७३९. नंदाच्या घराला । मज नेईं गोकुळाला । १ ।
माया उपजली तेथें । ठेवीं मज आणीं येथें । २ ।
म्हणसी असे रक्षपाळ । ते म्यां मोहिले सकळ । ३ ।
आच्छादित रूप । नामा म्हणे माझा बाप । ४ ।

७४०. उचलिला कमळापती । पायींची बंधनें गळती । १ ।
त्रैलोक्यांत जो न माय । त्यासी बंधन करील काय । २ ।
कवाडें उघडती । देखतांची देवाप्रती । ३ ।
मंद मंद पडे पाऊस । शिरीं छाया करी शेष । ४ ।
पूर चढला अचाट । त्यासी लाविला अंगुष्ट । ५ ।
त्वरें आला नंदाघरीं । निद्रिस्थ त्या नरनारी । ६ ।
ठेवी तेथें कृष्णजीला । माया घेऊनि निघाला । ७ ।
रडे माया करी आकांत । नामा म्हणे उठती दूत । ८ ।

७४१. पूर्णब्रह्म मानी कंसाच्या भयासी । वाटेल मानसीं कोणाचिया । १ ।
इच्छामात्रें करी सृष्टीचा प्रलय । त्यासी असे भय कवणाचें । २ ।
नंदाचें सुकृत झालें अगणित । म्हणोनी भगवंत आला तेथें । ३ ।
सर्वां होय सुख तरतील लोक । नामा म्हणे शुक सांगतसे । ४ ।

७४२. तांतडीनें जाती । कंसा सेवक सांगती । १ ।
उपजला वैरी । त्यासी तूं रे त्वरें मारी । २ ।
त्वरें धांव घाली । पाहे कन्या उपजली । ३ ।
ज्याचा धाक तूज । नव्हे कन्या द्यावी मज । ४ ।
मारायाशीं खड्ग घाली । हातिंची निसटूनियां गेली । ५ ।
तुजलागीं वधी । उपजला मज आधीं । ६ ।
सांगे ब्रह्मज्ञान । देवकीचें समाधान । ७ ।
नामा म्हणे तयेवेळीं । त्यांचीं बंधनें काढिलीं । ८ ।

७४३. गौळण सांगे गौळणीला । पुत्र झाला यशोदेला । १ ।
एक धांवे एकीपुढें । वांटीताती सुंठवडे । २ ।
वाण भरोनिया ताटी । यशोदेच्या घरा दाटी । ३ ।
ऐसी गलबल झाली । दासी जनी हेल घाली । ४ ।

७४४. शुक म्हणे राया ऐक परीक्षिती । श्रवण करितां तृप्ति नाहीं तुज । १ ।
माया जातां मथुरा सावध निद्रिस्थ । देखिला भगवंत यशोदेनें । २ ।
अनंत ब्रह्मांडें उदरीं न कळे कोणाला । वाजविती थाळा जन्मकाळीं । ३ ।
यज्ञभोक्ता कृष्ण त्यासी देती बोळा । ध्यानीं ध्याय भोळा सदाशिव । ४ ।
गौळणी बाहाती नंदालागीं तेव्हां । पुत्रमुख पाहा नामा म्हणे । ५ ।

७४५. विश्वात्मा जो बाप हर्ता त्याच्या सूत्र । म्हणविती पुत्र नंदजीचा । १ ।
तीर्थे ज्याच्या चरणीं करिताती न्हाणीं । यशोदा जननी म्हणताती । २ ।
वेंडावला शेष शिणले वेद चारी । निजे मांडीवरी यशोदेच्या । ३ ।

शरणागता देत क्षीरसिंधु जाण। चोखीतसे स्तन आवडीनें। ४ ।
त्रैलोक्याचा राजा वर्णूं काय रंक। एकावें जातक नामा म्हणे। ५ ।

७४६. नंदे करूनियां स्नान। वस्त्रें घेतलीं नूतन। १ ।
पाचारा ब्राह्मण। शृंगारावें देवसदन । २ ।
बाहा बाहा दशग्रंथी। त्यासी सांगां आणा पोथी। ३ ।
त्वरें बाहारे ज्योतिषी। नंद करी जातकासी। ४ ।
केलें देवतार्चन। द्विज सांगती तर्पण। ५ ।
फार त्याला सुख। पाहे कृष्णजीचें मुख। ६ ।
करी पुण्यहवाचनें। नामा म्हणे आनंदानें। ७ ।

७४७. आला जगदीश्वर। त्याचें भरलें भांडार। १ ।
सुशोभित दिसे मही । दोन लक्ष दिधल्या गायी। २ ।
तिळ तांदूळ पर्वत। द्रव्यें वांटी अगणित। ३ ।
एक जाती एक येती। ओझें उचलितां कुंथती। ४ ।
भाट वर्णिताती। नामा म्हणे ज्याची कीर्ति। ५ ।

७४८. तुतारे भोंवारें वाजंत्रें वाजती। अप्सरा नाचती थैयथैय। १ ।
झण झण झण झांजा गर्जताती । नौबदा वाजती धोधोधोधो। २ ।
सुरवर येती विमानाची दाटी । करिती पुष्पवृष्टि देवावरी। ३ ।
नारद तुंबर किन्नर गंधर्व । व्योमीं गाती सर्व सप्तस्वरीं। ४ ।
कीर्तनाचा घोष नामाचा गजर। मृदंग सुस्वर वाजताती। ५ ।
केशर गंधाचे टिळक लावीती भाळा। घाली पुष्पमाळा द्विजांकंठीं। ६ ।
घरोघरीं नंद धाडी शर्करेशी। वस्त्रें सुहृदांसी नामा म्हणे। ७ ।

७४९. ब्राह्मण आशिर्वाद देती। नंदा पुसोनि निघती। १ ।
चलाचला म्हणती लोक। पाहूं नंदाचें बाळक। २ ।
नरनारी अलंकार। शृंगारिलें सर्वपूर। ३ ।
दैन्य दारिद्र अपेश। पळती मानूनियां त्रास। ४ ।

आणिताती बाळलेण। स्त्रिया पाहताती कृष्ण। ५ ।
नामा म्हणे पाहतां मुख। देहभाव जाय सकळीक। ६ ।

७५०. जो जो जो जो रे, मधुसुदना। बाळा जगजीवना।
हालवी यशोदा, पाळणा। निज बा नारायणा।
बाळा जो जो रे।धृ०।
प्रथम अवतारीं। स्तवन, करितांचि पैं विधि।
करूणासागर गुणनिधी। शंखासुर वधोनि। १ ।
द्वितीये संकटी। इंद्रासी, कूर्मरूप होसी।
सिंधु मंथूनियां, श्रमलासी। सौख्य समस्तां देसी। २ ।
त्रितीये वराह, हिरण्याक्षी। धरूनी त्याची कुक्षी।
पळतां धरियेला, अनुलक्षी। फोडुनी त्याची वक्षी। ३ ।
चतुर्थ नरसिंह, विशाळ। अग्नीचा कल्लोळ।
निवटूनि, असुर तेजाळ। काढी अंत्रमाळ। ४ ।
पंचम वामन, सुंदर। क्षिराब्धीचा वर।
जेणें भुलविला, दिनकर। हरिला दानासुर। ५ ।
पष्ठम भार्गव, अभिदानीं। पिता जमदग्नी।
पृथ्वी नि:क्षेत्री, त्रिब्राणीं। दिधली विप्रा दानीं। ६ ।
सप्तम अयोध्या, पुरवासी। राजाराम होसी।
पितृवचनाचे, नामासी। राहुनियां वनवासी। ७ ।
अष्टम अवतार, गोकुळीं। जन्मला वनमाळी।
चाणूर कंसाची, मंडळी। जाळुनी केली होळी। ८ ।
नवम बौध्य, अवतार। पुढें येती युगांतर।
दशम कलंकी, होणार। नामा म्हणे संता। ९ ।

७५१. पाटावरी बैसविती। गोपी अक्षवाणें करिती। १ ।
ब्रह्मादिक न देखती माथा। त्यासीं लाविती अक्षता। २ ।

नव्हे प्राकृत बाळक। परस्परें म्हणती लोक । ३ ।
ध्वज वज्रांकुश चिन्हा। आला वैकुंठींचा राणा । ४ ।
प्रेती वेळोवेळां । नामा म्हणे पाहाती डोळां । ५ ।

९५२. जो [illegible] । तो चोरोनी खाये लोणी नवल देखा । १ ।
तो न माये भूतळीं वेदार्थांहि न कळे। तो बांधिला उखळे नवल देखा । २ ।
एका पादें करूनी आक्रमी मेदिनी । त्यासी बाळ् [illegible] गवळणी नवल देखा । ३ ।
त्याचें मायेचेनी कुवाडे ब्रह्मादिक वेडे । तो बागुल म्हणतां दडे नवल देखा । ४ ।
दानवांची कोटी हेळाचि निवटी । त्यातें माता भवें दावी [illegible] नवल देखा । ५ ।
नामा म्हणे हरी विश्वीं विश्वंभरी । तो बाळ नंदाघरीं नवल देखा । ६ ।

९५३. पहिला बागुल तो ऐसा । त्याचें नांव म्हणती मासा ।
शंखासुर वधिला कैसा । चारी वेद आणिले । १ ।
कृष्णा राहेरे उगला । नाहीं तर सांगेन त्या बागुला ।
गुसळणाशी उशीर झाला । रवी सोड गोविंदा ।धृ०।
दुसरा बागुल बोलती । नाम कांसव म्हणती ।
जेणें सृष्टि धरली पृष्ठीं । पाय पोटीं सूदले । कृष्णा० । २ ।
तिसरा बागुल बोलती । नाम वराह म्हणती ।
जेणें दाढे धरिली क्षितीं। दैत्य थोर मारिले । कृष्णा० । ३ ।
चवथा बागुल नरहरी। थोर खांबांत गुरगुरी ।
दैत्य वधोनि मांडीवरी । भक्त प्रल्हाद रक्षिला । कृष्णा० । ४ ।
पांचवा बागुल ब्रह्मचारी । उभा असे बळिचे द्वारीं ।
भिक्षा मागोनि निर्धारी । बळीचें द्वार रक्षिलें । कृष्णा० । ५ ।
सहावा बागुल बोलती । नाम परशुराम म्हणती ।
ज्यानें वधिलें मातेप्रती । पितृवचन मानुनी । कृष्णा० । ६ ।
सातवा बागुल सत्त्वाचा । राम म्हणती दशरथाचा ।
रावण वधोनि दशमुखांचा । जानकीसी आणिलें । कृष्णा० । ७ ।

आठवा बागुल बोलती । गोकुळीं थोर आहे ख्याती ।
त्यानें वधिलें कंसाप्रती । देव सुखी केले । कृष्णा० । ८ ।
नववा बागुल बोलती । नांव बौद्ध म्हणती ।
कोणा न कळे त्याची गती । बौद्धरूपें राहिला । कृष्णा० । ९ ।
होतां कलंकीचा रथु । वेगीं येईबा धांवतु ।
नामा म्हणे पंढरिनाथु । बागुल तूं झालासी । कृष्णा० । १० ।

७५४. द्रव्य द्यावयासी । नंद गेला मथुरेसी । १ ।
तेथें भेटे वसुदेव । पुसें सुखी आहां सर्व । २ ।
कंसाचे मानसीं । घात इच्छी गोकुळासी । ३ ।
जाईं जाईं त्वरित । होती गोकुळीं आघात । ४ ।
नामा म्हणे ऐसें सांगे । नंद तेथुनिया निघे । ५ ।

७५५. पुण्यवंता दावी बाळलीला देव । पालथा केशव पडे तेव्हां । १ ।
नंदें उत्साहासीं केलें तेव्हां फार । दिधलें अपार द्रव्य द्विजां । २ ।
यशोदा घेतसे देवाचें चुंबन । तुजला न्हाणीन तान्हा माझ्या । ३ ।
चोंगईचा मुका घेताती गौळणी । हांसे चक्रपाणि आनंदानें । ४ ।
नामयाचा स्वामी मंद मंद हांसे । यशोदा करितसे निंबलोण । ५ ।

७५६. क्षीर सागरीचा हरी । तान्हा यशोदेच्या घरीं । १ ।
रांगूं लागला अंगणीं । माथा जाऊळाची वेणी । २ ।
पायीं पैंजण वाकी वाळे । हातीं नवनीताचे गोळे । ३ ।
नामा मुखाकडे पाहे । धन्य यशोदा बो माय । ४ ।

७५७. मांडीवरी घेत यशोदा सुंदरी । आळवी श्रीहरि नाना युक्ती । १ ।
तूंची माझा प्राण तूं माझी माउली । तूं माझी बहिणुली कान्हाबाई । २ ।
गणगोत भाऊ तूंची माझा सखा । संसार लटिका तुजवीण । ३ ।
तूंचि माझा धन तूंची माझें जीवन । चुंबीत वदन वेळोवेळां । ४ ।
नामा म्हणे भार घाली मांडीवरी । ठेवी भूमीवरी कृष्णजीला । ५ ।

७५८. गर्ग आले गोकुळासीं। हर्ष न माये मानसीं। १ ।
नंदें गर्गातें देखिलें । पूजा स्तवनीं तोषविलें । २ ।
भूतभविष्यवर्तमान । तुम्हां कळती हो संपूर्ण। ३ ।
पाहा सामुद्रिक लक्षण। याचें कांहीं सांगा चिन्ह । ४ ।
बोले तेव्हां तो नंदाशीं । इणीं कळेल कंसासी। ५ ।
रोहिणीनंदादि बैसती । ऐकावया जातक चित्तीं । ६ ।
घालूनियां मंगलस्नान। आरंभीं पुण्याहवाचन । ७ ।
ऐसी वदे शुकवाणी । नामा म्हणे ऐका कानीं । ८ ।

७५९. जन्मजन्मांतरीं झाला तुज श्रम । म्हणोनियां ब्रह्म आलें येथें। १ ।
राखतील गाई मारीतील दुष्ट। न करी बोभाट जनामध्यें। २ ।
द्वादश गांव अग्नि करील प्राशन। वांचतील प्राण सकळांचे। ३ ।
चोरोनियां गाई नेईल सौंगडे। लावील हो वेड ब्रह्मयासी । ४ ।
उचलील पर्वत हरील हा गर्व । तारील हा सर्व नाममात्रें। ५ ।
समुद्रीं हा नगरी रचील क्षणांत। चरित्र अद्‌भुत करील हा। ६ ।
सोळा सहस्त्र शत अष्ट नायिका। करील बाईका तुझा कृष्ण। ७ ।
त्रैलोक्यांत हाची उदाराचा राणा। देईल ब्राह्मणा हेमपुरी। ८ ।
सांगुनिया ऐसें आशीर्वाद देऊनि। नामा म्हणे मुनि जाता झाला। ९ ।

७६०. दौंदील दौंदील टमकत चाले। गोजिरीं पाउलें घालोनियां। १ ।
पायीं रुणझुण रुणझुणिती वाळे। गोपी पाहतां डोळे मन निवे। २ ।
सांवळें सगुण मानसमोहन । गोपीमनरंजन म्हणे नामा । ३ ।

७६१. बोलावुनी अवघीयातें । कंस पाहे विचारातें। १ ।
तोणी एक रे बोलनी । आम्हां ठावी देववस्ती । २ ।
येथें पुराण कीर्तन । गाईब्राह्मण करिती यज्ञ । ३ ।
तेथें असे नारायण । वधूं तयासी जाऊन। ४ ।

वैरी सहजची मरेल । ऐसे बोलताती बोल । ५ ।
कंसा मानवलें जाण । करा मजसाठी यत्न । ६ ।
नामयाचा छंद । नंद करितो आनंद । ७ ।

७६२. कंसा हातीं विडा पाहे चहूंकडा । पूतना त्या पुढां काय बोले । १ ।
जाईन गोकुळा वधीन त्या बाळा । ऐसी त्या चांडाळा बोलतसे । २ ।
विष भरूनि स्तन निघाली पूतना । तीतें देखुनी कान्हा दूध मागे । ३ ।
येऊनि द्वारीं थोकली तंव यशोदा देखिली । कृष्णा आली माउली राहें उगा । ४ ।
तंव अधिकचि आळी करी वनमाळी । वैरी म्हणे दे जवळी पाजीन दूध । ५ ।
पुतने वोसंगा दिधलासे कान्हा । घटघट पय पाना करीतसे । ६ ।
शोषियलें विख न धायची भूक । नामया स्वामी न राखे प्राण तिचा । ७ ।

७६३. कंसें पाठविली मायावी पूतना । देवोनिया स्तना बाळें मारी । १ ।
दीन दुर्बळांचीं मारीत बाळकें । करीताती शोक मायबाप । २ ।
गहिंवरोनि तेव्हां पुसे परीक्षिती । भगवंताची मूर्ती बाळरूप । ३ ।
अभय देतसे बापा नको रडूं । तें काय चुंगुडूं मारूं शके । ४ ।
जेथें पुराण कीर्तन होत नामघोष । तेथें यम त्रास घेत असे । ५ ।
पळती तेथुनि असुरादिक वैरी । तेथें नाहीं थोरी पाप तापा । ६ ।
नामा म्हणे आली नंदाचिये घरीं । स्वरूप सुंदरी देवांगना । ७ ।

७६४. कृष्णा लावितसे स्तनीं । तिसी मारी चक्रपाणि । १ ।
भयाभीत पडे प्रेत । जन विस्मय करीत । २ ।
रडे तेव्हां माया । वांचलासी बा तान्हया । ३ ।
मिळोनियां समस्त । भाळी अंगारा लावीत । ४ ।
वसुदेवें सांगितलें । नंद म्हणे तैसें झालें । ५ ।
कुऱ्हाडी आणिती । गात्रें निकुरें तोडिती । ६ ।
नामा म्हणे दिला अग्नी । वास न मावे गगनीं । ७ ।

७६५. श्रीकृष्ण जन्मला ग्रानां ही ऐकांनीं। चिंता कंसा मनीं प्रवर्तली। १ ।
उद्विग्न मानसीं कंस तो बैसला। सन्मुख देखिला महाबळ। २ ।
गौरवोनि त्यासी सांगे वर्तमान। शत्रुसी जाऊनि कोण मारी। ३ ।
महाबळ दैत्य प्रतिज्ञा बोलत। शत्रुसी त्वरित मारीन मी। ४ ।
नामा म्हणे ऐसा बोलुनि निघाला। वेष धरियेला तेणें कपट। ५ ।

७६६. विप्र वेष तेव्हां घेऊनि निघाला। गोकुळासी आला लागवेगें। १ ।
पुत्रोत्सव कोठें लोकांला पुसत। भाविक सांगत नंदाघरीं। २ ।
ऐकोनियां ऐसें आला अकस्मात। यशोदा देखत सन्मुख त्या। ३ ।
श्रीकृष्णासी तेव्हां वोसंगीं घेतलें। दंडवत केलें ब्राह्मणासीं। ४ ।
सन्मुख बैसोनि वर्तमान पुसे। बाळाचें या कैसें चिन्ह सांगा। ५ ।
पंचांग त्या वेळीं टाकिलें कपटासी। मान तुकावोनि पाहातसे। ६ ।
नामा म्हणे मैंदें पंचांग पाहून। यशोदे लागून बोलतसे। ७ ।

७६७. तुझिया पुत्रासी लागलेंसे मूळ। करील निर्मूळ सर्वत्रांचें। १ ।
बाळकाचे अंगीं अवचिन्हें बहुत। नेऊनि गर्तेत टाका यासी। २ ।
लोभ धरूनियां ठेवाल बाळासी। ग्रासील सर्वांसी एकदांची। ३ ।
ऐकोनी यशोदा गहिवरोनी बोले। गर्गांनीं कथियेले उत्तम गुण। ४ ।
अमंगळ वाणी पुनरपि बोलिला। गर्ग तो चुकला गणितासी। ५ ।
स्तनपान करीत असतां श्रीकृष्ण। मांडिलें विंदान नामा म्हणे। ६ ।

७६८. ठांईहुनि जातीं उखळें उडताती। मस्तकीं पडताती येवोनियां। १ ।
पाटे वरवंटे वसुपात्रालागीं। जीव त्या प्रसंगीं येता झाला। २ ।
पाबरे दुर्जन पळाया पाहात। आडव्या ठाकत बाजा पुढें। ३ ।
जानवें तुटलें पंचांग फाटलें। धोतर गळालें ढुंगणाचें। ४ ।
पृष्ठीवरी होती बदबदां मार। तेथून सत्वर पळता झाला। ५ ।
आयुष्याची बाकी कांहीं उरली होती। म्हणोनि श्रीपति सोडी त्यातें। ६ ।
नामा म्हणे जीव घेऊनि पळाला। मथुरेसी आला कंसापाशीं। ७ ।

७६९. परीक्षिती राया सांगतसे शुक । वैकुंठनायक रांगतसे । १ ।
दुडदुडा पळती मुखीं लावी माती । शेणांत लोळती दोघेजण । २ ।
नंदाच्या पुढील ओढीताती ताट । मिटक्या मटमट वाजविती । ३ ।
कटीं कडदोरा वांकी घुंघुरवाळा । पिंपळपान भाळा शोभतसे । ४ ।
देवातें झांकिती वर्जिल्या रडती । घडोघडीं येती बिदीमाजीं । ५ ।
वत्साचिये पुच्छें बळें ओढिताती । खोडी न सोडिती दोघेजण । ६ ।
विमानांची दाटी येताती सुरवर । नामया दातार पाहावया । ७ ।

७७०. मृगाचिये शृंगें धरोनि नाचती । जन हांसताती खदखदां । १ ।
भोजना बैसती घांस घेती हातीं । मांजरें देखती दुरोनिया । २ ।
गळां त्यांच्या तेव्हां धरी मेघःश्याम । पुच्छ बळिराम ओढीतसे । ३ ।
यशोदा धांवत खदखदां हांसत । गौळणी समस्त पाहताती । ४ ।
पुसतांची मामा चोंगई दाविती । मर्कटाचे धरिती दोन्ही कान । ५ ।
रोहीणी म्हणे डसतील बाळा । किती म्यां याजला सांभाळावें । ६ ।
पाणी उडविती प्रतिबिंब पाहाती । गोरस सांडिती भूमीवरी । ७ ।
नामा म्हणे स्वामी सर्वांचा जो साक्षी । धरितसे पक्षी चुकवुनी । ८ ।

७७१. मुतुनिया हातें भूमी सारविती । पोटासी पुसती दोघेजण । १ ।
घेऊनियां काष्ठ घाशिताती दांत । वाकुल्या दावीत नंदालागीं । २ ।
जेवितां जेवितां बाहेर पळती । श्वानासी बाहाती यू यू करूनी । ३ ।
तयापुढें दोघे ठेवुनियां वाटी । घालिताती मिठी गळां त्याच्या । ४ ।
देखोनियां जन खदखदां हांसती । यशोदे सांगती कौतुकानें । ५ ।
भिंती धरूनियां उभे राहाताती । आधार जगतीं ज्यांचा असे । ६ ।
उभयतां जाती बिदीं खेळावया । कुरवंडी काया नामयाची । ७ ।

७७२. आले लागे हरि नंदाचे मंदिरीं । नाना क्रीडा करी नित्य नवी । १ ।
देखोनियां चोज भुलल्या नरनारी । देहभावें वरी वोंवाळिती । २ ।
सांवळें गोजिरें दिसे नेत्रालागीं । म्हणोनि वोसंगी सदा घेती । ३ ।

नाचे उडे बोले मंजुळ बोबडे । तेणें वेदां पडे मौन्य सदा । ४ ।
नित्य नवी लीला दाखवी अपार । मन तेथें स्थिर लांचावलें । ५ ।
नामा म्हणे गोप त्यासंगें रतले । प्रेमानें मानले एकसरें । ६ ।

७७३. बवें बवें बाळ कोडीमवाणे रे । यशोदा म्हणे दृष्टी होईल बा रे । १ ।
बरवी बरवी डोळस सांवळी । लोण उतरोनि हरीची पाउली । २ ।
चंदन पाटोळा कांसे सोनसळा । विष्णुदास नामा चरणाजवळा । ३ ।

७७४. कृष्णाचें चैतन्य गोळिया गोपाळा । जिवींचा जिव्हाळा कृष्ण एक । १ ।
। गमेचि तया कृष्ण संगाविणें । कृष्ण चरणीं मन सर्वकाळ । २ ।
कृष्ण सुख जिवीं कोंदलें सर्वांसी । उभे कृष्णापाशीं मागेंपुढें । ३ ।
ामा म्हणे कृष्ण भक्ताचें जीवन । कृष्णीं समाधान भक्तालागीं । ४ ।

७७५. मल्हार मल्हडें गगनीं दाटलें । विजु खळें गर्जिन्नलें गे माय । १ ।
ोविंद पाहाया लौकरी । कैसे वरूषताहे मधु धारी गे माय । २ ।
ानंदें मयुरें नाचती आपैसें । प्रेमें निळकंठ झाले कैसे । ३ ।
ामया स्वामी दृष्टी सोज्वळ । जीव लागला गोपाळें गे माय । ४ ।

७६. यशोदेचा बाळ अलगट । रूपें राजस बरवा बरवंट । १ ।
धीं लावूनि वेधिलें येणें मानस । आड घालुनि आपुला प्रकाश । २ ।
ापणासींच खेळे विनोदें । विश्व निववी तेणें सुखें निजबोधें । ३ ।
ष्टी याची पावे देखणीया । आड रिघोनि तेज सांवळें भरलें डोळियां । ४ ।
न मारोनि आर्त पुरविलें । रूप दावूनि चित्त माझें भुलविलें । ५ ।
मया स्वामी आसनीं शयनीं । दुरी नवजे डोळियापासोनि । ६ ।

७७. चंद्रबिंबासरी देखों जरी मुखा । कोटी चंद्रप्रभा देखा कृष्णमूर्ति । १ ।
ळलें चांदिणें रांगतां रंगणी । धन्य वो गौळणी सुखी तुम्ही । २ ।
नींचीं कुंडलें गुरुशुक्र बिंबलें । शिरीं तें शोभलें पिंपळपान । ३ ।
ग्री वाघनखें साजिरी ते सरी । कडदोरा वरी राजमासी । ४ ।

सुकुमार दोंदिलें किंकणी कटींतटीं। चरणीं नाद उठी नेपुरांचा। ५ ।
श्रुति समागमें नाद ऐके कानीं। संतोषोनि मनीं डुल्ले हरी। ६ ।
देखोनियां माते होय समाधान। उतरी निंबलोण मुखावरूनी। ७ ।
सच्चिदानंदघन तान्हुलें आपण। विष्णुदास नामयानें वोवाळिलें। ८ ।

७७८. घाघरिया छंदें चरण थवथवी। अरूणा दाखवी चरणतळीं। १ ।
आरुता येई कान्हा देई आलिंगन। उतरी निंबलोण मुखावरूनी। २ ।
वाघनखें कडदोरा कंठीं घालुनि सरी। झणीं तुज मुरारी दृष्टी लागे। ३ ।
अंबुलें लोळिया कंठी रिठे गांठी। छंदें जगजेठी हालवी मान। ४ ।
भाळीं चंदन वरी मर्माचा टिळकला। झणीं तुज गोपाळा दृष्टी लागे। ५ ।
नामयाचा स्वामी हरि माझें चित्त। छंदें गाऊं गीत नाचूं मी जाणें। ६ ।

७७९. कृष्ण डोल्तु रांगतु रंगणीं। इडापीडा धांवोनि घेती गोंळणी। १ ।
जीवापरीस हें वाल्हें बाळक। शिणलिया विसांवा त्याचें पाहे श्रीमुख। २ ।
सर्व सुख याचेनी मनोहरें। तेंचि खेळवितां धणी न पुरे। ३ ।
देह गेह नाठवे सर्वथा। सुत पतीची मावळली वार्ता। ४ ।
सुख न सांगवे वैखरी कोंदली। रूपीं रमतां मनें बुडी दिधली। ५ ।
नामया स्वामी सुखाचा सागरू। कृष्ण खेळवितां सुफळ हा संसारू। ६ ।

७८०. चाल सखिये वेगु करीं वहिला। दिन सरला काळ थोडा उरला। १ ।
आवडी घेऊं गे निजसुख धर्नीचें। आर्त पुरोनि जें उरलेंसे मनींचें। २ ।
कृष्णमुख पाहे दृष्टी भरोनि। चित्त सांडी कुरवंडी करोनि। ३ ।
झणीं विसरसी हे खूण निरुती। मग अंतरलें सर्व सुख पुढती। ४ ।
हाचि निर्धार करूनियां मानसीं। आंत बाहेरी हरिरूप देखसी। ५ ।
नामया स्वामी राजीवलोचनु। रमारमणु तो जीवींचा जीवनू। ६ ।

७८१. लडीवाळ लेकरू गोजिरवाणें। या देखता पारणें डोळीया। ध्रु.।
कान्हो न वचें बाहेरा। राजस पाऊले सुकुमारा। १ ।
दृष्टी पडे चालता कृष्णा तुझीया पाया। झाणी तूं नामया वेगळा होसी। २ ।

७८२. लडीवाळ लेकरू लडीवाळ गोजिरं । पाऊले गोजिरी कान्होबाची । १ ।
न वजे डोळीया वेगळा । माझ्या जीवांच्या जिव्हाळा कृष्णा तान्हुलिया । २ ।
तनुमनुप्राणाची कुरवंडी करीन । नामया स्वामी सांडीन ओवाळूनि । ३ ।

७८३. सोडीं कान्हा रवि दोर मथिल्या देतें ।
बया मज तें दे आई मज तें दे डेरां घुमघुमतें । १ ।
यशोदा उचलोनि । कडे त्यासी घेउनि । दाविती चित्रशाळेतें । २ ।
करीं कर धरूनी । नेउनी अंगणीं । दावी कुप बावीतें । ३ ।
दावीत आरशांत । म्हणे पाहे कृष्णनाथ । मुखमुखा चुंबितें । ४ ।
चिमण्या ह्या गौळणी । आल्या त्या हो मिळोनि । राधे उरीं मज तें दे । ५ ।
राधेसी म्हणे नामा । कृष्णासी तुझा प्रेमा । समजावियासी तें दे । ६ ।

७८४. प्रात:काळीं प्रहरा रात्रीं उठिल्या गौळणी बाळा ।
घुसळण मांडियेलें घरोघरीं सकळां ।
नित्यानंदें परमानंदें गाती गोपाळा ।
सहस्रापरी कैशा गाती मदन सांवळा । १ ।
घुम घुम करिती घुम घुम करिती डेरे घुमती ।
आनंदल्या गौळणी छंदें छंदें डोलती । ध्रु० ।
एक म्हणती साजणी तुम्हीं लपवा गे लोणी ।
नकळे नकळे हो बाई कृष्णाची करणी ।
कोणीकडून हा गे येईल सखये चक्रपाणी ।
खास खांदुनि तुम्हीं आतां लपवा दुधाणी । २ ।
बोलतां चालतां इतुक्यामध्यें हरी आला ।
कवणेंही नाहीं देव दृष्टी देखिला ।
सूक्ष्म रूप धरूनि डेऱ्यामध्यें प्रवेशला ।
वरच्यावरी देव लोणी खाऊनियां गेला । ३ ।
उन्हवणी शिळवणी घालिती परी ते लोणी येईना ।
काय झाले होण सासूबाई कळेना । ४ ।

हा हा गे बायांनो तुमचे जाणतें चाळे ।
यशोदेच्या मुला नेऊनि देतसां गोळे ।
उगेंचि मग पाहतां आतां फिरगे निराळे ।
मारी ठोसरे दोन्ही गाल्होंरे घेतले । ५ ।
डेऱ्यामधून मार माझा जगजीवन पाहे ।
नामा म्हणे धन्य धन्य वर्णूं मी काये । ६ ।

७८५. जाऊं पाण्या निसुरवाण्या । आळवीती गोड राण्या । ध्रु० ।
गोविंद गीतीं गाऊं गोविंद गीतीं गाऊं । आनंदें जाऊं पाण्या । १ ।
खाऊं कंदमुळें आम्ही असों वनीं । न देखों श्रीकृष्ण न ऐकों कानीं । २ ।
आम्ही गोड भिल्लिणी काय ऐसी गोडी । तुझिया नामाची लागली आवडी । ३ ।
आजीचा दिवस आम्हां झालासे आनंदु । विष्णुदास नामा यानें लावियेला छंदु । ४ ।

७८६. यशोदा घुसळीत । स्तन मागे भगवंत । १ ।
आड घालोनि पदर । पाजीतसे जगदीश्वर । २ ।
दुध जातसे उतोन । उठे कृष्णासी टाकून । ३ ।
मंथन पात्रातें फोडीत । पळे तेथुनि त्वरित । ४ ।
मागें धांवली यशोदा । धरावया त्या गोविंदा । ५ ।
हातीं न लगे जगजेठी । नामा म्हणे होय कष्टी । ६ ।

७८७. कृपा उपजली । उभा राहे वनमाळी । १ ।
धरूनि आणिला । आजी बांधीन मी तुला । २ ।
दावें सोडुनियां । बांधितसे देवराया । ३ ।
फार करितोसी खोड्या । गोपी दाविती वांकुल्या । ४ ।
दावीं अनंत लावीत । दोन बोटें उणें येत । ५ ।
करिताती चोज । परी नव्हेचि उमज । ६ ।
श्रमतसे वारंवार । पुरती करी जगदोद्धार । ७ ।
विष्णुदास नामा पुढें । आला जेथें उभीं झाडें । ८ ।

७८८. कुबेराचे पुत्र मदोन्मत्त झाले। म्हणूनि शापिलें नारदानें। १ ।
व्हाल तुम्हीं वृक्ष ऐकोनि सावध। झाला अपराध ऋषिराया। २ ।
विमलार्जुन वृक्ष व्हाल गोकुळांत। उश्शाप वदत कृपाळुवा। ३ ।
कृष्णाचा चरण लागेल तुम्हांसी। आपुल्या स्थळासीं याल वेगीं। ४ ।
मोडितसे वृक्ष लक्ष्मीचा पती। दोघे निघताती दिव्य पुरूष। ५ ।
नामा म्हणे तेव्हां करिताती स्तुती। पापें दग्ध होती ऐकतांची। ६ ।

७८९. जोडोनियां हात येती काकुळती। धांव कृपामूर्ति आम्हांलागीं। १ ।
अवतार घेसी दुष्ट वधायासी। येसी गोकुळासी म्हणोनियां। २ ।
पाहोनियां तुला लक्ष्मी पातली। दरिद्रें पळाली येथोनियां। ३ ।
सकळांसी सुख द्यावया आलासी। आम्हीं वनवासी दुःखी होतों। ४ ।
नामा म्हणे कंठीं धरियेला प्राण। दाखवीं चरण दयानिधी। ५ ।

७९०. दामोदरा केशवा वामना देवा कृष्णा। परंज्योति नारायणा तुज नमो। १ ।
विश्वव्यापका जनार्दना वासुदेवा निर्गुणा। अव्यया जगजीवना तुज नमो। २ ।
अनंत अवतार घेसी भक्तांसाठीं। कृपाळु जगजेठी तुज नमो। ३ ।
यज्ञेशा सर्वेशा दयानिधि हृषिकेशा। पुराणपुरूषा तुज नमो। ४ ।
धन्य तो दिवस देखिले तुझे पाय। कृपादृष्टी पाहें आम्हांकडे। ५ ।
जोडोनियां हात करिती विनंति। देई तुझी भक्ति जन्मोजन्मीं। ६ ।
करूनि नमस्कार हळूहळू चालती। वेळोवेळां पाहाती कृष्णाकडे। ७ ।
मोडतांचि वृक्ष नाद ऐकुनियां येती। धांवोनि पहाती नामा म्हणे। ८ ।

७९१. समस्तां सांगती कहानालीं मुलें। नवल देखिलें आम्हीं आतां। १ ।
वृक्ष मुळींहूनि दोघे निघताती। पायासीं लागती कान्होबाच्या। २ ।
यशोदेचे मनीं झालासे विवेक। वैकुंठनायक येथें आला। ३ ।
नामा म्हणे तिशीं घालितसे माया। अपवाद तिजला काय असे। ४ ।

७१२. नंदें मांडियलें तेव्हां त्या कृष्णासी । नासूं देगे यासी दहीं दूध । १ ।
मजला लेंकरें नाहींत गे फार । विश्रांतीसी घर एत्रढेंचि । २ ।
निवारिलें विघ्न देवें हें केवढें । पडती जरी झाडें याजवरी । ३ ।
आजपासूनि यासी बोलसी कठीण । देईन मी प्राण तुजवरी । ४ ।
स्फुंदस्फुंद रडे तेव्हां नारायण । देई यासी स्तन भुकेलासे । ५ ।
यशोदा बाह्यातसे न ये वनमाळी । धांवोनि कुरवाळी वदन त्याचें । ६ ।
समजावोनि देवा पाजितसे स्तन । घालीत भोजन नामा म्हणे । ७ ।

७१३. मुलें सांगताती । माती खातो गे श्रीपती । १ ।
लांकूड घेऊनि हातांत । माती खातो कां पुसत । २ ।
भावा भुललासे खरा । कांपतसे थरथरा । ३ ।
मुख दावीं उघडोनि । पाहें म्हणे चक्रपाणि । ४ ।
ब्रह्मांडें देखिलीं । नामा म्हणे वेडी झाली । ५ ।

७१४. हातीं घेवूनियां काठी । शिकविते श्रीपती ।
यमुनेची माती खासी । कां कां कां कां । १ ।
हरी तूं खोडी नको करूं माझ्या । बा बा बा बा । ध्रु० ।
धांऊनियां धरिला करीं । बैसविला मांडिवरी ।
मुख पसरोनि करी । आ आ आ आ । २ ।
विष्णुदास नामा म्हणे । मरोनियां जन्मा येणें ।
कृष्ण सनातन पाहूं । या या या या । ३ ।

७१५. कोणी एके दिवशीं श्रीकृष्ण अंगणीं । विलोकी नयनीं प्रतिबिंब । १ ।
मातेप्रती तेव्हां म्हणतसे हरी । काढोनि झाडकरी देई मज । २ ।
माता म्हणे बाळा नये तें काढितां । आणिक अनंता माग कांहीं । ३ ।
ऐसें ऐकोनियां मागतसे हरी । त्यासी नानापरी समजावित । ४ ।
बहुत खेळणीं पुढें ठेवी माता । परी तो रडतां न राहेची । ५ ।

पालकीं नेऊनि हरीसी निजवीत । यशोदा ते जात स्वकार्यासी । ६ ।
तेच समयीं राधा आलीसे मंदिरीं । देखिलें श्रीहरी रडतां तिनें । ७ ।
पालका जवळी जाऊनि सत्वर । घेत कडेवरी हरिलागीं । ८ ।
राधा म्हणे कां तूं रडतोसी चाटा । गोष्टी त्या अचाटा सांगतोसी । ९ ।
ऐसें ऐकोनियां उगाची राहिला । खेळवी हरिला प्रेमें राधा । १० ।
मागुती नेऊनि पालकां घातला । रडाया लागला हरी तेव्हां । ११ ।
राधेसी म्हणत यशोदा सुंदरी । यासी क्षणभरी नेईं आतां । १२ ।
आपुले मंदीरा घेऊन जाय यासी । ऐकोनि मानसीं संतोषली । १३ ।
नामा म्हणे राधा घेऊन हरीसी । गेली मंदिरासी आपुलिया । १४ ।

७१६. मंदिरा नेवोनि पलंगीं बैसविला । म्हणत हरीला तयेवेळीं । १ ।
ऐसिया समयीं थोर तूं अससी । तरी हृषिकेशी बरें होतें । २ ।
देखोनि तिचा भाव थोर झाला हरी । पाहुनि सुंदरी आनंदली । ३ ।
सुखशयनीं राधा एकांतीं असतां । अनया अवचिता आला तेथें । ४ ।
सक्रोध होऊनि बोलला राधेसी । कोणासी बोलसी गुजगोष्टी । ५ ।
भ्रताराचा शब्द ऐकतां श्रवणीं । दचकली मनीं राधिका ते । ६ ।
हात जोडोनियां विनवित हरीसी । होई हृषिकेशी सान आतां । ७ ।
ऐकोनि करूणा बाळ झाला हरी । दहिंभात झडकरी ठेवी पुढें । ८ ।
कवाड उघडून बोलत अनयासी । घरांत हृषिकेशी जेवितसे । ९ ।
कावड ठेऊनि घरांत तो आला । जेवितां देखिला कृष्णनाथ । १० ।
नामा म्हणे अनया आनंदला मनीं । हृदयीं चक्रपाणि धरियेला । ११ ।

७१७. राधेप्रती अनया बोले तयेवेळीं । घरांत एकली असमी तूं । १ ।
एकलें हें तुज करमेना मंदिरीं । खेळावया हरी आणित जाई । २ ।
भ्रतार वचन राधेनें ऐकोनि । आनंद तो मनीं थोर तिच्या । ३ ।
स्वामी तुमची आज्ञा मजलागीं प्रमाण । म्हणोनि चरण वंदियेले । ४ ।

सुखशयनीं राधा भोगित अनंता। गोकुळांत वार्ता प्रगटली। ५ ।
राधेचिया घरीं थोर होतो हरी। गोकुळींच्या नारी गुजगुजती। ६ ।
यशोदे मातेसी सांगती सुंदरी। आवरीं मुरारी आपुला हा। ७ ।
तैसीच जाऊन राधेच्या गृहासी। सांगती सासूसी तिच्या तेव्हां। ८ ।
राधेलागीं वृद्धा म्हणे तयेवेळीं। घरासी वनमाळी आणूं नको। ९ ।
नामा म्हणे लोकीं पाडियेली तुटी। तिसी जगजेठी अंतरला। १० ।

७१८. प्रात:काळीं राधा उठोनियां जाण। नंदसदनावरून पाण्या जात। १ ।
इकडे गोदोहन करीतसे हरी। पाहे उभी द्वारीं राधिका ते। २ ।
विसरे गोदोहन वृषभाखालीं बसत। कृष्णाजीचें चित्त वेधियेलें। ३ ।
भरणा रिचवोनी बाहेर आली माता। वृषभ दोहतां हरि देखे। ४ ।
माता म्हणे काय करिसी धननीळा। प्रत्युत्तर त्यावेळां हरि देत। ५ ।
दाराकडे पाहे राधेसी न्याहाळून। मातेसी वचन बोलतसे। ६ ।
भरणा भरला आतां जाई तूं घेऊन। माता क्रोधायमान झाली तेव्हां। ७ ।
कृष्णासी यशोदा म्हणे खालीं पाहे। वृषभ कीं गाय दोहतोसी। ८ ।
कृष्ण खालीं पाहे वृषभ देखिला। म्हणे यशोदेला ऐक एक। ९ ।
देवाचा नवस चुकलीस बहुतेक। चौ थानांचें एक थान झालें। १० ।
वचन ऐकोनी हांसत यशोदा। द्वारीं उभी राधा देखियेली। ११ ।
कांगे येथें उभी घेऊनि घागर। जातसे सत्वर राधा तेव्हां। १२ ।
नामा म्हणे ऐसें झालें गोदोहन। मुख प्रक्षाळून हरि जेवियेले। १३ ।

७१९. मंथना आरंभ करीतसे राधा। आठवी गोविंदा मनामाजी। १ ।
मेळवोनि मुलें खेळे तिचे द्वारीं। देखिला श्रीहरी राधिकेनें। २ ।
विसरोनि मंथन रित्या डेरीयांत। रवी फिरवित गरागरां। ३ ।
डेरा खडबडां वाजतां ऐकोनि। वृद्धा ते धांवोन बाहेर आली। ४ ।
सासू म्हणे काय गेले तुझे नेत्र। देतसे उत्तर राधा तीसी। ५ ।

देंग धड किंवा फुटका म्हणुनि । स्वी घुसळोनि पाहातसे । ६ ।
वृद्धा म्हणे तुझें चित्त नाहीं स्थीर । द्वारीं हो श्रीधर देखियेला । ७ ।
रागें भरोनियां बोलत म्हातारी । येथें कां रे हरी खेळसी तूं । ८ ।
कृष्ण म्हणे आम्हीं खेळतो विदिशीं । तूं कां दटाविसी थेरडिये । ९ ।
ऐसें बोलोनियां श्रीहरी पळाला । घरासी तो गेला नामा म्हणे । १० ।

८००. मध्यान्हकाळीं मग हरीसी घेऊन । करीतसे भोजन यशोदा तें । १ ।
भोजन करूनि पलंगीं निजत । श्रीकृष्णासी घेत पुढें तेव्हां । २ ।
यशोदेसी सुखनिद्रा हो लागली । राधिका ते गेली यमुनेसी । ३ ।
नेत्रासी पदर लावोनि रडत । अंतरीं अनंत आठवोनि । ४ ।
करुणा शब्द तिचा ऐकोनि श्रवणीं । उठला चक्रपाणि तेथोनियां । ५ ।
जावोनियां राधा धरिली पदरीं । तिजलागीं हरि समजावित । ६ ।
संसारासी माझ्या पडियेलें पाणी । ऐसें चक्रपाणि तुवां केलें । ७ ।
इकडे यशोदा ती जागी जवं होत । हरिसी धुंडीत तयेवेळीं । ८ ।
एखादी हा कळी घेऊन येईल आतां । पाहतसे माता चहूंकडे । ९ ।
पाउलांचा माग चालिली काढीत । पावली त्वरित यमुनातीरा । १० ।
राधा तयेवेळीं म्हणे रे अनंता । पैल तुझी माता येत असे । ११ ।
मातेसी देखुनि गडबडां लोळत । यशोदा ते घेत कडेवरी । १२ ।
मातेसी म्हणत चोरोनि कंदूक । घेऊनियां देख आली येथें । १३ ।
माता म्हणे कां गे वाम्सी रडविसी । चेंडु तूं हरिसी देईं वेगीं । १४ ।
मासी हा मजवरी घेई गे किटाळ । मजपाशीं जाण चेंडु नाहीं । १५ ।
कृष्ण म्हणे माते झाडा घेईं आतां । कंदूक तत्त्वता निघेल पैं । १६ ।
वस्त्र जंव झाडीत राधा तयेवेळीं । पडिला भूतळीं कंदूक तो । १७ ।
ऐसें देखोनियां लज्जित जाहाली । हांसत वनमाळी नामा म्हणे । १८ ।

८०१. चेंडु देखोनियां यशोदा कोपली । म्हणे तयेवेळीं राधिकेसी । १ ।
मह्मा नष्ट तुम्ही अवघिया गवळणी । माझा चक्रपाणि ब्रह्मचारी । २ ।
इतुकें ऐकोनि राधा ते चालिली । स्वगृहासी गेली आपुलिया । ३ ।
राधेचिया मनीं समजलें पूर्ण । ब्रह्मसनातन श्रीकृष्ण हा । ४ ।
इकडे यशोदा घेऊनि हरीसी । गेली मंदिरासी नामा म्हणे । ५ ।

८०२. मिळवुनि सौंगडे सांगती तयांसी । चला गोरसासी देतों तुम्हां । १ ।
गेली असे एक गौळण जळाला । सांगे तो गोपाळा तेथें जाऊं । २ ।
न पुरेची हात दूध शिंक्यावरी । करावें मुरारी कैसें येथें । ३ ।
पाटावरी पाट रची वनमाळी । पाडीतसे डुळी मोहोरीनें । ४ ।
वडवोनि टिरी नाचतसे पेंदा । भलीले गोविंदा युक्ती केली । ५ ।
उगलाले गड्या कलुं नको गलबला । थांबाली ले गोला लोनियाचा । ६ ।
कोणी पिती दूध कोणी खाती दहीं । आली लवलाही गौळण ते । ७ ।
अहर्निशीं धराया पहातें मी तुज । जासी कैसा आज चोरटीया । ८ ।
मुखींहुनि पय टाकी तिच्या डोळां । नामा म्हणे पळा सांगतसे । ९ ।

८०३. एक म्हणे धरी स्तन । याचे उपटीन कान । १ ।
यशोदे तुला येईल राग । आपुल्या पोरा कांहीं सांग । २ ।
अंधारीं लपत । पोरें करिती आकांत । ३ ।
सांगतसों शिकवणा । खोडी नको करूं कृष्णा । ४ ।
तोंड करूनि वांकडें । मला म्हणे तशीच रडे । ५ ।
पोरां शिकवीत । गोरस आणा रे समस्त । ६ ।
आम्ही निजलों समस्त । काजळ मुखासी लावीत । ७ ।
मेले आणुनियां सर्प । माझ्या पोरा दावी दर्प । ८ ।
योगियांचें नये लक्षा । त्यासी लावूं म्हणती शिक्षा । ९ ।
अनंत गान्हाणीं । नामा म्हणे कीर्ति वाणीं । १० ।

८०४. गाऱ्हाणें सांगाया । आल्या गोकुळींच्या स्त्रिया । १ ।
यशोदा ऐकत । पळे बाहेरी भगवंत । २ ।
एक म्हणे लोणी । माझें भक्षी चक्रपाणि । ३ ।
फोडितसे भांडें । चिर्जिलिया म्हणे रांडे । ४ ।
गाई वासरें सोडितो । येऊन आम्हांसी सांगतो । ५ ।
अष्टदळ काढिलें अंगणीं । वरी मुते चक्रपाणि । ६ ।
घेऊनियां आला अग्न । तुझ्या घरासी लावीन । ७ ।
देईन मी तोंडावर । तुझ्या बापाचें हें घर । ८ ।
घेतसे वरखडे । शिव्या देऊनियां रडे । ९ ।
देखोनिया गरोदर । म्हणे केवढे उदर । १० ।
सांगती गौळणी । यशोदा तें ऐके कानीं । ११ ।
नामा म्हणे न मनी देव । माय म्हणे अवघी वाव । १२ ।

८०५. एकेकाळीं मोठा आनंद पैं झाला । नभीं उगवला पूर्ण चंद्र । १ ।
तेव्हां गोप आले विनविती गोपाळा । आतां जाऊं चला चोरीलागीं । २ ।
कोठें काय असे तें आम्हां ठाउकें । जाऊं एकमेकें मिळोनियां । ३ ।
तुझिये संगती वाढतो आनंद । दाविसी विनोद ब्रह्मादिकां । ४ ।
नामा म्हणे ऐसें गोपाळ बोलिले । ऐकोनियां झालें देवा गोड । ५ ।

८०६. देव सांगे तुम्ही सामग्री हे करा । सांगेन प्रकारा जाणोनियां । १ ।
तेणें सर्व काज साधेल तुमचें । ठेविलें ठायींचे ठावे पडे । २ ।
घ्यारे आतां वरी मृत्तिका गाळुनी । सराटे वेंचुनी वोटीं भरा । ३ ।
डांगा एक आणा वेंचुनियां खडे । निघावें रोकडे एकसरा । ४ ।
नामा म्हणे ऐसें ऐकता गोपाळ । नाचती सकळ कृष्णापुढें । ५ ।

८०७. एक गोप तेव्हां स्त्रियेसी सांगत । सांठवीं समस्त नवनीत । १ ।
देवाचा नवस आहे पुरवणें । धरावें येथून अनसुट । २ ।
सांगोनियां ऐसें राहिला तो स्वस्थ । मागें स्त्रीनें कृत्य काय केलें । ३ ।

चोरोनियां घृत भरोनि घागरी । नेवोनि शेजारीं ठेवियेल्या । ४ ।
गौळियानें तेव्हां संकल्प सोडिला । नवस फेडिला नामा म्हणे । ५ ।

८०८. गोपीनें घृतासी चोरोनि ठेविलें । देवासी कळलें अंतर्यामीं । १ ।
सेजे घरीं होतें ठेविलें चोरून । सौंगडे घेऊन गेला तेथें । २ ।
आज्य घेऊनियां गोपाळांसी देत । आपण भक्षीत प्रेमानंदें । ३ ।
तृप्त होवोनियां गेला क्रीडायासी । पूर्ण नवसासी केलें त्याच्या । ४ ।
नामा म्हणे ऐसा वैकुंठनायक । दावीत कौतुक नानापरी । ५ ।

८०९. कांहीं दिवस लोटलियावरी । गोपी तिचे घरीं प्रवेशली । १ ।
म्हणे माझा कुंभ देई वो आणून । येरीनें सदन धुंडाळिलें । २ ।
म्हणे सये येथें नाहीं तुझें घृत । ऐकोनियां मात क्रोधावली । ३ ।
चोरी नवनीत तुझें नाहीं गेलें । माझें काय झालें पुसतसे । ४ ।
नष्टे अभिलाष केला सांग सत्य । बोलोनि निवांत राहिली ते । ५ ।
कलह करावा भ्रतारा कळेल । तो शिक्षा करील यथास्थित । ६ ।
न मिळे जाणोन म्हणे कृष्णार्पण । आलीसे बोलोन मंदिरासीं । ७ ।
नामा म्हणे शुक सांगे परीक्षिती । ऐशा किती ख्याति तुज सांगों । ८ ।

८१०. एकदां श्रीकृष्ण खेळत असतां । प्रवेशे अवचिता गोपीगृहीं । १ ।
दोन्हीं करीं तेव्हां नेत्र चाळीतसे । गोपी पुसतसे काय झालें । २ ।
कृष्ण म्हणे माझे दुखताती डोळे । उपाव न कळे करूं काय । ३ ।
पुत्राची जननी तिचें दूध मिळे । घालितांची डोळे बरे होती । ४ ।
गोपी म्हणे दूध देतें मी काढून । तें नेत्रीं घालून बरें करी । ५ ।
देव म्हणे दूध तूं काढून देसी । कैसा गुण त्यासी येईल सांग । ६ ।
माझिया करानें पिळून देसी स्तन । तरी येईल गुण लवकरी । ७ ।
ऐकतांचि गोपी धांवे मारावया । पळे उठोनियां नामा म्हणे । ८ ।

८११. यशोदे भोंवत्या मिळाल्या गौळणी । सांगती गाऱ्हाणीं नानापरी । १ ।
गोरस भक्षोनि फोडितो भाजन । गोकुळा सोडोनि जाऊं सये । २ ।

एक गोपी म्हणे माझ्या घरां येसी । बांधीन खांबासी तुजलागीं । ३ ।
यशोदेसी ऐसी सांगोनि गार्‍हाणीं । चालिल्या कामिनी गृहाप्रती । ४ ।
नामा म्हणे गोपी बोलीली बांधीन । तिजवरी विघ्न करी देव । ५ ।

८१२. निशीं प्राप्त होतां भ्रताराचे शेजे । गोपिका ती निजे आनंदानें । १ ।
संधी पाहोनियां प्रवेशला देव । करीत लाघव काय तेव्हां । २ ।
भ्रताराचे दाढी कांतेची ते वेणी । एकत्र करोनि ग्रंथी देत । ३ ।
करूनि कौतुक निघोनियां गेला । अरूणोदय झाला तये वेळीं । ४ ।
गोदोहनालागीं गोपी ते उठत । वेणी आंसडीत दाढीसंगें । ५ ।
भ्रतारासी तेव्हां बोले ते कामिनी । न धाय अजूनि मन कैसें । ६ ।
भ्रतारासी दाढी ओढितांचि जाण । सक्रोध होऊन बोलतसे । ७ ।
मस्त होवोनियां माजली धांगडी । करिसी ओढाओढी मजलागीं । ८ ।
नामा म्हणे तेव्हां उठोनि बैसती । आश्चर्य करिती मनामाजी । ९ ।

८१३. उभयतां तेव्हां कलह करितांनी । आण वाहाताती परस्परें । १ ।
सोडूं जों पाहती सत्वर ग्रंथिका । न सुटे ब्रह्मादिकां कदाकाळीं । २ ।
सोडितां सुटेना जाळितां जळेना । कापितां कापेना कांहीं केल्या । ३ ।
स्त्रियेलागीं तेव्हां भ्रतार बोलत । तुजसंगें मृत्यु मज आला । ४ ।
दोघेंहि रडत बिढीमाजी येती । कोल्हाळ करीती तयेवेळीं । ५ ।
गोकुळींचे जन डोळां पहाताती । जाऊन सांगती नंदालागीं । ६ ।
नामा म्हणे नंद बैसला चावडी । घेऊन आवडी कृष्णजीला । ७ ।

८१४. गोपीगोपाळ तेथें पातलीं त्वरित । हांसती समस्त देखोनियां । १ ।
कृष्ण म्हणे कैसी बांधिसी मजला । बांधिलें तुजला भगवंतें । २ ।
पायां ते पडती रडोनि बोलती । सोडवा म्हणती आम्हांलागीं । ३ ।
पाहोनि किंव त्यांची दया आली चित्ता । कृपेनें पाहातां मुक्त झालीं । ४ ।
नामा म्हणे तेव्हां वंदोनि देवासीं । गेलीं निजधामासी आनंदानें । ५ ।

८१५. नंदाचिये घरीं चंपाषष्ठी नेम। कुळी कुळधर्म मार्तंडाचा। १ ।
पक्वानेंही नाना रोटिया भरीत । केलीं अपरमित यशोदेनें। २ ।
वाघियामुरळी सांगितलीं दोन्हीं। आला चक्रपाणि खेळतांची। ३ ।
मातेलागीं म्हणे लागलीसे क्षुधा। थांबरे गोविंदा म्हणे माता। ४ ।
घेतलीसे आळी करी लगबग। विस्तारिलें सांग नैवेद्यासी । ५ ।
नेवोनियां पुढें देवांच्या ठेविले । बोलवा वहिलें आमंत्रिकां । ६ ।
तोंवरी मागे तो भक्षी नारायण। यशोदा आपण रागावली। ७ ।
दुरळ हा देव होय आतां कैसें । मार्तंडाचें पिसें लागे तुज । ८ ।
करी क्षणामाजी वांकडेंचि मुख । हरी खात वीख कालवलें । ९ ।
जाणीतला भाव मायेचें अंतर । करूनियां खरें दावी देव।१०।
वांकडिया हातें ग्रास घाली मुखें । मुखें तेंहि सुखें तैसें दावी ।११।
पिसाळल्यापरी करी वेडेचार । भय वाटे फार मायेलागीं।१२।
पूर्वी म्यां सांगतां नायकसी कैसा। पुढें हा वोळसा वोढवला।१३।
पाचारिले देवऋषि हालविता सुपें। त्याचिया न भियें देव निघे ।१४।
वासोनियां डोळे तयाकडे पाहे। कांपे तया भयें थरथरां।१५।
मंत्रूनियां पाणी आणिला अंगारा। तयाचा मातेरा केला देवें।१६।
नवसा न पावती गोकुळींच्या देवता। उपाय मागुता राहिलासे।१७।
चिंतावली माय मूर्च्छा आली तिसी। झाली पोरपिसी मोहजाळें।१८।
जाणोनि अंतर म्हणे कृष्णार्पण। तेव्हां आलें विघ्न दूर होय।१९।
नामा म्हणे देव पाहे कृपादृष्टी । जाणवलें पोटीं हाचि देव।२०।

८१६. गोपिका म्हणती यशोदा सुंदरी। करितो मुरारी खोडी बहु । १ ।
यशोदेप्रती त्या गौळणी बोलती। संकष्ट चतुर्थी व्रत घेई । २ ।
गणेश देईल यासी उत्तम गुण। वचन प्रमाण मानावें हें । ३ ।
गजवदनासी तेव्हां म्हणत यशोदा। माझिया मुकुंदा गुण देई । ४ ।
ऐसें हें वचन ऐकुन कृष्णनाथें। सत्य गणेशातें केलें तेव्हां । ५ ।

एक मास खोडी देवें नाहीं केली । प्रचीत ते आली यशोदेसी । ६ ।
धन्य धन्य देव गणपती पाहे । यशोदा ती राहे उपवासी । ७ ।
इंदिराबंधूचा उदय होऊं पाहात । यशोदा करीत पूजनासी । ८ ।
शर्करामिश्रित लाडू येकवीस । आणिक बहुवस मोदक ते । ९ ।
ऐसा नैवेद्याचा हारा तो भरूनी । देव्हारां नेऊनि ठेवी माता । १० ।
मातेसी म्हणत तेव्हां हृषिकेशी । लाडू केव्हां देसी मजलागीं । ११ ।
यशोदा म्हणत पूजीन गजवदन । नैवेद्य दाऊन देईन तुज । १२ ।
ऐसें म्हणुनियां माता बाहेर गेली । देव्हाऱ्याजवळी हरि होता । १३ ।
एकांत देखोनि हारा उचलिला । सर्व स्वाहा केला एकदांची । १४ ।
घेऊनियां ग्रास उगाची बैसला । भक्तांलागीं लीला दावीतसे । १५ ।
धूप घेवोनियां आली सदनातें । रिता हारा तेथें देखियेला । १६ ।
विस्मय बहुत मातेसी वाटला । नैवेद्य हरीला पुसतसे । १७ ।
कृष्ण म्हणे सत्यवचन मानीं माते । एक सहस्र उंदीर आले येथें । १८ ।
त्यांत एक थोर होता तो मूषक । वरी विनायक बैसलासे । १९ ।
सकळीक लाडू सोंडेनें उचलीले । सर्व आकर्षिले एकदांची । २० ।
सर्वांगासी त्याने चर्चिला शेंदूर । सोंड भयंकर हालवितसे । २१ ।
उंदिर भ्यासुर भ्यालों मी देखुनि । वळली वदनीं बोबडी ते । २२ ।
न बोलवे कांहीं माझेनी जननी । क्षुधा मजलागोनी लागलीसे । २३ ।
लाडू मज देई म्हणे जनार्दन । माता क्रोधें करून बोलतसे । २४ ।
माता म्हणे कृष्णा पाहूं तुझें वदन । लाडू त्वांचि पूर्ण भक्षियेले । २५ ।
हरि म्हणे माते लाडू ते बहुत । मावतील मुखांत कैसे माझ्या । २६ ।
गणपति सर्व लाडू गेलासे घेऊन । आलें विहरण मजवरी । २७ ।
हरी म्हणे मज मारूं नको माते । तुज वदनातें दावितों मी । २८ ।
कृष्णनाथें तेव्हां मुख पसरिलें । ब्रह्मांडें देखिलीं मुखामाजी । २९ ।
असंख्य गणपती दिसती वदनीं । पाहतसे नयनीं यशोदा ते । ३० ।

मुखांत गणपति मातेसी बोलत । पूजावें त्वरित हरिलागीं । ३१ ।
ऐसें देखोनियां समाधिस्थ होत । चहूंकडे पाहात तटस्थ ते । ३२ ।
योगमाया तेव्हां हरीनें घालून । मातेपुढें जाण उभा असे । ३३ ।
यशोदा हरी कडेवरी घेत । मुखातें चुंबित आवडीनें । ३४ ।
घेऊनियां हरी घरात ती गेली । भोजना बैसली नामा म्हणे । ३५ ।

८१७. तळवे तळहात टेकीत । डाब्या गुडघ्यानें रांगत ।
रंगणी रंगनाथ । तो म्यां देखिला सये । १ ।
गवळण जसवंती पैं सांगे । आली कृष्णाचेनि मागें ।
येणें येणें वो श्रीरंगें । नवनीत माझें भक्षिलें । २ ।
एक्या हातीं लोण्याचा कवळु । मुख माखिलें अळुमाळु ।
चुंबन देतां येतो परिमळु । नवनीताचा गे सये । ३ ।
येणें माझें कवाड उघडिलें । येणें शिंकें हो तोडिलें ।
दह्यादुधातें भक्षिलें । उलंडिलें ताकातें । ४ ।
ऐसें जरी मी जाणतें । यमुनापाणिया नव्ह जातें ।
धरूनि खांबासी बांधितें । शिक्षा लावितें गोविंदा । ५ ।
ऐसा पुराण प्रसिद्ध चोर । केशव नाम्याचा दातार ।
पंढरपुरीं उभा विटेवर । भक्त पुंडलिकासाठीं । ६ ।

८१८. मार्गशीर्ष मासीं कात्यायनी व्रत । कुमारी समस्त आचरती । १ ।
अरुणोदयीं येती कालिंदीचे तीरीं । गाती त्या सुंदरी कृष्णलीला । २ ।
सिकतेची मूर्ति करूनि देवीची । पूजाअर्चा तिची करिताती । ३ ।
जोडोनियां कर करिताती स्तवना । ऐकें विज्ञापना आदि माये । ४ ।
नंदाचा नंदन देईं आम्हां पती । नामा म्हणे येती स्वस्थळासी । ५ ।

८१९. कालिंदीचे तीरीं वस्त्रें ठेविताती । जळांत रिघती सकळीक । १ ।
गड्यांसमवेत आला तेथें कृष्ण । करावया पूर्ण व्रत त्यांचें । २ ।

वस्त्रें घेवोनियां चढे वृक्षावरी। घाबरल्या नारी पाहोनियां। ३ ।
वस्त्रें देई आतां आमुचीं मुकुंदा। जाऊनियां नंदा सांगों आतां। ४ ।
अच्युता अनंता कृष्णा गरुडध्वजा। दासी आम्ही तुझ्या सकळिका। ५ ।
वाजतसे सीत जाऊं पाहे प्राण। यशोदेची आण तुज असे। ६ ।
ऐकोनियां ऐसें नामा म्हणे हांसे। धर्म सांगतसे तयांलागीं। ७ ।

८२०. नग्न होवोनियां स्नान जे करिती। त्यांचीं व्रतें होती निरर्थक। १ ।
त्वरें करूनियां या गे मजपाशीं। सांगतों तुम्हांसी प्रायश्चित्त। २ ।
एकी आड एक गुह्यस्थानीं हात। आनंद बहुत मनामध्यें। ३ ।
करा नमस्कार सांगे वनमाळी। एक हस्त भाळीं लाविताती। ४ ।
देवां द्विजां ऐसा करितां नमस्कार। पाप याचें फार धर्मशास्त्रीं। ५ ।
ऐकोनियां ऐसें लाज सांडोनियां। पडताती पायां आदित्याच्या। ६ ।
वस्त्रें देत तेव्हां तयां जगजीवन। मनोरथ पूर्ण करीन मी। ७ ।
नामा म्हणे येती गोकुळासी नारी। चालिला श्रीहरि तेथुनियां। ८ ।

८२१. हरी तुझी ऐसी कैसी हे खोड। ध्रु०।
घेउनी चिमुटे मुळसी पळसी। गोपी तुज म्हणती हा दोड। १ ।
सोडुनि वांसरें गाईसी पाजिसी। यांत तुज काय मिळती जोड। २ ।
आडवा होउनी गोपीसी धरिसी। चुंबितां वदन मज म्हणसी सोड। ३ ।
अशा ह्या चेष्टा नामयासी करिसी। हरी तुझी ऐसी कैसी हे खोड। ४ ।

८२२. यागें वो नसवंती आपुला तूं बाळ। विकट हा खेळ खेळतसे। १ ।
धाकुटिया मुलां घेतो हा चिमोरे। काय करूं धुरे भीत असों। २ ।
घरींचा म्हातारा हाणितला येणें। काय सांगूं उणें तुजपाशीं। ३ ।
मी वो लटिकी तरी नामयासी पुसा। तुझा बाळ कैसा आसंदत। ४ ।

८२३. बाळ सगुण गुणाचें तान्हें गे। बाळ दिसतें गोजिरवाणें गे।
काय सांगतां गान्हाणें गे। गोकुळींच्या नारी। १ ।

श्रीरंग माझा वेडा गे । याला नाहीं दुसरा जोडा गे ।
तुम्ही याची संगत सोडा गे । गोकुळींच्या नारी । २ ।
पांच वर्षांचें माझें बाळ गे । अंगणीं माझ्या खेळे गे।
कां लटकाच घेतां आळ गे । गोकुळींच्या नारी । ३ ।
सांवळागे चिमणा माझा । गवळणींत खेळे राजा।
तुम्ही मोठ्या ढालगजा गे। गोकुळींच्या नारी । ४ ।
तुम्ही खाऊन लोण्याचा गोळा। आळ घेतां या गोपाळा ।
तुम्ही ठाईंच्या वोढाळा गे। गोकुळींच्या नारी। ५ ।
तुम्हीं लपवुनी याची गोटी गे। लागतां गे याचे पाठीं गे।
ही एवढीच रीत खोटी गे । गोकुळींच्या नारी। ६ ।
तुम्ही लपवून याचा भवरा गे । धरूं पाहतां सारंगधरा।
तुम्ही बारा घरच्या बारा गे। गोकुळींच्या नारी। ७ ।
हा ब्रह्मविधीचा जनीता गे । तुम्हीं याला धरूं पाहतां गे।
हा कैसा येईल हातां गे। गोकुळींच्या नारी। ८ ।
नामा म्हणे यशोदेसी गे। हा तुझा हृषिकेशी गे ।
किती छळीतो आम्हासी गे। गोकुळींच्या नारी। ९ ।

८२४. आई मज म्हणसील अवगुणांचें । तरी मी काय करितों कोणाचें ।
जें जें होणार जयाचें । तें कां मजवरी घालिसी । १ ।
भट आलासे महाबळ । तेणें वर्णिला जन्मकाळ ।
तो चुकला ग्रहमूळ । तेणें त्यासी पीडिलें। २ ।
माये तीच मावशी । तिनें मज घेतलें वोसंगासी।
तिचे अंगीं होती विवशी । तिनें तिसी ग्रासिलें । ३ ।
दहीं भात रत्नताटीं । कालवुनि लाविली माझे औंठीं।
जेवितां काग घाली मिठी। धरूनि मुष्टी रगडिला। ४ ।

कैसी पाठविली रिठागांठी। ती घातली माझे कंठीं।
तेणें माझ्या गळां मिठी। मग म्यां दाढे रगडिली। ५।
खेळत होतों यमुनेतटीं। बक लागला माझे पाठीं।
मग मी धरूनि चंचु उपटीं। धरणीवरी आपटिला। ६।
आई म्यां तुझें काय केलें। त्वां मज उखळासी बांधिलें।
रांगत रांगत अंगणीं आलों। तेणें वृक्ष उन्मळिले। ७।
ऐसा नाटकी हृषिकेशी। परब्रह्म दावी यशोदेसी।
विष्णुदास नामा अहर्निशीं। हृदय कमळीं पाहातसे। ८।

८२५. यशोदे घराकडे चाल मला जेवूं घाल ।ध्रु०।
साध्या गव्हांची पोळी लाटीं। मला पुरण पोळी करून दे मोठी।
नाहीं अडवीत गुळासाठीं। मला जेवूं घाल। १।
तूप लावून भाकर करीं। वांगें भाजून भरीत करीं।
वर कांद्याची कोशिंबिरी। मला जेवूं घाल। २।
आई गे खडिसाखरेचे खडे। लवकर मला करून दे वडे।
बाळ स्फुंदस्फुंदोनि रडे। मला जेवूं घाल। ३।
आई लहानच घे गे उंडा। लवकर भाजुन दे मांडा।
लांब गेल्या गाईच्या झुंडा। मला जेवूं घाल। ४।
आई मी खाईन शिळाघांटा। दह्याचा करून दे मठ्ठा।
नाहीं माझ्या अंगीं ताठा। मला जेवूं घाल। ५।
भाकर बरीच गोड झाली। भक्षुनी भूक हारपली।
यशोदेनें कृपा केली। मला जेवूं घाल। ६।
आई मी तुझा एकुलता एक। गाई राखितों नउ लाख।
गाई राखून झिजलीं नखं। मला जेवूं घाल। ७।
नामा विनवी केशवासी। गाई राखितो वनासी।
जाऊन सांगा यशोदेशी। मला जेवूं घाल। ८।

८२६. धन्य गोकुळ महीतळीं मंडळ। सुखावलें ब्रह्म जेथें झालें सगुण। १ ।
काय न कळे आवडी त्याचा भाव। सुख नेलें रे गोवळीं म्हणती देव। २ ।
आलें वैकुंठभवनीं विकृति। ते हे पाहवी गौळियांची विश्रांति। ३ ।
योगियांचे ध्यानीं उवगलें। ते या गौळियांचे अनुरागीं रंगलें। ४ ।
वेद श्रुतींसी पारु न कळे। कोण सुख सर्वांहूनि आगळें। ५ ।
नामया स्वामी आमुचें कुलदैवत। शरण जाऊनि गौळिया मागुं उच्छिष्ट। ६ ।

८२७. उपाधि निर्मळ शोभती चरण। नादबिंदु पूर्ण मध्यभागीं। १ ।
कदंबावरती चढे वनमाळी। शोभती निढळी ऊर्ध्वपुंड्र। २ ।
श्रवणीं कुंडलें शोभती नक्षत्र। श्रीमुख पवित्र दिसों येत। ३ ।
नामा म्हणे मज ढापवेना डोळे। करूणा कल्लोळे देखोनियां। ४ ।

८२८. चालिवेले तेव्हां गडी आणि देव। खेळताती सर्व आनंदानें। १ ।
वत्साचिया वेषें वत्सासूर आला। माराया कृष्णाला परीक्षिती। २ ।
पाहोनियां ऐसें तयासी मारिलें। झोंकोनियां दिले आकाशातें। ३ ।
चला आतां जेवूं बसूं एके ठायीं। काढा रे लवलाही शिदोरीया। ४ ।
गोपाळ मिळोनि आनंदें जेविले। ब्रह्मरसे धाले कृष्णासंगें। ५ ।
उदक प्राशन करावया आले। बकानें देखिलें कृष्णजीला। ६ ।
दुष्टबुद्धि तेव्हां देवासी गिळीत। हृदय जाळीत उगळीला। ७ ।
धरूनियां हातें उभाची चिरीला। आनंद देवाला न समाये। ८ ।
नामा म्हणे आले घरासी सकळ। सांगताती बाळे वर्तमान। ९ ।

८२९. कंसाचिया घरा आला नारदमुनी। एकांतीं बैसोनी सांगतसे। १ ।
सातवा जो गर्भ जिराला म्हणती। रोहिणी प्रसवती बळीराम। २ ।
आठवा जो पुत्र देवकीसी झाला। वसुदेवें नेला नंदावरीं। ३ ।
यशोदेची कन्या घेऊनियां येत। गेली आकाशांत मारीतां जे। ४ ।
तुझिया मानसीं आशंका येईल। होते रक्षपाळ माझे तेथें। ५ ।

ईश्वराची मात्र न कळे कोणाला। कळलें हें मजला त्याच्याकृपें। ६ ।
घेऊनियां शस्त्र उठला त्वरीत। करितों मी अंत वसुदेवाचा। ७ ।
नयेवेळीं म्हणे ब्रह्मयाचा सुत। ऐक तुज मात सांगतों मी। ८ ।
आधीं मारी पुत्र तुझे जे कां वैरी। असे तुझ्याघरीं मग यासी। ९ ।
सांगोनियां ऐसें शांतविलें त्यासी। गेला गोकुळासी नामा म्हणे। १० ।

८३०. गोकुळा येवोनि भेटे नंदादिकां। वैकुंठनायका सांगतसे। १ ।
कंसानें मांडिला अधर्म बहुत। मारावें त्वरित तयालागीं। २ ।
लावोनियां आग आपण विझविली। तेचि परी केली नारदानें। ३ ।
सांगोनियां ऐसें विणा सांवरोन। निघाला तेथून नामा म्हणे। ४ ।

८३१. दुःखाची निवृत्ति सुखाचें तें सुख। पाहतां श्रीमुख गोविंदाचें। १ ।
अंगणीं रांगत गुलगुला बोलत। असुर रूळत चरणातळीं। २ ।
नामा म्हणे हातीं लोणियाचा उंडा। गोळणी त्याच्या तोंडा भुललिया। ३ ।

८३२. वृषभाच्या रूपें आला रिठासूर। इंद्रादि सुरवर भीती त्यासीं। १ ।
बहु देतो त्रास गोकुळींच्या जना। धांवधांव कृष्णा मारी याला। २ ।
जगजेठी तेव्हां धरितसे शिंगें। सारितसे मागें भुजाबळें। ३ ।
पाडोनियां खालीं दिला पाय वर। मारिला असुर नामा म्हणे। ४ ।

८३३. गोकुळीं अनर्थ होताती बहुत। मिळोनी समस्त विचारिती। १ ।
वृद्ध ते म्हणती येतें आमुच्या मना। जाऊं वृंदावना सकळीक। २ ।
समस्तां मानला तयांचा विचार। निघती नारीनर शीघ्र तेव्हां। ३ ।
अहिर्निशीं देवा करिती जतन। नामा म्हणे मन गोविंदा पें। ४ ।

८३४. करावया वनभोजन। जाती गोकुळींचे जन। १ ।
कोणी भोजन करिती। कोणी देवा खेळविती। २ ।
डोळे झांकीत श्रीपती। दावी निद्रेची आकृती। ३ ।
बहुत खेळलासे खेळा। आतां निजवा गे बाळा। ४ ।

वस्त्रें घालुनी शकटातळीं । निजविती वनमाळी । ५ ।
क्षणक्षण निजला देव । रडे उठे वासुदेव । ६ ।
मुलालागीं म्हणे तेव्हां । माझा कान्होबा खेळवा । ७ ।
रागें रागें झाडी लात । गाडा मोडोनि पाडीत । ८ ।
नामा म्हणे वाटी धन । नंद वांचला नंदन । ९ ।

८३५. विचारित हो श्रीपती । जे म्यां जावें वनाप्रती । १ ।
राखावया गायी । भार उतरावया मही । २ ।
एके दिनीं सायंकाळीं । नंदा पुसे वनमाळी । ३ ।
उद्यां जाईन मी राना । घेऊनियां जी गोधना । ४ ।
बुद्धीचा चालक । नामा म्हणे हाचि एक । ५ ।

८३६. प्रात:काळीं मुलें येताती सकळ । उठरे गोपाळ म्हणताती । १ ।
आळस देवोनी उठे देवराणा । बळिराम गोधना सोडीतसे । २ ।
घालोनिया स्नान काकुळती येत । सांभाळा भगवंत वनामध्यें । ३ ।
जवळींच खेळा जाऊं नका दूरी । सांभाळा मुरारी प्राण माझा । ४ ।
होताती उत्पात याजवरी मोठे । मोडतील कांटे सांभाळावें । ५ ।
आसनीं शयनीं भोजनीं जतन करा । नामया दातारा केशिराजा । ६ ।

८३७. उठोनियां प्रात:काळीं । देवें मुरली वाजविली । १ ।
गडी मिळोनी समस्त । घ्यारे शिदोऱ्या सांगात । २ ।
अलंकार घालिताती । दिसे सुशोभित मूर्ति । ३ ।
नामा म्हणे स्वामी माझा । आला भक्तांचिये काजा । ४ ।

८३८. माराया कृष्णासी । कंसें पाठविला केशी । १ ।
असे तो प्रतापी । आला अश्वाचिये रूपीं । २ ।
देवा डसाया धांवला । धरूनि पायीं झुगारिला । ३ ।
मुखीं देऊनियां हात । श्वास कोंडी जगन्नाथ । ४ ।
नामा म्हणे पडलें प्रेत । हर्ष सुरवरां बहुत । ५ ।

८३९. शेळ्या मेंढियांचा खेळ । आतां खेळूं रे सकळ । १ ।
कोणी मेंढ्या होती । कोणी चोर म्हणताती । २ ।
म्हणती रात्र झाली । आतां जावें वनमाळी । ३ ।
कोणी श्वान होती । चोरा इमाया धांवती । ४ ।
तेथें व्योमासुर येत । गोपाळाचा वेष धरित । ५ ।
करोनियां चोरी । नेऊन ठेवी पर्वतदरीं । ६ ।
हें तो देवासि कळलें । नामा म्हणे संहारिलें । ७ ।

८४०. कंसें पाठविला आला तृणावर्त । धुळीनें समस्त व्यापियेलें । १ ।
दुष्टबुद्धि तेव्हां उचली देवासी । धरियेलें त्यासी कंठीं देवें । २ ।
यशोदा पाहात न दिसे श्रीकृष्ण । ऊर बडवून शोक करी । ३ ।
गौळणींचा मेळा मिळाला समस्त । कोणी कृष्णनाथ नेला सयें । ४ ।
न लगे घरदार बुडाला संसार । दावा गे श्रीधर तान्हें माझें । ५ ।
ठावें असतें ऐसें बांधित्यें पोटासीं । कोठें गुंतलासी बाळा माझ्या । ६ ।
धांवा गे धांवण्या पाहा गें लेंकरूं । शोक अनिवारू करीतसे । ७ ।
शिणल्या भागल्या येतां तुम्हां घरा । मुख हें उदारा दावीं कृष्णा । ८ ।
सांडूं पाहे प्राण यशोदा सुंदरी । हंबरडा मारी वत्सालागीं । ९ ।
चेंपोनि नरडें गतप्राण केला । भूमीसीं पाडिला दैत्य तेव्हां । १० ।
नामा म्हणे वरी खेळत गोविंद । पाहोनि आनंद सकळांसी । ११ ।

८४१. कंस धाडी अघासुर । मारी नंदाचा कुमर । १ ।
एक ओंठ घाली खालीं । दुजा मेघाच्या मंडळीं । २ ।
गाई गोपाळ उदरीं । देवा कळलें अंतरीं । ३ ।
आंत प्रवेशला कृष्ण । रूप धरीत वामन । ४ ।
क्षणार्धेंची मारी । भक्तजनांचा कैवारी । ५ ।
भेणें गोपाळ पडिले । कृपा दृष्टि उठविले । ६ ।

तेज अद्‌भुत निघालें । कृष्णमुखीं प्रवेशलें । ७ ।
भक्तासी रक्षीत । नामा म्हणे कृष्णनाथ । ८ ।

८४२. आनंदें खेळत । राम गडी कृष्णनाथ। १ ।
गडी म्हणती रामा । ताडफळें देई आम्हां । २ ।
सकळ मिळोनि । आले धेनुकांचे वनीं । ३ ।
वृक्ष हालवोनि । फळें पाडिलीं मेदिनीं । ४ ।
येत धांवोनी असुर। करी तयाचा संहार । ५ ।
भक्तांचा अंकित । नामा म्हणे कृष्णनाथ । ६ ।

८४३. दुष्ट दुराचारी । गोपाळाचा वेष धरी । १ ।
दैत्य ओळखिला । रामें प्रलंब मारिला। २ ।
देव करिती जयजयकार । पुष्पें वर्षती अपार। ३ ।
सूर्य आलासे माध्यान्हा। देवा बाहाती भोजना । ४ ।
नामा म्हणे पाचारती । गडी एकत्र बैसती । ५ ।

८४४. अहर्निशीं कंस बसे चिंताक्रांत। विचार पुसत प्रधानासी । १ ।
प्रतिज्ञा करूनि शत्रुवधा जाती। ते मागें न येती परतोनि । २ ।
आतां पुरूषार्थी कोण पाठवावा। तो मज सांगावा निवडोनि। ३ ।
सांगती प्रधान धाडा असुरासुर। तंव तो असूर उभा राहे । ४ ।
म्हणे मृत्यु नसे मज कोणा हातीं। द्वापारीं मारूती गुप्त झाला । ५ ।
ऐकोनियां ऐसें आनंद मानसीं। गौरविलें त्यासी नानापरी। ६ ।
नामा म्हणे काळें बोलविलें त्यासी । सत्वर वनासी येता झाला । ७ ।

८४५. आनंदें वनात खेळताती गोप। गायींचे कळप चरताती। १ ।
अकस्मात दैत्य देखती दुरोन । कृष्णा आलें विघ्न म्हणताती । २ ।
लपें तूं कान्होबा म्हणताती गडी। घालितों घोंगडी तुजवरी। ३ ।
घाबरले तेव्हां समस्त गोपाळ। पाहोनि घननीळ बोलतसे। ४ ।

तुम्ही कांहीं चिंता न करा मानसीं । मारितों मी यासी क्षणामाजीं । ५ ।
राहोनियां उभा पाहात अंतरीं । यासी मृत्यु करीं कोणाचिया । ६ ।
वातात्मजा हातीं मरण असे यासी । कळलें देवासी नामा म्हणे । ७ ।

८४६. गायी गोप तेव्हां लपवोनि क्षणेक । जानकीनायक झाला देव । १ ।
आकर्ण नयन हातीं धनुष्यबाण । करीतसे ध्यान मारुतीचें । २ ।
स्वामीचा तो धांवा ऐकोनियां कानीं । हडबडिला मनीं कपींद्र तो । ३ ।
निघोनि त्वरित बनामाजी आला । चरणासी लागला प्रेमभावें । ४ ।
म्हणे स्वामी कांहीं सेवकासी आज्ञा । करावी सर्वज्ञा दयानिधी । ५ ।
देव म्हणे बारे काय सांगूं फार । पैल तो असूर येत आहे । ६ ।
तुझ्याहातें आहे तयासी मरण । म्हणोनि स्मरण केलें तुझें । ७ ।
तयासी जावोनि मारीं त्वां आतां । चरणीं ठेवूनि माथा निघाला तो । ८ ।
दुर्जनें तेवेळीं मारुती पाहिला । म्हणे काळ आला कोठोनियां । ९ ।
धरूनियां नरडी केला गतप्राण । पुनरपि येऊन वंदीतसे । १० ।
नामा म्हणे दोन्ही जोडोनियां कर । बोलिला उत्तर काय आतां । ११ ।

८४७. त्रेतायुगीं ख्याती करोनियां थोर । वधिले असूर रावणादी । १ ।
कोण्या हेतुस्तव पुन्हा आगमन । सांगा कृपा करून दासालागीं । २ ।
ऐकोनियां वचन बोले सर्वेश्वर । द्वापारीं अवतार आठवा हा । ३ ।
तुझे भेटीस्तव रूप हें धरिलें । दावीं तें वहिलें कपी म्हणे । ४ ।
कृष्णलीला पाहूं हेत आहे चित्ता । दावीं सीताकांता दीनालागीं । ५ ।
चतुर्भुज रूप दाविलें प्रगट । शिरीं मोरमुगुट शोभतसे । ६ ।
गुंजाहार गळां वैजयंती माळा । कांसेसी पिंवळा पीतांबर । ७ ।
नवलक्ष गाई गोपाळ नितुके । खेळती कौतुकें करोनियां । ८ ।
नामा म्हणे तेव्हां स्तुति ते करीत । न कळे तुझा अंत ब्रह्मादिकां । ९ ।

८४८. द्वापारींची ठेव संपूर्ण पाहून। विनवी जोडून करालागीं । १ ।
रामरूप धरून मज बोळवावें । तें रूप राहावें हृदयामाजी । २ ।
मनोरथ त्याचा ऐकोनी श्रवणीं। झाला चापपाणी तात्कालीक। ३ ।
पाहोनियां ध्यान करूनि नमन । निघाला तेथून वायुसुत। ४ ।
घेवोनियां आज्ञा सेतुबंधा गेला । ध्यानस्थ बैसला नामा म्हणे। ५ ।

८४९. अनेक पुष्पांच्या साजतांती माळा । गुंजाहार गळां विलसताती । १ ।
रक्त पितांबर आरक्त अधर। चरणीं सुंदर चालताती । २ ।
रक्त चंदनाची घेतलीसे उटी। मयूरपत्रवेंठी शोभताहे। ३ ।
शिंगें रंगविती देऊनियां रंग। चालती श्रीरंग मागें मागें । ४ ।
चित्तीं सर्वकाळ राहे ऐसें ध्यान । नामा म्हणे धन्य तोचि एक। ५ ।

## ❖ भगवान श्रीकृणांचा गोपाळ काला ❖

८५०. शिवादि वंदिती ज्याचे पायवणी। त्यासी पायांवरी न्हाणी यशोदा ते। १ ।
नंद पुण्य लेखा नकळे आम्हांप्रती। शुक परीक्षिती सांगतसे। २ ।
सनकादिक ज्याचे ध्यानीं झाले पिसे। गायी चारीतसे गोकुळांत। ३ ।
गडियांसी काला वांटीत श्रीधर। कौतुक सुरवर पाहताती। ४ ।
नामा म्हणे सुख देईल भक्तांसी। वधील दुष्टांसी स्वामी माझा। ५ ।

८५१. आणा उचित उचित उचितें । भाणा भात आईतें । १ ।
भात सारा भात सारा । हरिहरास्मरणी । २ ।
गाई गोपाळापें हरी । आणा तरी शिदोऱ्या। ३ ।
नामा म्हणे काल्या मिसें । श्रीनिवास स्मरावा। ४ ।

८५२. एके ठायीं करूनी अन्न। हातें वाढी नारायण। १ ।
हें पाहोनी सुरवर । चित्तीं करिती विचार। २ ।
धन्य पुण्य गौळीयांचे । आम्हां अन्न मिळे कैचें। ३ ।
एक असे युक्ति । हात धुवील श्रीपति। ४ ।

उच्छिष्टाचे मिषें । देव जळीं झाले मासे । ५ ।
हें कळलें धननीळा । सांगतसे हें गोपाळा । ६ ।
चला वृंदावना जाऊं । नामा म्हणे उदक घेऊं । ७ ।

८५३. गडी आणि रमापती । तेव्हां आनंदें जेविती । १ ।
कोणी मांडिताती पानें । वरी ठेविताती अन्नें । २ ।
कोणी ठेवी मांडीवरी । कोणी जेवी भूमीवरी । ३ ।
कोणी पसरिती चवाळें । कोणी अंथरती काळें । ४ ।
गोळे घेऊनियां हातीं । येरयेरातें हाणिती । ५ ।
पाहाताती देव । धन्य धन्य त्यांचा भाव । ६ ।
मिटकीया देती । देवा वांकुल्या दाविती । ७ ।
माया मोही ब्रह्मादिका । नामा म्हणे तोचि एका । ८ ।

८५४. जन्म गेले याचे राखतां गाई । याचिया बोला विश्वास काई । १ ।
गोधनें राखितो आपण पेंढारा । तुझ्यानी मिळती पाणियाचा धारा । २ ।
हातीं डांगा खांदीं कांबळा । तुझ्या गाई आम्ही राखों गोपाळा । ३ ।
आठ कोटी नव बहात्री गाई । गोधनें बैसलीं आपुले ठायीं । ४ ।
झालीं गोधनें बैसलीं वाडां । संत पाहों आले तंव झांपा उघडा । ५ ।
गोधनें चरती बाराही रानें । माझें मन तुझें वासरूं तान्हें । ६ ।
गोधनें चरितां कृष्ण सांगाती । विष्णुदास नामा देतुसे वळती । ७ ।

८५५. ब्रह्मादिकां पाहतां ठक पडियेलें । पहाहो कैवल्य गौळिया जोडलें । १ ।
कोण्या सेवे ऋणी हा केला नकळे । परब्रह्म आमुचें आहे सांवळें । २ ।
या गोकुळाचेनी पाडे पाहतां । सुख वैकुंठी न दिसे सर्वथा । ३ ।
ऐसा अभिनव आनंदु जाणतों । गोकुळींचें तृण तरुवर तरी होतों । ४ ।
कामक्रोध लावियेला येणें निवे । तेणें सुखें शुद्ध लागलीसे सवें । ५ ।
नामया स्वामी हृदयींचा विसांवा । आपुलें सर्वस्व देऊनियां जोडावा । ६ ।

८५६. त्रिभुवनाचें जीवन जें अनंतें दैवें । कैसें भाग्य लाधलें लक्ष्मीचें । १ ।
धन्य गौळियांचें धन्य धन्य जिणें । ज्या घरीं खेळवणें परब्रह्म । २ ।
अंगें खेळवणें परब्रह्म गौळीजणें । लीला सामावणें रोमरंध्रीं । ३ ।
नामा म्हणे तें दैवचि कारण । झालें खेळवणें परब्रह्म । ४ ।

८५७. गौळियांचीं पोरें वांकुल्या दाविती । क्रोधावला चित्तीं ब्रह्मदेव । १ ।
चोरोनियां नेत गोवत्स गोपाळ । पाहूं याचें बळ किती आहे । २ ।
जाणोनियां चित्तीं देव हांसतसे । सामर्थ्य पाहातसे पुत्र माझा । ३ ।
तेथून आणावीं नव्हे हें उचीत । म्हणेल किंचित पराक्रम । ४ ।
नामा म्हणे ऐसें विचारिलें चित्तीं । करीतसे श्रीपति काय तेव्हां । ५ ।

८५८. गायीवत्सगोपाळ केलीसे निर्माण । न लागतां क्षण परीक्षिती । १ ।
पूर्ववत सर्व न्यून कांहीं नाहीं । करीता पाही क्षणामाजी । २ ।
इच्छामात्रें करी ब्रह्मांडाच्या कोटी । त्यासी काय गोष्टी अपूर्व हे । ३ ।
सायंकाळीं गेले गोकुळाभीतरीं । आपुलाल्या परी घरीं सर्व । ४ ।
ब्रह्मादिकां ज्याचा नकळेची पार । मानवा विचार न कळे कांहीं । ५ ।
ऐसा हा समर्थ नामयाचा धनी । वंदी पायवणी सदाशीव । ६ ।

८५९. एक संवत्सर झालासे सकळां । पाहावया आला ब्रह्मदेव । १ ।
पूर्ववत गायी गोपाळ देखिले । आश्चर्य वाटलें तेव्हां त्यासी । २ ।
ब्रह्मांडांत ब्रह्मा दुजा असे कोण । केलेंसे उत्पन्न याजलागीं । ३ ।
घेवोनियां गेलों तेंची आहे येथें । जावोनियां तेथें पाहातसे । ४ ।
भ्रांतीनें व्यापीलें तयाचें तें मन । देखतों मी स्वप्न किंवा सत्य । ५ ।
नामा म्हणे एके ठायीं उभा राहे । न्याहाळून पाहे सकळांसी । ६ ।

८६०. चतुर्भुज दिसे शंखचक्र हातीं । मुकुट शोभती सर्वांलागीं । १ ।
कर्णीचीं कुंडलें वैजयंती माळा । देखतसे डोळां ब्रह्मदेव । २ ।
कौस्तुभ हृदयीं श्रीवत्सलांछन । बाहूचीं भूषणें पाहातसे । ३ ।
चरणीं तोडर पीत पीतांबर । तेजें दिवाकर लोपतसे । ४ ।

आपादपर्यंत तुळसीच्या माळा। मुद्रिका दशांगुळा रत्नाचिया। ५ ।
केशराचे टिळे नेत्र कमलाकार। दंती इंदुकर बैसलेती। ६ ।
कोटीकृष्ण मूर्ति कोटि ब्रह्म दिसती। स्तवनीं स्तविताती सुरवर। ७ ।
नामा म्हणे ऐसें दावीत गोविंद। झालासे सावध ब्रह्मा तेव्हां। ८ ।

८६१. ओळखे बापाला। ब्रह्मा धावोनियां आला। १ ।
नेत्रीं अश्रूंचिया धारा। कांपतसे थरथरा। २ ।
घाली नमस्कार। म्हणे अपराधी मी थोर। ३ ।
जोडोनियां हात। नामा म्हणे स्तुति गात। ४ ।

८६२. श्रवणमात्रें जळती पापाचे पर्वत। ऐकें ब्रह्मगीत शुक म्हणे। १ ।
धरूनि विश्वास करी जो पठण। तरेल तो जाण भवसिंधू। २ ।
आपण तरेल नव्हे हें नवल। कुळें उद्धरील सकळही। ३ ।
एकेक अक्षर निर्दळील महा पाप। करा याचा जप शौनक हो। ४ ।
नाम घेतां धांवे अनवाणी पाय। कोमळ हृदय कृष्णजीचें। ५ ।
न विचारितां याति कुळ अमंगळ। न पाहे काळ वेळ धांव घेई। ६ ।
शरणागता नेदी काळाचिये हातीं। नामा म्हणे चित्तीं दृढ धरा। ७ ।

८६३. भवसिंधु तराया एकचि उपाय। ध्यावे तुझे पाय वासुदेवा। १ ।
गोविंद गोपाळ वाचेसी निखळ। उद्धरे तात्काळ कलीमाजी। २ ।
अहर्निशी कीर्ति गाती भाविक भोळे। त्यांनीं तुज जिंकिलें ब्रह्मा म्हणे। ३ ।
नामा म्हणे ऐसें दाविलें सुगम। नलगे तुम्हा नेम नाना कोटी। ४ ।

८६४. कृष्णभक्तींविण तरला आहे कोण। द्यावा निवडून एक तरी। १ ।
कार्य आणि कारण लटका हा शीण। वर्म न कळोन वांयां गेलें। २ ।
नामा म्हणे माझी केशव माउली। कृपेनें दाविली वाट मज। ३ ।

८६५. धन्य त्या गोपिका धन्य त्यांच्या माता। धन्य महीमा या ब्रह्मा म्हणे। १ ।
विश्वात्मा जो हरी क्रीडे या वनांत। तृणादि समस्त धन्य धन्य। २ ।
धन्य गोवर्धन धन्य वृंदावन। वृक्षादि पाषाण धन्य धन्य। ३ ।

धन्यहें गोकुळ धन्य हे गोपाळ। व्रजवासी सकळ धन्य धन्य। ४ ।
धन्य ही यशोदा स्तन दे मुकुंदा। धन्य तूंची नंदा त्रैलोक्यांत। ५ ।
ब्रह्मसनातन वेदासी नकळे। तें गड्यांसवें खेळे अरण्यांत। ६ ।
विश्वाचा जो बाप नंद त्याचा पिता। यशोदेसी माता म्हणतसे। ७ ।
सद्गदित कंठ नेत्रीं जळ वाहे। नामा म्हणे काय मागतसे। ८ ।

८६६. इतुकें मागतसें तुज। वनीं जन्म देईं मज। १ ।
सुखें करूनी राहीन। तुझे पाहीन चरण। २ ।
बहुत शीणलों। आतां तुजपाशीं आलों। ३ ।
न करीं अव्हेर। दास तुझा मी किंकर। ४ ।
ब्रह्मा येतो काकुळती। नामा म्हणे देवाप्रती। ५ ।

८६७. काय देशील यांजला। ब्रह्मा म्हणे न कळे मला। १ ।
म्हणसी देईन मी मुक्ति। तरी ऐक रमापति। २ ।
मारायासी आले। त्यांसी स्वरूपीं मिळविलें। ३ ।
येथोनियां नवजासी। मज कळलें मानसीं। ४ ।
आणोनियां देत। गायी गोपाळ समस्त। ५ ।
घाली पोटामध्यें डोई। क्षमा करीं माझे आई। ६ ।
आज्ञा घेवोनियां गेला। नामा म्हणे स्वस्थ झाला। ७ ।

८६८. मेघःशाम वर्ण झालासी सगुण। कार्य आणि कारण तुज नमो। १ ।
गुंजाहार गळां मयुरपुच्छे वेंष्टी। कृपाळु जगजेठी तुज नमो। २ ।
वनपुष्पमाळा आपाद शोभती। लक्ष्मीच्या पति तुज नमो। ३ ।
वेणू वाजविसी गायी त्या चारीसी। न कळे कोणासी तुझी लीला। ४ ।
हातीं तुझ्या कवळ शोभे पीतांबर। चरण सुंदर तुज नमो। ५ ।
घेवोनि अवतार दुष्टांसी मारिसी। भक्तांसी रक्षिसी निरंतर। ६ ।
रावण कुंभकर्ण मारीसी आत्मारामा। सोडविलें आम्हां बंदीहुनी। ७ ।
तुझें मी बालक वेडें अविचारी। नामा म्हणे करीं कृपा आतां। ८ ।

८६९. यमुने पांवळी देखियेली मूर्ती । तळपती दीप्ति तेजोमय । १ ।
सांवळें सुंदर ओंकार वर्तुळ । मध्यें घननीळ पाचारितो । २ ।
सुरंग ओतिली प्रेमतनु छाया । तेणें तुझी माया काय वाणूं । ३ ।
नामा म्हणे विठो चातुर्या सुजाणा । गुणागुणीं किरणा प्रभा भासे । ४ ।

८७०. उठोनि प्रातःकाळीं गौळणी बोलती । जाईल श्रीपती वना आतां । १ ।
चला जाऊं आतां पाहूं गे श्रीमुख । हरेल ही भूक डोळियांची । २ ।
तांतडीनें येती नंदाचिया घरा । मुख दावीं उदारा कृष्णराया । ३ ।
कुरळे हे केश सुहास्य वदन । आकर्ण नयन शोभताती । ४ ।
अरुणोदय प्रभा अधरीं दिसती । हिरे झळकती दंत तुझे । ५ ।
भोंवया व्यंकटा सरळ नासिक । पाहोनियां मुख सुख होय । ६ ।
लल्लाटीं शोभत केशराचा टिळा । वर बिंदु रेखिला कस्तुरीचा । ७ ।
वैजयंती माळा किरीट कुंडलें । नामयानें केलें निंबलोण । ८ ।

८७१. कालिंदीचे डोहीं कालियाची वस्ती । ऐक परीक्षिती चरित्र हें । १ ।
पक्षीश्वापदांनीं सांडियेलें स्थळा । निघताती ज्वाळा तया डोहीं । २ ।
विषाचियायोगें झाडें जळताती । जीवन न घेती कोणी त्याचें । ३ ।
वैकुंठनायक तया वनीं आला । गोपाळांचा मेळा बरोबरी । ४ ।
हुतुतु हमामा लपंडाई खेळती । देवासी म्हणती लपें आतां । ५ ।
तृषाक्रांत गाई झाले ते गोपाळ । पिती तेव्हां जळ कालिंदीचें । ६ ।
लहानाली मुलें नाहीं तया ज्ञान । झाले गतप्राण सकळांचे । ७ ।
नामा म्हणे तेव्हां कृपादृष्टी पाहात । उठवी समस्त गायी गडी । ८ ।

८७२. जगजेठी तेव्हां क्रोधावला चित्तीं । करीन मी शांति तुझी आतां । १ ।
माझिया लेंकरा दिधलासे त्रास । करीन मी नाश आतां तुझा । २ ।
त्रैलोक्यांत कोण ऐसा हो समर्थ । माझे शरणागत मारील जो । ३ ।
माझिया भक्तां कोण गांजी निर्दय । करीन प्रळय त्याजवरी । ४ ।

स्फुरताती दंड कांपती अधर। उठला सत्वर जगदीश। ५ ।
कळंबाचे वृक्षीं देव चढतसे। पीतांबर मागे खोंवीयले। ६ ।
जगद्गुरु तेव्हां पुष्पमाळा काढी। टाकितसे उडी जळामध्यें। ७ ।
नामा म्हणे शोकें व्यापिलें समस्त। करूनि एकांत मनें ऐका। ८ ।

८७३. घालीतसे वेढे दिसतसे जळीं। आकांत सकळीं मांडियेला। १ ।
गाई रडताती वत्स पळताती। कपाळ पिटिती सकळीक। २ ।
तुजवांचोनीयां रक्षी कोण आम्हां। काय सांगूं रामा सकळीक। ३ ।
रुसल्या आमुचें करी समाधान। तुजवीण वन ओस वाटे। ४ ।
आम्हांसाठीं तुवां दुष्टासी मारिलें। कोण आतां लळे पुरवील। ५ ।
तुजवांचोनियां आम्ही सर्व दीन। न जाऊं येथून गोकुळासी। ६ ।
वियोगानें तेव्हां पक्षी रडताती। आतां कृष्णमूर्ती कैंची आम्हां। ७ ।
बोलोनियां ऐसें निस्तेज पडती। नदी वाहत होती स्थीरावली। ८ ।
नामा म्हणे होती दुश्चिन्हें बहुत। गोकुळीं समस्त विचारिती। ९ ।

८७४. यशोदा व्याकूळ जाहालीसे प्राणें। सुखी असो तान्हें बनामाजी। १ ।
उठती तिडका स्तनीं माझ्या फार। लवतसे नेत्र वेळोवेळां। २ ।
जीव तळमळी दाटे माझा प्राण। केव्हां मी पाहीन पाडसासी। ३ ।
गोकुळींचे जन निघाले सकळ। पाहाताती गोपाळ वनामध्यें। ४ ।
कालिंदीच्या तीरीं पडिले सकळ। पाहोनि कोल्हाळ करीताती। ५ ।
कपाळ पिटिती यशोदा रोहिणी। आतां चक्रपाणि कैंचा आम्हां। ६ ।
धांव धांव कृष्णा दावीं रे वदना। पाजूं आतां पान्हा कोणालागीं। ७ ।
तुझ्या कौतुकें कंठीं मी संसार। जळतें अंतर तुजसाठीं। ८ ।
कोणावरी आतां घालूं अलंकार। बुडालें हें घर माझें आतां। ९ ।
नामा म्हणे शोकें जाऊं पाहे प्राण। सकळांचें जीवन कृष्णनाथ। १०।

८७५. नंद म्हणे माझें बुडालें जहाज । अभाग्यासी मज कृष्ण कैचा । १ ।
काय माझें तप संपूर्ण सरलें । म्हणोनि बुडालें तान्हें माझें । २ ।
चिंतेनें व्याकूळ पिटी वक्षस्थळा । दावा रे सांवळा प्राण माझा । ३ ।
आलिया अतीता त्रासें दवडीलें । म्हणोनि बुडालें बाळ माझें । ४ ।
प्रात:काळीं पाहुं कोणाचें मी मुख । येथुनियां सुख नाहीं नाहीं । ५ ।
समस्तांची दृष्टी करी तुज कष्टी । म्हणोनि जगजेठी टाकियलें । ६ ।
गोकुळींचे जन देऊं पाहाती प्राण । वाचाया कारण काय आतां । ७ ।
अभय देतसे बळिभद्र सर्वांसी । मारून दुष्टांसी येईल आतां । ८ ।
अंतर्यामीं जाणे जन झाले वेडे । नामा म्हणे वेढे काढितसे । ९ ।

८७६. तयाचे मस्तकीं नाचे नारायण । आरंभी गायन जगदीश । १ ।
त्रैलोक्याचा भार घाली हृषीकेशी । दमीत दुष्टासी स्वामी माझा । २ ।
होतां एक क्षण झाला तेव्हां क्षीण । जाऊं पाहे प्राण काळीयाचा । ३ ।
तेव्हां त्याच्या स्त्रिया करिताती स्तुती । लक्षुमीच्या पती कृपाळूवा । ४ ।
यज्ञेशा अच्युता गोविंदा माधवा । दयानिधि केशवा कृष्णनाथा । ५ ।
श्रीधरा वामना अगा वासुदेवा । ऐकावी ही देवा विज्ञापना । ६ ।
आम्हांलागीं आतां देईं चुडेदान । धरिती चरण कृष्णजीचे । ७ ।
दीनाचा दयाळ दासाचा कैवारी । नामा म्हणे हरि उतरला । ८ ।

८७७. राहूं नका येथें जावें समुद्रासी । सांगे हृषीकेशी सकळिकां । १ ।
गुडिया मस्तकीं असे माझा चरण । न भक्षी तुज जाण पक्षीराज । २ ।
दिव्य सुमनांच्या घालिताती माळा । पूजिती सांवळा बाप माझा । ३ ।
अनर्घ्य रत्नांचे देती अलंकार । श्रीमुख सुंदर पहाताती । ४ ।
यांबुनदातटीं घालिती भोजन । निघती तेथून सकळीक । ५ ।
आला भगवान आनंदले गडी । उभारिती गुढी जन तेव्हां । ६ ।
काळिया आख्यान स्मरे जो मानसीं । न डंखिती त्यासी सर्पकुळें । ७ ।
अहर्निशीं याचें करी जो पठण । नामा म्हणे विघ्न नाहीं तेथें । ८ ।

८७८. आला वनमाळी । मग भेटती सकळी । १ ।
यशोदा रोहिणी । पोटीं धरिती चक्रपाणि । २ ।
गायी धांवताती । कृष्ण अंगातें चाटिती । ३ ।
उड्या मारिताती । गडी आनंदें नाचती । ४ ।
न वर्णवे आनंद । नामयाची बुद्धि मंद । ५ ।।

८७९. झाला अस्तमान तेथेंचि रहाती । ऐकें परीक्षिती अद्‌भुत हें । १ ।
निद्रेनें व्यापिलें असे तेव्हां सर्वां । लागला वणवा तया स्थानीं । २ ।
गायी पळताती पक्षी उडताती । पिलीं पडताती कृष्णापुढें । ३ ।
हाहा:कार झाला धांव धांव कृष्णा । वांचवीं रे प्राणा सकळांच्या । ४ ।
तुझीं आम्ही बाळें वाचवीं रे आम्हां । धांव धांव रामा म्हणताती । ५ ।
आक्रोशें रडती मारिताती हांका । वैकुंठनायका रक्षीं आम्हां । ६ ।
दीनांचा दयाळ मनाचा कोमळ । घाली अग्निज्वाळ मुखामाजी । ७ ।
होतां प्रात:काळ सकळ चालिले । नामा म्हणे आले गोकुळांशी । ८ ।

८८०. डोहामाजीं ग्राम होता बहुत दिवस । आतां कासावीस काय सांगूं । १ ।
विक्राळ होऊनि आला चक्रपाणि । कालिया निर्वाणीं ध्यान करी । २ ।
नको काढूं मज उदका बाहेरी । दंडवत करी कालिया तो । ३ ।
नामा म्हणे ऐसा काढिला विखारी । कीर्ति वानूं तरी किती देवा । ४ ।

८८१. हुंबरीच्या मिषें हुतुतु खेळती । गड्यांशीं श्रीपति सर्वकाळ । १ ।
कळंबाचे झाडाखालीं कुंकुमाचे सडे । गोपाळा पवाडे दावीतसे । २ ।
काय काय सोंग घेत नानापरी । गोपिकांचे घरीं काम सारीं । ३ ।
नामा म्हणे ऐसी अगाध जे कीर्ति । भोळ्या भक्तांप्रति दावीतसे । ४ ।

८८२. करिती गायन रामकृष्णहरी । गोकुळींच्या नारी जाती तेथें । १ ।
शंख नामा तेथें आलासे गुह्यक । नाहीं त्या विवेक पापियासी । २ ।
उपजला काम तयाचिया मना । घालोनि विमाना स्त्रिया नेत । ३ ।

धांव धांव रामा नेतसे हा आम्हां। अगा मेघश्यामा कृष्णनाथा। ४ ।
नेती स्त्रिया काय न कळेचि देवा। यासी करूं ग्रावा अपराध। ५ ।
हातीं वृक्ष दोचे ऐसें पाहोनियां। टाकोनि तो स्त्रिया पळतसे। ६ ।
घालितांचि वृक्ष प्राणासी मुकला। मणी त्याचा दिला बळीभद्रा। ७ ।
भक्तांसाठीं मारी दुष्टां जगजेठी। नामा म्हणे तुटी विस्मरेना। ८ ।

८८३. गोपिकांचा मेळा आला गृहाप्रती। काय त्या म्हणती नंदालागीं। १ ।
परब्रह्म साक्षात् क्षीरसागरवासी। त्या कैसा धाडसी वनामध्यें। २ ।
ब्रह्मा आणि इंद्र आले गोकुळासी। वर्णिती कृष्णासी तुम्हीं देखा। ३ ।
तेहेतीस कोटी देव जयातें प्रार्थित। त्यासी अरण्यांत रूपती कांटे। ४ ।
दैत्यांचा हा भार जाहला पृथ्वीसी। कंस वधायासी आला येथें। ५ ।
त्याजसाठीं फार श्रमताती योगी। कैलासाचा योगी ध्यान करी। ६ ।
भ्रांती कारे तुज पडे वेळोवेळां। पाहातोसी डोळां चरित्रास। ७ ।
नामया सुकृत झालें असे फार। म्हणोनि विचार नाठवेची। ८ ।

८८४. त्रिभंगी देहुडे उभे वृंदावनीं। वेणु चक्रपाणि वाजवितो। १ ।
व्याघ्रावरी गायी टाकितानी माना। बाळें स्तनपाना विसरती। २ ।
सर्प आणी नाग मुंगुसें बैसती। जळेंही वाहाती विसरलीं। ३ ।
हस्ती सिंह एके ठायीं बैसतानी। भ्रमर भुलती वेणुनादें। ४ ।
विंचरिती वेणी तेथें राहे फणी। करितां भोजनीं ग्रास मुखीं। ५ ।
उदकाचे कुंभ गोपिकांचे शिरीं। यमुनेचे तीरीं वेडावल्या। ६ ।
जाहाले तटस्थ त्रिलोकिचे जीव। विसरला शीव देहभावा। ७ ।
नामा म्हणे व्योमीं उभ्या देवांगना। पाहोनियां कृष्णा भुलताती। ८ ।

८८५. वेणु वाहूनि चित्त दुहिलें। रूप दावुनि मज मोहियलें। १ ।
वेधु वेधकु गोपाळ लाघवी। जीवा लावियली आवडी नित्य नवी। २ ।
दृष्टीपुढें माझें ध्यान ठेवियेलें। वृत्तिसहित मन तेथें माझें गोंविलें। ३ ।

शुद्ध शामकमळदळ लोचनु । पांवा वाजविलसे देहुडा रुणझुणु । ४ ।
तया प्रभा दिसती दिशा निर्मळ । कृष्ण पाहतां मन झालें व्याकुळ । ५ ।
नामया स्वामीचें अनुपम्य रूपडें । पाहतां मन फिरलें माघारें । ६ ।

८८६. नको वाजवूं श्रीहरी मुरली । तुझ्या मुरलीनें तहान भुक हारली । ध्रु० ।
गोपाळ गड्यांचा मेळ । हरी संगे खेळ । कुंजवनी रमली । १ ।
खुंटला वायुचा वेग । वर्षत मेघ । जळी स्थिरावली । २ ।
मुरलीचे नादे देव । ऋषी गण गंधर्व । समाधी गळली । ३ ।
नामा चरणीचा दास । मागतसे आस । आशा नाही पुरली । ४ ।

८८७. तृणाचिया लोभें गायी गेल्या दुरी । पाचारी मुरारी नामें त्यांचीं । १ ।
चंद्रभागे गंगे भागीरथी यमुने । येईं ताम्रपर्णे धांवोनियां । २ ।
सरस्वती प्रवरे कालिंदी नर्मदे । येईं तुंगभद्रे धांवोनियां । ३ ।
देवाजीचा शब्द ऐकोनियां कानीं । येताती धांवोनि नामा म्हणे । ४ ।

८८८. प्रातःकाळीं सांगे सकळांसी कृष्ण । नका घेऊं अन्न आज कोणी । १ ।
सोडोनियां गायी चालीले वनासी । गडी हृषीकेशी खेळताती । २ ।
वर्जियलें आम्हां नका घेऊं अन्ना । खावें काय कृष्णा आजी आतां । ३ ।
गडीयांसी सांगे वैकुंठींचा राणा । सांगावें ब्राह्मणा जावोनियां । ४ ।
वनीं उपवासी आहे रामकृष्ण । द्यावें त्यासी अन्न कृपा करोनि । ५ ।
गोपाळासी तेव्हां धाडी वासुदेव । पाहावया भाव याज्ञिकांचा । ६ ।
जोडोनियां हात वंदिती द्विजांसी । धाडिलें आम्हांसी कृष्णनाथें । ७ ।
नामा म्हणे ऐसें सांगती गोपाळ । याज्ञिकां सबळ अभिमान । ८ ।

८८९. पडे प्रायश्चित बोलों नका कोणी । ऐकूं नये कानीं शब्द यांचा । १ ।
स्वर्गसुखासाठीं करिताति यज्ञ । टाकिती अवदान अग्निमुखीं । २ ।
भोक्ता वनीं आला न कळेचि त्याला । पूर्ण ब्रह्म कृष्णाला न जाणती । ३ ।
कृपाळु बहुत परीक्षिती राया । उद्धार कराया पाठविलें । ४ ।

इच्छामात्रें पाडी अन्नाचे पर्वत । काकुलती येत अन्नासाठीं । ५ ।
गडियांसी कळे तेथील आकार । निघती सत्वर तेथुनियां । ६ ।
येवोनियां कृष्णा सांगितलें त्यांनीं । हांसे चक्रपाणि नामा म्हणे । ७ ।

८९०. कृष्णा पांच खामा उभले तिम्ही । लाहानाल्या भिंती त्याजवरी । १ ।
विस्तु घालितानी गवत आंथरती । बडबड करीती अवघेजण । २ ।
वालुनियां तूप हातीं घेती चाटू । करीती ॐ फट् अक्षवेळ । ३ ।
लांकडाचें पाळें घेउनि बैसला । मिळालासे मेळा त्याजपुढें । ४ ।
एवढेंसें भांडें तांदुळ शिजविती । तुजला काय देती त्यातुनियां । ५ ।
घडिघडी उठती घडिघडी बैसती । तें काय श्रीपति आम्हां सांग । ६ ।
काय चतुराई असे त्या गोवळा । भावासी भुलला नामा म्हणे । ७ ।

८९१. गडियांसी तेव्हां सांगितलें देवें । स्त्रियांसी मागावें जाऊनियां । १ ।
नको कृष्णा द्विज आम्हांसी मारिती । अभय श्रीपती त्यांसी देत । २ ।
त्वरें करोनियां गेले स्त्रियांपाशीं । सांगितलें त्यांसी वर्तमान । ३ ।
ऐकोनियां ऐसें उठिल्या सत्वर । वर्जिती भ्रतार तेव्हां त्यातें । ४ ।
एका ब्राह्मणानें स्त्रियेसी बांधिलें । प्राणासी सोडिलें परीक्षिती । ५ ।
सुकुमार सांवळा राजीवलोचन । पहाताती कृष्णमुख तेव्हां । ६ ।
आनंदानें नेत्रीं वाहातें जीवन । पुसे वर्तमान नामा म्हणे । ७ ।

८९२. घरा जावें ऐसें सांगे पुरुषोत्तम । ऐकोनियां श्रम फार होय । १ ।
दयानिधि ऐके अगा मेघश्यामा । धाडूं नको आम्हां येथूनियां । २ ।
तुजसाठीं आम्ही सोडिले भ्रतारां । चरणीं देईं थारा देवराया । ३ ।
देव ना संसार आम्हां झालें कृष्णा । सांगावें हें कोणा दु:ख आतां । ४ ।
तुमचे भ्रतार वंदिती आम्हांसी । सांगे हृषीकेशी भिऊं नका । ५ ।
सांगतांची ऐसें चालियेल्या सर्व । पाहाती केशव वेळोवेळां । ६ ।
द्विजाचे मानसीं होय अनुताप । निंदिती आप आपणातें । ७ ।
भोजन करूनी गडी रामकृष्ण । निघती तेथून नामा म्हणे । ८ ।

८९३. इंद्राचा विभाग भक्षी नारायण। रूप गोवर्धन धरूनियां । १ ।
क्रोधावला इंद्र गौळियां निंदीत। दावीन सामर्थ्य तुम्हां आतां। २ ।
पोरांच्या बुद्धीनें वर्तताती सर्व । धरूनियां गर्व तेची करी। ३ ।
प्रलय मेघाच्या काढिल्या शृंखला । वर्षावें गोकुळा जाऊनियां । ४ ।
आज्ञा म्हणोनियां वंदियेला इंद्र । कोपे जैसा रूद्र प्रलयींचा। ५ ।
मुसळाच्या धारा मेघ वर्षताती । गारा पडताती शिळा ऐशा। ६ ।
मरताती पक्षी श्वापदें अपार। हिंवें नारीनर कांपताती। ७ ।
नामा म्हणे गायी हंबरडा फोडिती । येऊनी पडती कृष्णापुढें । ८ ।

८९४. काकुळती येती सकळिक लोक । पाहासी कौतुक काय आतां। १ ।
मागें बहुतापरी रक्षियलें आम्हां। अगा पुरूषोत्तमा दीनबंधु। २ ।
कोण तुजविण आम्हांसि रक्षिता। उदारा अनंता जगजेठी । ३ ।
शरण शरण अगा वासुदेवा। अच्युता माधवा नारायणा । ४ ।
विलंब केलिया जातील रे प्राण। धरिती चरण नामा म्हणे। ५ ।

८९५. सकळिकां तेव्हां देवें आश्वासिलें । इंद्रें हें मांडिलें विघ्न येथें। १ ।
महेंद्राचा रंक करीन क्षणांत । पाहें पुरूषार्थ दावीन मी । २ ।
रक्षिणार यांसी आहें मी गोविंद । उतरीन मद तुझा आतां । ३ ।
शरणागता मारी ऐसा कोण थोर। मशक पामर पाहूं आतां। ४ ।
यासाठीं करीन सृष्टीचा उभारा । लागों नेदी वारा दुःखाचा मी। ५ ।
गोवर्धना तुम्ही चला रे सकळ । दावितों मी बळ इंद्रा आतां। ६ ।
उचलिला गिरी प्रथम अंगुळीं। नामा म्हणे बळी बाप माझा। ७ ।

८९६. राहा याचे तळीं आनंदें करूनी । मानूं नका मनीं भय याचें । १ ।
पाहूं किती दिवस पडतो पाऊस । धरीन निःशेष प्रलयांत । २ ।
सांगतांचि ऐसें राहाती सकळ । वर्णिताती बळ परस्परें । ३ ।
सौंगडे म्हणती तेव्हां ते समस्त । लावा की रे हात सकळीक। ४ ।

उगेची श्रमती बालकें अज्ञान । म्हणे नारायण काढा हात । ५ ।
सप्त दीन होती मागंतां योगींद्र । पाळावया इंद्र येता झाला । ६ ।
अद्‌भुत चरित्र पाहून गेली भ्रांत । मेघासी सांगत पुरे करा । ७ ।
नामा म्हणे इंद्र चित्तीं चिंतावला । अपराध घडला समर्थाचा । ८ ।

८९७. राहिला पाऊस निघावें बाहेर । सांगे विश्वंभर सकळांसी । १ ।
दीनबंधू तेव्हां ठेवी पर्वतासी । भेटती देवासी सकळीक । २ ।
आयुष्य बहुत तुज होवो कृष्णा । बांचविले प्राणा सकळांच्या । ३ ।
विष्णुदास नामा ओंवाळून जाव । येगे माझे माय भेटी देई । ४ ।

८९८. वाहातसे नेत्रीं इंद्राचिये नीर । अपराधी थोर देवराया । १ ।
क्षमा करीं आतां अच्युता अनंता । अगा कृष्णनाथा दीनबंधू । २ ।
तुझिया दासासी दुःख म्यां दिधलें । भ्रांतीनें मोहिलें मन माझें । ३ ।
दावीं तुज थोरी न करींच सेवा । करा दंड देवा मजलागीं । ४ ।
तूंचि माझा बाप तूंचि माझी आई । क्षमा कृष्णाबाई करीं आतां । ५ ।
दैत्य मारावया भूतळीं आलासी । भक्तांला रक्षिसी निरंतर । ६ ।
जगद्‌गुरू माझा धनी बनमाळी । जोडोनि आंजुळी उभा असे । ७ ।
चतुर्भुज गळां वैजयंती माळा । पाहातसे डोळां नामा म्हणे । ८ ।

८९९. गोविंदा माधवा केशवा वामना । मायातीता कृष्णा तुज नमों । १ ।
गोवर्द्धनधरा देवा विश्वंभरा । निर्गुण निराकारा तुज नमों । २ ।
जनार्दना हरि कृपाळु हृषिकेशा । पुराणपुरुषा तुज नमों । ३ ।
अव्यक्ता क्षेत्रज्ञा अचिंता कुटस्था । भुवनत्रयनाथा तुज नमों । ४ ।
अनंत ब्रह्मांडें तुझिये उदरीं । घनश्यामा हरि तुज नमों । ५ ।
देवराया तुझें कोमळ हृदय । कृपादृष्टी पाहें मजकडे । ६ ।
तुझा मी किंकर आहें वासुदेवा । अभय या जीवा देई आतां । ७ ।
नामा म्हणे घाली चरणासी मिठी । बोले जगजेठी स्वामी माझा । ८ ।

९००. तुझा मोडिला म्यां यज्ञ । एक तयाचें कारण । १ ।
न करिसी रे स्मरण । सुखारूढ तुझें मन । २ ।
विसरलासी मज । अनुग्रह केला तुज । ३ ।
ऐसें सांगे नारायण । नामा म्हणे सावधान । ४ ।

९०१. आणुनि सुरभि करी अभिषेक । येती सकळिक मरुद्गण । १ ।
सुरवरांची दाटी करिती नमस्कार । होतसे अपार पुष्पवृष्टी । २ ।
वेदमंत्रघोष ऋषि करिताती । अप्सरा नाचती थैयथैय । ३ ।
नारद तुंबर गंधर्व गायन । वर्णिताती गुण कृष्णजीचे । ४ ।
यथाविधि इंद्र पूजी विश्वंभरा । जोडोनियां करा उभा राहे । ५ ।
आज्ञा घेऊनियां जाय स्वस्थळासी । येती गोकुळासी सकळीक । ६ ।
चरित्र जो कोणी उच्चारील वाचे । जळती पापाचे पर्वत हे । ७ ।
नामा म्हणे ऐसें सांगतसे शुक । सूत पुराणिक शौनकासी । ८ ।

९०२. आकाश गडगडी विद्युल्लता तळपती । अनिवार मेघ सणसणां वरुषती । १ ।
राखियलें येणें देवकीनंदनें । गोपाळ म्हणती आमुचें कान्हे । २ ।
गोवर्धनगिरी उचलोनि निजकरीं । राखिलें यापरी नामा म्हणे । ३ ।

९०३. गौळी म्हणती हृषिकेशी । दावी आपुल्या स्थळासी । १ ।
सखा तूंची कृष्णा । आमुची पुरवावी वासना । २ ।
दावी वैकुंठ सकळां । क्षण एक पाहूं डोळां । ३ ।
नामा तेथील रहिवासी । आला स्थापाया धर्मासी । ४ ।

९०४. लोपतां आदित्य चढे चंद्रप्रभा । वृंदावनीं शोभा सुशोभित । १ ।
देहुडा पाउलीं उभा तये वनीं । वेणू चक्रपाणि वाजवितो । २ ।
एकतांचि नाद गोकुळींच्या नारी । पाहावया हरि निघताती । ३ ।
भ्रतार सेजेसी टाकुनि उठती । वाढितां पंगती निघताती । ४ ।
स्तन देतां बाळें टाकिलीं भूमीसी । मोकळिया केशीं निघताती । ५ ।
नामा म्हणे ऐशा गेल्या देवापाशीं । आनंद मानसीं न समाये । ६ ।

१०५. वनामध्यें कां गे आलांती सकळ । विनोदें गोपाळ म्हणतसे । १ ।
निशींमाजीं व्याघ्र फिरताती रानीं । जावें सकळांनीं घरां आतां । २ ।
ऐकोनिया ऐसें कठीण वचन । चालिलें जीवन नेत्रींहूनी । ३ ।
वेणुनाद दूत धाडिला आम्हांसी । आलिया म्हणसी जावें आतां । ४ ।
शहाणा चतुर आहेसी नेटका । वैकुंठनायका विचारावें । ५ ।
कामाग्नीनें कृष्ण धरिती सकळ । मांडियेला खेळ मन्मथाचा । ६ ।
एक एक नारी एक एक कृष्ण । करावया पूर्ण इच्छा त्यांची । ७ ।
प्रकृतीसी ऐसा भुलला गोविंद । करिती आनंद नामा म्हणे । ८ ।

१०६. झाला अभिमान धन्य आम्हीं आतां । लक्ष्मीच्या कांता भोगीतसों । १ ।
गुप्त झाला तेव्हां वैकुंठनायक । करिताती शोक सकळीक । २ ।
निघाल्या तेथुनि फिरताती वनें । यशोदेचें तान्हें धुंडावया । ३ ।
वृक्ष आदि पक्षी पुसती तयांसी । तुम्हीं हृषिकेशी देखियेला । ४ ।
मृगासी पुसती देखियेला डोळां । सांगा रे सांवळा कोणी तरी । ५ ।
आम्हांवरी तुम्हीं काय रे कोपतां । सांगा रे भगवंता पुसतसों । ६ ।
कुरवंडी करू सकळांचे प्राण । देऊं त्या भूषण अंगावरील । ७ ।
नामा म्हणे जेथें असे अभिमान । तेथें नारायण नाहीं नाहीं । ८ ।

१०७. एकावें चरित्र परीक्षितिराया । बरोबरी जाया एक असे । १ ।
तोडोनियां पुष्पें करी अलंकार । घालीत श्रीधर तिजवरी । २ ।
नये क्षणभरी योगियांचे ध्यानीं । घालितसे वेणी आवडीनें । ३ ।
वंदियेली शिवें चरणींची गंगा । करीतसे भांगा नीट तिच्या । ४ ।
गोपिकांच्या वेषें प्रगटल्या श्रुती । गुह्य हें तुजप्रती सांगितलें । ५ ।
घेवोनियां तिसी गेला कुंजवना । व्रजांकुश चिन्हा उमटती । ६ ।
गोपिकांचा मेळा येतसे तांतडी । युगा ऐसी घडी झाली तयां । ७ ।
नलगेची शोध शीणती सकळा । न जाती गोकुळा नामा म्हणे । ८ ।

१०८. चंद्राच्या प्रभेनें चमकती पाउलें । दुरोनि देखिलें गोपिकांनीं । १ ।
कृपणाचें धन होतें तें चळलें । तयांसि लाधलें अवचिता । २ ।
एकीमागें एक धांवताती नारी । आहे येथें हरी ऐसें वाटे । ३ ।
घेवोनियां रज लावितांनीं भाळा । पाहती सकळा न्याहाळूनि । ४ ।
बरोबरी नारी कोणी तरी असे । पाउलाचे ठसे उमटले । ५ ।
पापिणिगे आम्ही तुम्ही सकळिका । पुण्याची अधिका म्हणुन भोगी । ६ ।
बरोबरी तिसी होय अभिमान । झालासे स्वाधीन माझ्या देव । ७ ।
कडे घेसी तरी येतें बरोबरी । चालवेना हरी मज आतां । ८ ।
जाणोनि अंतर ठकविलें भगवंतें । नामा म्हणे तेथें रडतसे । ९ ।

१०९. मागोनियां गांवीं आल्या निजपासीं । कोठें हृषिकेशी सांग आम्हां । १ ।
टाकोनियां गेला मज पूतनारी । येथेंचि मुरारी गुप्त झाला । २ ।
वैकुंठनायका अगा नारायणा । दावीं रे वदना एक वेळा । ३ ।
कृष्णाचें चरित्र सकळ करिती । मन रंजविती नामा म्हणे । ४ ।

११०. सरोवरीं कमळें तैसे तुझे नेत्र । त्याहुनि विचित्र दिसताती । १ ।
कृपाळुवा एकें अगा हृषिकेशी । आम्ही तुझ्या दासी मोलाविण । २ ।
कामरूपदैत्य मारिले आम्हांसी । भक्तांसी रक्षिसी कीर्ति जगीं । ३ ।
दीनासी रक्षिसी दुष्टांसी मारिसी । धर्माला स्थापिसी निरंतर । ४ ।
घेवोनियां शस्त्र मारावें सकळां । आलासे कंटाळा नामा म्हणे । ५ ।

१११. सुकुमार सांवळें जैसीं रातोत्पळें । दावीं तीं पाऊलें कृष्णराया । १ ।
ध्वजवज्रांकुश पद्म तें शोभलें । दावीं तीं पाऊलें कृष्णराया । २ ।
दमोनियां दुष्टां बाहेर काढिलें । दावीं तीं पाऊलें कृष्णराया । ३ ।
रांगतां अंगणीं त्रिमलार्जुन मोडिले । दावीं तीं पाऊलें कृष्णराया । ४ ।
अघासुरा हृदयीं उभे जी राहिले । दावीं तीं पाऊलें कृष्णराया । ५ ।
नामा म्हणे ज्यांतें वरुणानें पूजिलें । दावीं तीं पाऊलें कृष्णराया । ६ ।

९१२. सकळांचें तुझ्या हातीं असे सूत्र । यशोदेचा पुत्र नवसिया । १ ।
नंदाचिया ऋणा फेडाया आलासी । कळलें आम्हांसी तुझ्याकृपें । २ ।
तेहतीस कोटी देव ब्रह्मा सदाशीव । प्रार्थिताती सर्व तुजलागीं । ३ ।
यादवकुळटिळका वैकुंठनायका । विधीच्या जनका भेट आतां । ४ ।
नामा म्हणे मुख दावीं कृष्णनाथा । हरेल ही व्यथा वियोगाची । ५ ।

९१३. शरणागता तारी भवसिंधु त्वरीत । ठेवीं बा तो हात शिरावरी । १ ।
अरण्यांत दुष्ट दैत्यांसी मारीत । ठेवीं बा तो हात शिरावरी । २ ।
वेणू पांवा जया हातांत शोभत । ठेवीं बा तो हात शिरावरी । ३ ।
घेवोनि शिदोऱ्या गड्यांसी वांटीत । ठेवीं बा तो हात शिरावरी । ४ ।
रक्षावया व्रजां उचलिला पर्वत । ठेवीं बा तो हात शिरावरी । ५ ।
सुवर्णाचीं कडीं भूषणें अमूप । ठेविता निष्पाप नामा म्हणे । ६ ।

९१४. अभिमानें घाला घातला आम्हांसी । म्हणुनि लपलासी देवराया । १ ।
तुजवांचोनियां जाऊं पाहे प्राण । दाखवी वदन एक वेळा । २ ।
मुकुट कुंडलें श्रीमुख सांवळें । केशरी लाविलें गंध भाळीं । ३ ।
पाहोनियां जीवीं होय फार सुख । हरेल ही भूक डोळियांची । ४ ।
तुजवांचोनिया आम्हां नाहीं कोणी । तिहीं त्रिभुवनीं नामा म्हणे । ५ ।

९१५. आम्हावरी कां रे धरियेला राग । काय तुझें सांग आम्हीं केलें । १ ।
रडतसों आम्हीं मारितसों हांका । विश्वाच्या जनका नायिकसी । २ ।
कामाग्नीनें आम्हीं जळतों सकळ । करावें शीतळ अधरामृतें । ३ ।
नामा म्हणे देई एक वेळ भेटी । तुजसाठीं कष्टी फार होतो । ४ ।

९१६. चरणासीं शरण तुझिया जे येती । तेचि उतरती भवसिंधु । १ ।
लक्षुमीनें ज्यातें असे आराधिलें । ठेवीं तीं पाउलें स्तनावरी । २ ।
आवडीनें शिवें मस्तकीं वंदिलें । ठेवीं ती पाउलें स्तनावरी । ३ ।
नामा म्हणे ऐशा करिताती स्तुती । शिंपीयेली क्षिती अश्रुपातें । ४ ।

११७. वाजविली वेणु सर्वांसी जाळें। आम्हांसी न कळे कपटिया तूं। १।
दुखवोनि सर्वां टाकियेलें वनीं। गेलासी वधुनी पारधिया। २।
धरुनियां धीर न राहावे कृष्णा। देऊं मग प्राणा सकळिकां। ३।
सकळांच्या हत्या येती तुजवरी। नामा म्हणे हरि भेट आतां। ४।

११८. त्रिविधतापें प्राणी होताती संतप्त। शीतळ करीत कथामृतें। १।
अमृतापरीस तुझी कथा अधिक। सांगतसो ऐक देवराया। २।
स्वर्गी जें अमृत प्राशन करिती। पुण्य सरल्या येती मृत्यु लोकां। ३।
तुझी कथा देत अच्युत पदासी। न विचारीं मानसीं याति कांहीं। ४।
नाहीं चतुराई बोबडे हे बोल। संतोषे विठ्ठल नामा म्हणे। ५।

११९. गायी घेवोनियां जासी जेव्हां राना। आमुचिया मना दुःख वाटे। १।
सुकुमार सांवळीं जैसीं रातोत्पळें। त्याहुनि कोंवळे पाय तुझे। २।
खडे कांटे बहु कठिण तृण मुळें। ठेवीसी पाउलें तयावरी। ३।
पावतोसी क्लेश अगा वासुदेवा। म्हणोनियां जीवा दुःख वाटे। ४।
सांगतसों आम्ही नित्य यशोदेसी। धाडूं नको यासी वनामध्यें। ५।
नामा म्हणे होय सकळांचा उद्धार। म्हणोनि श्रीधर वना जाय। ६।

१२०. तुजाविण सर्वांचोनियां वैकुंठनायका। आम्हांसी घटिका युग होय। १।
अस्तमान होतां येसी तूं गोकुळीं। मुखावरी धुळी गोरजांची। २।
कुरळ हे केश सुंदर नासिक। पाहोनियां सुख फार होय। ३।
लवती पांपण्या न सोसवे आम्हां। अहिर्निशीं नामा हेंचि गाय। ४।

१२१. टाकियेलें आम्हीं पतिबंधुसुतां। आलोंत अच्युता तुजपाशीं। १।
आमुची ही। इच्छा करिशील पूर्ण। आहेसी कठीण ठावें नाहीं। २।
घालोनियां कृपा कापियेला दोरा। साधियेलें वैरा आपुलिया। ३।
वरोनियां व्टाकी मोटाला पर्वत। म्हणती समस्त नामा म्हणे। ४।

१२२. तुझे भेटीविण । जाती सकळांचे प्राण । १ ।
दया तुझिया मना । कां रे नये नारायणा । २ ।
बोलवेना आतां । कंठ शोषला अनंता। ३ ।
ऐसें पाहोनियां । नामा म्हणे आली दया। ४ ।

१२३. देतसे दर्शन । सकळांसी नारायण । १ ।
झाला सकळा आनंद । हृदयीं धरिला गोविंद। २ ।
टाकोनियां आम्हां । कां गेलासी पुरूषोत्तमा। ३ ।
तुम्हां झाला अभिमान। नामा म्हणे सांगे खूण। ४ ।

१२४. सकळांची इच्छा करीतसे पूर्ण । भुलला श्रीकृष्ण त्यांच्या भावा। १ ।
विमानीं बैसोनि सुरवर पाहाती । गंधर्व गाताती सप्तस्वरें। २ ।
विणे वाजताती मृदंगाचे घोष । वाचे तो उल्हास वर्णवेना। ३ ।
न जाय चंद्रमा न जाती नक्षत्रें । पाहाती सर्वत्र रासक्रीडा। ४ ।
जळक्रीडा करी लक्षुमीचा पती। लाळ घोंटीताती देवस्त्रिया। ५ ।
धन्य त्या गोपिका धन्य त्यांचें पुण्य। भोगिताती कृष्ण पूर्णब्रह्म। ६ ।
नामा म्हणे होय कामाची ते पूर्ती। नव्हे वीर्यच्युती गोविंदाची। ७ ।

१२५. होता प्रात:काळ सांगतसे तया। जावें येथोनियां शीघ्र आतां। १ ।
क्षणोक्षणा पाहाती देवाजीचें मुख। येती सकळीक गोकुळासी। २ ।
परिक्षिती ऐक ऐका कौतुकासी । होत्या त्यांजपाशीं त्यांच्या स्त्रिया। ३ ।
म्हणोनियां कोणी नाहीं विचारिलें । अंतरीं न कळे दुजियाला। ४ ।
यथामती रास वर्णिला देवाचा। संपूर्ण हे वाचा काय करी। ५ ।
चरित्र श्रवण करील जो कोणी। धन्य तोचि प्राणी नामा म्हणे। ६ ।

१२६. सरस्वती तीरीं अंबिकेचें स्थान। गोकुळींचे जन जाती तेथें। १ ।
करोनि पूजन करिती प्रार्थना । नंदाच्या नंदना सुखी राखी । २ ।
सरितां भोजन लपाला आदित्य । नामा म्हणे तेथें राहाताती। ३ ।

१२७. निद्रिस्थ सकळ तये वनीं व्याळ। गिळितसे बळें नंदालागीं । १ ।
कृष्णा धांव वेगीं मज गिळी सर्प। काळावरी दर्प तुझा देवा। २ ।
माझिया पाडसा येईं रे धांवोन। दाखवीं वदन अंतकाळीं । ३ ।
आली काय तुज निद्रा रे कान्हया। माझिया तान्हया ऊठ वेगीं। ४ ।
ऐकोनियां ऐसें बोलती सकळ । घालिती मुसळ सर्पावरी। ५ ।
श्रमले सकळ सोडिना नंदाला । पिटी वृक्षस्थळा नंदपत्नी। ६ ।
उठे जगद्गुरू काय झालें माय। लावितसे पाय तयालागीं। ७ ।
टाकियेलें तेव्हां सर्पे कलेवर । पुरूष सुंदर दिसतसे । ८ ।
नामा म्हणे वाचे स्तवी विश्वंभरा। करूनि नमस्कारा जाता झाला। ९ ।

१२८. खांद्यावरी पांवा कस्तुरीचा टिळा। चालत गोपाळ गाईमागें। १ ।
यमुने पावळीं गोपां पाचारीत । सिदोऱ्या शोभत पाठीवरी। २ ।
भजती पंक्ति करी तया गोपाळांच्या। संगें गोविंद त्यांच्या अखंडित। ३ ।
नामा म्हणे बोनें विटो देऊं नका। वैकुंठनायका सांभाळावें। ४ ।

१२९. श्रीमुख सुंदर वाटोळें। कैसें नीलोत्पल सांवळें। १ ।
पैल पेंदा गडी धाकुटा। होय घोंगडें खांदा मोठा। २ ।
थिरू बांसरें हाकारी। पुढें वाहती पावे मोहरी । ३ ।
हातीं घेऊनि वेताटी। कैसा लागे वासरा पाठीं। ४ ।
बाळगोपाळांसहित मुरारी। खेळ खेळे नानापरी। ५ ।
विष्णुदास नामयाचा दातारू। ब्रह्मादिकां त्याचा नकळे पारु। ६ ।

१३०. गांवळे म्हणती कांहो आम्हां भितो। ब्रह्माहि वंदितो पायधुळी। १ ।
गाई तृप्त करी कळंबाच्या तळीं। सोडिल्या शिदोरी दावितसे। २ ।
हमामा घालितां नव्हती माघारें। नाहीं भीत पोरें येत संगें। ३ ।
नामा म्हणे काय भिऊनि राहिले। निवांतचि ठेले ब्रह्मादिक। ४ ।

१३१. समस्त मिळोनि गोपाळीं। तया यमुनेच्या पावळीं।
कृष्णें मांडिली धुमाळी। कळंबा तळीं आनंद। १ ।

वळुनि कांबळ्या वेटी। त्याही बांधिल्या मणगटीं।
विवाद मांडिला निकटी। धुर्जटी कान्होसी। २।
आतां कृष्णा कवणे ठायीं। जामी तुजवरी आली डाई।
आमची हमामा हुंबरी देई। उभा राहें पैं कांगा। ३।
कृष्ण म्हणे मी एकवटू। तुम्ही आम्ही गडी वाटूं।
गोवळी घातलासे हाटू। अति निकट्ट कान्हुसी। ४।
म्हणे बळीराम पहागा। बोल नव्हे तुम्हाजोगा।
तुम्ही समर्थ श्रीरंगा। आम्हां कांगा भेटविसी। ५।
ऐसा सकळीं मान केला। तेव्हां कृष्ण संतोषला।
आनंद चित्तासी पावला। म्हणे भला भला नामया। ६।

१३२. मोर पिसा कुंचे ढळताती अपार। येताती कुमर यशोदेचे। १।
शिंगें पावे मोहऱ्या वाजती कुसरी। हुंबर आखरी गगन गर्जे। २।
मोतियांचे घोंस चांदवे झळकती। कनक दंड ढाळिती रामकृष्णा। ३।
गौरजे डौरला पीतांबर भिजला। स्वेद जो दाटला मुखकमळीं। ४।
रूळती वनमाळा कंठीं गुंजाहार। तरू घोंस अपार खोंविलें शिरीं। ५।
गजगती पाउलें ठेविती भूमीवरी। धन्य ते संसारी डोल देती। ६।
कुंकुम केशर रंगलें रातोत्पळ। ध्वज वज्रांकुश कमळ उर्ध्व रेखा। ७।
विमानें आकाशीं झालीं पैं सकळ। धन्य तें गोकुळ म्हणती देव। ८।
देव पुष्पवृष्टी करिती कृष्णावरी। अंबर जयजयकारी गर्जतसे। ९।
माडिया गोपुरीं पाहती सुंदरी। यशोदेच्या करीं निंबलोण। १०।
ओंवाळिला नाम्या शिंप्याचा दातार। रखुमादेवीवर श्रीविठ्ठल। ११।

१३३. गड्यानों राजा की रे झाला। कृष्ण सिंहासनीं बैसला। धृ०।
पांवा मोहरी घोंगडी। आम्हीं खेळु यमुने थडी।
नाचा पाउला देहुडी। कृष्ण आमुचा की रे गडी। १।

खेळुं हुतुतु हुंबरी । थडक हाणो टीरीवरी ।
आतां चालिला दळभारी। आमुचे यशोदेचा हरी। २ ।
कुस्ती खेळतां कासाविस्री । शेंबुड खरकटें नाकासी।
कडे घेऊं सावकासी । आतां बहु भितो यासी। ३ ।
आम्ही तुम्ही सवें जाऊं । गाई वळावया जाऊं ।
त्याचे मानेंन बुक्या देऊं । जवळीं जावयासी भिऊं । ४ ।
नामा म्हणे चला जाऊं । हात जोडोनि उभे राहूं ।
पाया पडून मागून घेऊं । जनींवनीं तोचि कृष्णाजी ध्याऊं। ५ ।

१३४. कान्होबा निवडीं आपुलीं गोधनें । ध्रु० ।
सात पांच पोळ्या तीन भाकरी। दीड कानोली एक पुरी ।
आम्हा धाडिलें वैल्या दुरी । आमुची ढकवून खाल्ली शिदोरी । कान्हो० । १ ।
परियेसी शारंगधरा। तुझा बैल चुकला मोरा ।
सांगूं गेलों तुझ्या घरा । पाठीं लागला तुझा म्हातारा। कान्हो० । २ ।
परियेसीं हृषीकेशी । गाई म्हशींचें दूध पिशी ।
वासरें प्यालीं म्हणून सांगशी । उद्यां ताक नाहीं आम्हासी। कान्हो० । ३ ।
कान्होबा ओंढाळ तुझ्या गाई। होत्या नव्हत्या कळंवा ठायीं।
शिव्या देती तुझी आई । कान्हो० । ४ ।
विष्णुदास नामा साहे । देवा तूंचि बाप माये ।
अखंड माझे हृदयीं राहें । कान्हो० । ५ ।

१३५. अरे अरे कान्हया वेल्हाळा। तूं रे वरतिया गोपाळा ।
तुज देखियेलें डोळां । रे धेनुवा हुंबरती। १ ।
माते दे वा शिदोरी । ऐसें म्हणतसे मुरारी ।
मी जाईन वो दुरी । धेनु चारावयालागीं । २ ।
अलें वेलें चिलें मेकें । सुरण शिंगोडी पैं तिखें ।
दहावांचोनी नव्हे निकें। शिदोरी ताकें कालऊंनि । ३ ।

वडजा वाकुडा पेंद्या सुदामा । हेचि पांतिकर आम्हां ।
तेथें विष्णुदास नामा । उच्छिष्ट शितें वेंचितसे । ४ ।

१३६. मुक्ताफळ नथ नाकीं । चरणीं ल्याली वाळे वांकी ।
पितांबरें अंग झांकी । कृष्णाई माझी । १ ।
खांद्यावरी कांबळी । पायघोळ लांबली ।
पांघरली धावली । कृष्णाई माझी । २ ।
गाई पाठी लागली । पळतां नाहीं भागली ।
मायबहिण चांगली । कृष्णाई माझी । ३ ।
देहुडा पाउली । उभी माझी माउली ।
विश्रांतीची साउली । कृष्णाई माझी । ४ ।
कर ठेवुनी कटावरी । उभी भीवरेचे तिरीं ।
नामयाची कैवारी । कृष्णाई माझी । ५ ।

१३७. तळीयाचे पाळीं वृक्षावरी बैसुनी । कैसा चातक बोभाईतो रे ।
तहाना फुटे परी उदक नेघे । मेघाची वाट पाहे रे । १ ।
तैसा येई बा कान्हया येई बा कान्हया । जीवींच्या जीवना केशीराजा रे । ध्रु० ।
टाळघोळ कल्लोळ नानापरीचीं वाद्यें वाजती बोजा रे ।
रानींच्या नृत्या पैं नये तुजवीन मेघराजा रे । २ ।
जळेविण जळचरा पक्षीवीण पिलीयासी तैसें झालें नामयासी रे ।
शंख चक्र गदा पद्म पीतांबर धारी अझुनि कां न पवसी रे । ३ ।

१३८. गेलिया वृंदावना तेथें देखिला कान्हा । मंदगडिया माजी उभा ध्यान लागलें मना । १ ।
हरिनाम गोड झालें काय सांगों गे माय । गोपाळ आहती पावे मन कोठें न राहे । २ ।
त्याचें श्रीमुख साजिरें वो कुंडलें चित्त चोरें । सांडुनि अमृतधनी लुब्धलीं चकोरें । ३ ।
सांडुनी ध्रुवमंडळ आली नक्षत्रमाळा । कौस्तुभा तळवटीं वैजयंती शोभे गळां । ४ ।
सांडुनि मेघराजु कटिसूत्रीं तळपे विजु । भुलला चतुराननु तया नकळे उमजु । ५ ।

मांडुनि लक्ष्मी निज गोपाळांसी बोले गुज । अचोज हा योजवेना ब्रह्मादिकां सहज । ६ ।
वांजट धीट मोठी ऐसी कवण असे खिळ् । [illegible] । ७ ।
त्याचें पायींचीं नेपुरें वाजती वो गंभीरें । कुंथल्या पक्षयानी धेनु पाचारी स्वरें । ८ ।
आणिक एक नवल कैसें स्वर्गी देव झाले विसे । ब्रह्मादिक [illegible] देखा जसीं झाले भाले । ९ ।
आणिक एक नवल पर्ण करीं घेऊनि शिदोरी । सवंगड्या वांटितसे नामया स्वामी मुरारी । १० ।

१३९. येत येत उभा राजबिदीं । सवें चाले गोपाळांची मांदी ।
नारी पाहती उभया बिदीं । एकीच्या धरूनि बाहुवा खांदीं । १ ।
हरिहर वंदना सादृश्य लोचना । डोळ्यां वेगळा न वो जासी कान्हा ।
अरे कान्हा मनमोहना । गोपी भुलल्या तुझिया गुणा । ध्रु० ।
चतुर्वेद भाट सांगातें । साही वर्णिती रामकृष्णातें ।
श्रुति स्मृति विद्यावंतें । जय जय म्हणती कृपानिधितें । २ ।
येत येत उभा रहात । सुदाम्याच्या खांद्यावरी हात ।
समदृष्टी गोपिका न्याहाळीत । चैतन्य चोरोनि आनंदें डुल्लत । ३ ।
ऐसा कृष्ण सौभाग्यसुंदर । लावण्य गुण रत्नाकर ।
विष्णुदास नामयाचा दातार । भक्तिभावें बोलंगा सारंगधर । ४ ।

१४०. रात्र काळी घागर काळी । यमुनेजळें ही काळीं वो माय । १ ।
बुंथ काळी बिल्वर काळी । गळां मोती एकावळी काळी वो माय । २ ।
मी काळी कांचोळी काळी । कांस कांसिली ते काळी वो माय । ३ ।
एकली पाणिया नवजाय साजणी । सवें पाठवा मूर्ति सांवळी वो माय । ४ ।
विष्णुदास नाम्याची स्वामिणी काळी । कृष्णमूर्ति बहु काळी वो माय । ५ ।

१४१. [illegible]। गौळणी ठकविल्या । एक एक संगतीनें। मराठी कानडीया ।
एक मुसलमानी। कोंकणी गुजरणी। अशा पांचीजणी गौळणी ठकविल्या। ध्रु० ।
गौळणी सुंदरी । गौळणी सुंदरी । गेल्या यमुनेतीरीं । [illegible]
गोविंदानें वस्त्रें नेलीं कळंबावरी । स्नान करोनियां त्या आल्या बाहेरी । १ ।

लडोबा गोविंदा। लडोबा गोविंदा। निवारणी आज ।आडचाल्लो पडचाल्लो।
शीर फोड्या न कोडो। मारी कन्हय्या पानी खेळ्या न खेळो। २।
देख रे कन्हय्या। देख रे कन्हय्या। मैं इज्यतकी बडी। कदम पकडुंगी।
मैयां कूटोजुडी। मेरी चुनरी दे मेरी ले दुल्लडी। ३।
देवकी नंदना देवकी नंदना। तूं एक श्रीपती। उघडी हिंवाची तुज विनवुं किती।
पायां पडल्यें बा। मी येल्यें लाकुळती। माझी साडी दे। घे नाकाचें मोती। ४।
पावगा दाताला। पावगा दाताला। तूं नंदाचा झिलो। माकां फडको दी।
मी हिंवान मेलों। घे माझो कोयतो। देवा पायां पडलों। ५।
ज्योरे माधवजी। ज्योरे माधवजी। मै शरण थई। तनका कांकेपी।
बाप दयाळ तूंही। मारी साडी आपो। हातणी ले कंकणी। ६।
इतुकें ऐकुनी। इतुकें ऐकुनी। देव बोले हांसोनि।
सूर्या दंडवत करा कर जोडुनी।
नामा विनवितो। म्हणे सारंगपाणी। गौळिया एक तूं। धन्य तुझी करणी। ७।

९४२. कान्हां तूं आजि कां झालासि बेभान। ध्रु०।
तूं तो आमुची गडी। म्हणोनि मी केली खोडी। घालूं हुंबर यमुनेची मोडूं मान। १।
होसी तूं आमुचा बळी। म्हणोनि म्यां केली कळी। तेथें कशाचा काय गुमान। २।
जरी तूं होसी सखा। होऊं दे जाला वाखा। चल रूपवती घरीं घेऊं मान। ३।
समजूनियां देव। येक नामा नामदेव। झाले ते हरपले या द्वैत भान। ४।

९४३. भला तूं हरी कळलासी रडीवाला। ध्रु०।
विधीचें अक्षर खरें हें असतां। अजासुताचे कां झाले हाल। १।
पाराशरसुत वरचढ झाला। म्हणून कां त्वां फुगविले गाल। २।
बळीनें तुज पाहे खरीद केलें। खर्चून तो धनमाल। ३।
नामा मनीं निर्भय गुरु कृपे। तुजलागीं देतो हे प्रतिख्याल। ४।

९४४. तुम्ही धोलल्या पानलाचे लेक। तुम्हा मंदील ले गलीब आहे एक।
कलंबा तली ले खेलाय सकलीक। आम्हा म्हंतो ले जाय गायी लाख।

किती धाऊले काना मोल्ला पाडं।१। कान्होबा संभाल आपुल्या गायी। ध्रु०।
आम्ही आपुलाल्या घलाला जाती भाई। इथं ल्हायाचा लाग आमुचा नाही।
तुझी संगत ले संगत कल्ली भाई।२। कान्होबा संभाल आपुल्या गायी। ध्रु०।
काली पिवली ले गाय आहे सोनेली। या गवल्याची धवली गाय पल्ाली।
आम्हां देखतले कलतील मालामाली। हिलोनी नेताल्ले काठी आणि कांबली। ३।
काल बलाच ले बलाच खल्लूच खाल्ला। गुल बील घाल्रून ले बलाच गोल केला।
आम्ही निबलक ले म्हणांनि धोला दिला। तुला वातलं ले याला काय कललच नाही। ४।
यमुनातीली ले नित्य कलीता अंघोली। आम्हा म्हणती ले जाय आण शिनोली।
कशी आणू ले वलण आणि भाकली। माझा लवला ले काम कलीतो भाई। ५।
किष्णा भला ले भला होसी खेलिया। माझ्याच निवृनि ले साल्या नेल्या फसल्या।
आम्हा म्हंतो ले मिलून खेल गड्या। घलला जातो ले गायी निवडुनी देई। ६।
कृष्ण म्हणे रे उभा राहे बोबड्या। तुझ्या गायी रे मीच राखिन गड्या।
नाही धाडित रे गोपाळांच्या जोड्या। विष्णुदास नामा म्हणे रे गोष्टी गेकड्या पाही। ७।

९४५. ध्यान सांवळें गोकुळींचें। धांव पाव वेगीं हरी सांवळिया। ध्रु०।
सांवळीसी आंगी उटी। सांवळी कस्तुरी लल्लाटी।
सांवळीसी कांसे कसियला कटीं। गोवळिया। १।
सांवळीसी तनु बरवी। सांवळें वृंदावन मिरवी।
सांवळ्याशा तुळसी कानीं। मंजुरिया कोंवळिया। २।
सांवळीसी कंठीं माळा। सांवळें हृदयीं पदक विशाळा।
सांवळ्याशा गोपी केल्या। ओंवळ्या गोंवळिया। ३।
सांवळिसी हातीं काठी। सांवळासा कांबळा पाठीं।
नामयाचा स्वामी गायी राखी। धवळ्या आणि पिंवळ्या। ४।

९४६. देहुडा चरणु वाह्यातसे वेणु। गोपिकारमणु स्वामी माझा। १।
देखिला गे माय यमुनेचे तीरीं। हात खांद्यावरी राधिकेच्या। २।
गुंजावर्ण डोळे माथा बाबर झोटी। मयूर पिच्छ वेष्टी शोभतसे। ३।
सगुण मेघःश्याम लावण्य सुंदर। नामया दातार केशवराज। ४।

९४७. कोंकिळेचिकळा ऱ्याचां ते कीळा । माणकीं सोज्वळा वर्णु हरीचा। १ ।
वृंदावनीं वेणु वाजे रूणुझुणु । वेध तनुमनु गोपाळांचा। २ ।
देहुडा पाउलीं हरि गोपाळा गोजिरीं । वाहाती ते लालोरी हरी छंदें। ३ ।
वेधलीं वनचरें गोधनें अपारें । पक्षीकुळें साचारें तल्लिन झालीं । ४ ।
यमुनेचें उदक जळचरें सम्यक। पाताळीं पन्नग ऐको ठेली। ५ ।
ऐसे कृष्ण वेधें तल्लिन झाले बोधें । नामा म्हणे वेणुछंदें स्थीर झाली । ६ ।

९४८. अधरींचें अमृत सेविसी एकला रे । काय पुण्य केलें नेणों पावया तूं। १ ।
तुळशीच्या माळा शोभति गोपाळा । तयाहूनि आगळा पावया तूं। २ ।
सोळासहस्त्र गोपी बोलतील प्रौढी। अधरींची गोडी नेली पावया तुवां। ३ ।
विष्णुदास नामा केशवीं सौरस। उद्धरिला वंश पावया तुवां । ४ ।

९४९. चिदानंद दोंदिल बाळ डोळस । कृष्ण खेळवीता निवे मानस। १ ।
सये आन कांहीं या जीवा नावडे। चित्त गुंतलें तया सुखा न निवडे। २ ।
देहा गेहा आठव नाहीं सर्वथा । स्थिति बाणली सहज रूप पाहतां। ३ ।
तेज सांवळें दृष्टींत कोंदलें । तेणें प्रकाशें सबाह्य मन माझें वेधलें। ४ ।
वृत्तिसहित इंद्रियें परतलीं । कृष्णरूपीं मिळोनियां गेलीं । ५ ।
नामया स्वामी आदि परंपरा। आवडता आहे तो माझा सोयरा । ६ ।

९५०. चिदानंद दोंदिल बाळ सांवळें। कृष्ण पाहतां नयनीं मन मावळे । १ ।
तें सुख कवणें वाचें बोलिजे । चित्त चैतन्य समरसें भोगिजे । २ ।
परा परतली पश्यंति तन्मया । मध्यमा वैखरी पावली हा लया । ३ ।
आलिंगना लागुनि बाहा स्फुरती । देह न दिसे पाहतां कृष्णमूर्ति । ४ ।
तेथें आर्तीचा आनंद गोठला। तो हा कृष्णरूपें अंकुर उठिला। ५ ।
नामया स्वामी सबाह्याभ्यंतरीं। गेले रसरंग गोकुळाभीतरीं। ६ ।

९५१. चिदानंद चिद्रूप चित्त चिन्मय। बाळ यशोदेचें आनंद अद्वय। १ ।
सत्य अभिनव सुख याच्या दर्शनीं। मिठी पडली पाहतां रूप नयनीं। २ ।

दृष्टी या डोळियां आड रिघोनि। तनु मनासी केली भुलवणी। ३।
आंत बाहेरी निज सुख वावरे। नित्य नूतन जीवलगा विसरे। ४।
आपरूपीं रूप सकळां केलें। गोपी गोपाळां धेनु वत्सां भुलविलें। ५।
नामया स्वामी आनंद उदधि। माजी बुडोनियां गेली देहबुद्धि। ६।

९५२. चिदानंदघन चिन्मय बाळकृष्ण। खेळवितां मन होय उन्मन। १।
सुख अनुभवी अनुवाद खुंटला। विश्वंभरीं तोंचि अनुवाद गोठला। २।
दुजें न दिसे उपमेसी द्यावया। मन न मिळे आन सुख घ्यावया। ३।
ज्ञाता ज्ञान हेंचि अद्वय। ध्याता ध्यान ध्येय हेंचि निरामय। ४।
जन्मोजन्मींचें पुण्य संचित। झालें गौळियांचें काय मूर्तिमंत। ५।
नामया स्वामीची अनुपम्य आवडी। चित्तें दिधली प्रेमरसीं बुडी। ६।

९५३. मस्तकीं ठेवुनियां डेरा। करूं निघाली विकरा।
साच करितसे पुकारा। म्हणे गोविंद घ्या वो। १।
बोल बोलती आबळा। तंव त्या हांसती सकळा।
मुखीं पडियेला चाळा। या गोपाळाचा। २।
दहीं म्हणावासे ठेले। वाचे गोविंद पैं आलें।
चित्त चैतन्य रंगलें। कान्हु चरणीं बाई वो। ३।
उन्नतीये बोलती नेती। चालता गजगती।
कान्हु वांचुनी चित्तीं। आणीक नेणें बाई वो। ४।
जाऊनियां बळीच्या द्वारां। त्रिपांड केली वसुंधरा।
कैसा सामावला तुमच्या डेरा। दाखवी बाई वो। ५।
वृद्धा गौळणी पाचारिती। आणी वो अरूता श्रीपती।
कोठें गोविंदु विकिती। नाहीं देखियला बाई वो। ६।
श्रीरंगी रंगला जीवु। म्हणे घ्यावो हा माधवु।
बरवा रमापती गौरवु। साच आणियला कैसा। ७।

बाळा भरूनियां डोळा। देखें श्रीरंगु सावळा।
वेधीं वेधल्या सकळां। गोपी स्मरण करा साचे। ८।
गोविंद गोविंद म्हणा वाचे। गोविंद स्मरण करा साचे।
दोष हरती जन्माचे। छंद लागला तयाचा। ९।
नामया स्वामी हो मुरारी। मज पाहतां अभ्यंतरीं।
शेखीं व्यापिलें निर्धारीं। मनुष्यपण।१०।

९५४. कृष्णाचें कीर्तन नावडे ज्या नरा। जन्मोनि अघोरा पडे नरकीं। १।
कृष्णश्रवण नाइके जो कानीं। तयासि मेदिनीं ठाव कैंचा। २।
कृष्णविष्णुकथा नावडे पैं नित्य। तयासी पैं सत्य गृहबाधी। ३।
रामकृष्ण हरी न पाहे पैं जो मूर्ति। तया यम नेती अंतीं जाणा। ४।
नामा म्हणे हे नर कलियुगीं उदंड। घरोघरीं पाखांड करिताती। ५।

९५५. धांवधांव कृष्णा नारायणा हरी। केशवा मुरारी पांडुरंगा। १।
धांव कृष्णा पाहे दीनबंधु। लौकरी गोविंदु धाव आतां। २।
धांव कृष्णा प्रेम देईं अखंडित। नेणे तप तीर्थ व्रतदान। ३।
धांव धांव माझा पाहू नको अंत। नामा म्हणे मात येके बापा। ४।

९५६. धेनुसुराने कोवळी। चरोनी बैसल्या पावळा।
घडीया घालून कांबळी। वरी वनमाळी बैसला। १।
तेही केला संप्रधारू। म्हणती क्षीरभोजन करू।
पैल होडीकरेसी पाचारु। सरळ स्वरूप घातला। २।
आता होडीकर येईं वो। आम्हां तू दूध देईं वो।
कृपाळू लवलाही वो। प्रेमपान्हा आई मज देईं। ३।
गौतमी भागीरथी। गंगा यमुना सरस्वती।
रेवा सींधु भीमरथी। कृष्णा भद्रा वेदवती वैतरणी। ४।
ऐसे नामे आळविती। गोपाळ धेनु पाचारिती।
पेंधा सांगे तयाप्रती। सखेनो प्रीती परियेसा। ५।

९५७. धोंगडीचिमणी गोपाळाच्या मेळी। काला वनमाळी खेळतसे। १ ।
गाईसमागमे हाती पावा काठी। माथाबीन मोठी शोभा ते। २ ।
एकाएकी बोले ऐक नारायण। पहिले खेवणा आमुचे। ३ ।
उभा राहे आता उशीर झाले। नामा म्हणे केले समाधान। ४ ।

९५८. कृष्ण म्हणे आवध्या गोपाळा। चला जाऊ यमुनेपातळा।
पेंद्रा म्हणे बा घननीळा। त्या चोरिला आमुचा कांबळा। १ ।
कान्होबा निवडी आपुल्या गाई। आम्ही राखतू नाही रे भाई। ध्रु.।
वाकड्या म्हणे बा शारंगधरा। तुझा बैल चुकला मोरा।
सांगो गेलो तुझा घरा। पाठी लागला तुझा म्हातारा। ३ ।
बैसोनिया खडकावरी। कृष्णे खादली शिदोरी।
विष्णुदासनामा होता जवळी। तेणे प्रसाद मागितला। ४ ।

९५९. गोपाळ गोळणी मिळोनिया जमती। आवलोकिली ती कृष्णमूर्ती।
म्हणती काळी झाली अंगकांती। कवण हेतु विचारा। ध्रु.।
तव प्रथम सखी म्हणे मज गमले। यासी कृष्णपक्षी जन्म झाले।
म्हणोनी शरीर पालटले। काली तनु पै झाली। १ ।
कृष्ण बहु काळा सांपे दिसतसे नीला। बळ त्या देते वेळोवेळा।
तातकवळे शिणला। २ ।
दुसरी सांगे यशोदेसी।
प्रत्यक्षासी प्रमाण काय गे आमुचा डोळा चुकविसी।
मागे गाई दुहोनी पिसी। उद्या ताक नाही आम्हासी। ३ ।
सुदामा म्हणे यदुकुलटिळका। मज मागाव्या धजिले टाका।
मागे मोहोरी पावा वेदिका। त्या चोरीली माझी शिदोरी का। ४ ।
पांच पोळीया तीन भाकरी। दीड कानवला एकची पुरी।
आम्हा वळतीया धाडीसी दुरी। त्या ठकवोनी खादली शिदोरी। ५ ।

नामयाचा स्वामी खेळे । आवघे गोपाळ बोलावीले ।
प्रेम सप्रेमे आलिंगीले । मग आनंदे चालियेले । ६ ।

९६०. आवघे गोपाळ मिळोनी सकळी । गेले यमुने पातळी ।
कृष्णे मांडिली धुमाळी । कळंबातळी खेळतसे । १ ।
हमामा हुंबरी घालू कान्हो गोवळीया । ध्रु. ।
वळू नका बळीच्या वेठी । वोढोनी बांधिल्या मनगटी ।
वाट चालू हटाहटी । तुजसी कान्हो गोवळीया । २ ।
कृष्ण म्हणे मी येकटु । आम्ही तुम्ही गडी वाटु ।
मग पाहु लाग पाटू । मजसी हट मांडियेला । ३ ।
नामा म्हणे हुंबरीच्या मिसे । कृष्णे लावियेले पिसे ।
कायावाचा मानसे । तयासी कैसे विसरावे । ४ ।

९६१. उदयाचे उष:काळी । गोधने सोडिली गोपाळी ।
येऊनी मातेजवळी । हरी शिदोरी मागतसे । १ ।
मायें घातली शिदोरी । पत्रशाखा प्रभावळी ।
त्याची न वर्णवे कुसरी । ब्रह्मादिका वेदासी । २ ।
गोधनं सोडिली तयेवेळी । सर्व गोपाळाचे मेळी ।
म्हणे विष्णुदास नामया । विष्णुमूर्तीचे प्रेम आम्हा ।
सायोज्य निजधामा । या समस्ता गौळीया । ३ ।

९६२. अगे सखीयानो तुम्ही माझा कृष्ण नाही देखिला ।
अगे हा कोठे हरवला मुखडेवा । ध्रु. ।
तविण फुटे कंठ जीवा नाही उरी । आणा गे झडकरी बाळ माझे । १ ।
ई रे कान्होबा वाट पाहे तुझी । माय तू का माझी सांडीयेली । २ ।
गे मी अभागिणी कृष्णल्याची नेघे धणी । अगे या गाई वृंदावणी राखियेल्या । ३ ।
पे जरी जाणते तुरी जावो नेदी ते । क्षण न विसंबीते बाळ माझा । ४ ।

परतोनी नयनी वाट पाहे अवघे वेळे । दृष्टी देखेन डोळे निवती माझे। ५ ।
माझ्या कृष्णाच सवंगडे सकाळी उठोनिया येती ।
चाल म्हणती वेगीं सांगातिया। ६ ।
आता मी कवणा वो धाडुं त्यासांगाते । कृष्णावीण अनाथे दिसताती। ७ ।
माझीया कृष्णाचे सर्व गाई आणि वासुरं । न विसंबे गे क्षणभरी। ८ ।
आता त्याचा कोण करील प्रतिपाळ। सांडुनी गोपाळ गेला यासी । ९ ।
कृष्ण वेणुनादे गाजे। निववी गोकुळ तान्हे माझे।१०।
त्रिभुवनीचा प्रकाश मावळला । पडजला दाहीदिशा अंधकारू।११।
नामयाचा स्वामी मेळवागे तुम्ही। माझा चिंतामणी यादवराव ।

९६३. निरस तरु आले पाल्या रे। वांझा गाई त्या झाल्या कामधेनु रे । १ ।
तुझेनी साजिरे वृज गान्हा रे। आम्हा गौळीया घरी तूं बाळ तान्हा रे । ध्रु. ।
घरोघरी मोतीयांच्या रंगमाळा रे । चहुकडे अवतरली सिंधुबाळा रे। २ ।
भूमी मर्यादा सांडोनी पिकली की रे। जाला सुकाळ आमुचे गोरस विकरे। ३ ।
धन इच्छेची सुवर्णवृष्टी करी रे। जाला सुकाळ गशो धान्याच्या घरोघरी रे। ४ ।
नामयाचा स्वामी केशवराज रे। आकळ कळा न कळे महिमा तुझा रे । ५ ।

९६४. द्वारे अडकोनी गौळणी। कसे गे या सांजवणी ।
मागे कृष्णाची करणी । काय करीता झाला। १ ।
सादोनी चारी मुले । त्यासी हळुहळु बोले ।
लोणी खाल तरी या रे मज सांगाते। २ ।
ऐसे विचारुनी हरी। प्रवेशला तयेचे घरी।
नेणो कवणे कुसरी । संचरला तेथे। ३ ।
बाहेर तैसीच कवाडे । आपण भीतरीलकडे ।
धांडोळीतसे नीवाडे । सत्त्व गोरसाचे । ४ ।
चांग चोर श्रीपती। तो न कळे वेदश्रुती।
तो म्यां लोणी खाता निगुती । देखियेला सये । ५ ।

९६५. धावोनिया येती मात कंसापुढें। येणे बाळे ख्याती थोर केली। १ ।
अहो यमुनेजळींची कमळे आतां भ्यासूर । ती कंसासुरें आणविली। २ ।
कमळे झाडें कोण सांगणे अभय। को मी आणीन कंसालागी। ३ ।
तू अज्ञान बाळे खेळु जाय कान्हा। अणिक कामना तुज काय कळो। ४ ।
आमचे मी जाईन गोधना गे पाठी। कांबळी गे काठी देई मज। ५ ।

९६६. दैत्य दानव वधुनिया हरी। आपण राज्य करी मथुरेचे। १ ।
कृष्ण केशीराजा स्वामी नामयाचा। प्रताप तयाचा वर्णितसे। २ ।
वैराग्य बहुतापरी आदळसी। प्रपंच स्वार्थासी बुडविला। ३ ।
अनुतापी नित्य नाहीं कदाकाळी। संचिताची होळी केली तेणे। ४ ।
पवित्रता वाचा व्यर्थगमाविसी। शेवटी तुजसी यमपंथ। ५ ।
नामा म्हणे जीव कासया ठेवावे। नाही जरी जावे जन्म वाया। ६।

९६७. गोधनाचे पाठी। पैल गोपाळ शेवटी।
रुणुझुणु रुणुझुणु। रुणुझुणु वाहे वेणु।
नामया दातारु। कान्होबा पेंढारू।

९६८. नाचो नेणसी आज काय रे मांडीरे। सांग कवण सवीले रुसलासी। १ ।
तुज देईन लोणी म्हणतात गौळणी। नाच शारंगपाणी क्षणभरी। २ ।
भावाच्या लोभा हालवी बाहुली। आनंदे माऊली स्फुंदतसे। ३ ।

९६९. घागरीया छंदे मागे पुढा काठी। पाऊले प्रौढी हालवीतु। १ ।
नाचे रंगणी शारंगपाणी। देव विमानी आनंदसी। २ ।
तेणे दुमदुमले दिग्पाल शेषाचा मस्तक। नवल हे बालक म्हणे नामा। ३ ।

९७०. धीरू नाच रे बाळा मी मागेन नंदा। घेतलीया धंदा नेणसी सांडु। १ ।
नाचोनिया सुख दाविसी मज । जीवुती तुज राखु तान्हुलीया। २ ।
बहुसाल धीरू नाचसी हृषीकेशी। अवसरु नामयासी देई बापा। ३ ।

१७१. गौळीया घरी विचरतु । बाळकें चाळे उठवीतु ।
नवनीत भांडीं उघडीतु । ळळुळळु कान्हा । १ ।
भक्षी घृत कवळ । ग्या ग्या म्हणती गोपी सकळ ।
हासती गदारोळ । करी गौळी आणि गौळणी । ध्रु. ।
आलगटू आलगटू कान्हा । आलगटू आलगटू कान्हा ।
आलगटु आलगटु कान्हा । नवो कैसा बाईये । २ ।
येईलीया उपरी पुसती गौळणी । हा कवण विचरती आमुच्या सदनी ।
येरु म्हणे मी श्रीहरी । यशोदानंदनु वो । ३ ।
तरी का एवढा वेळ येथे । मंदिर चुकलो म्हणते ।
तरी घागरी का उघडीत । नवनीताच्या । ४ ।
काढीतों मुंगीयाच्या हारी । तव ते हासिन्नले गौळी ।
तरी लेंकुरे का चाळविली । आमुची तूं बारे । ५ ।
उद्या कवण्या रानात हो नेतो । म्हणोनी शब्दे पुसतो ।
नामा म्हणे प्रेम कैसे देतो । निरोपितो संता । ६ ।

१७२. कंसासुर मारे करोनि विचार । धाडती अक्रुर गोकुळासी । १ ।
अक्रुरा आनंद झाला असे फार । पाहीन श्रीधर डोळेभरी । २ ।
आजी होईल माझ्या जन्माचें सार्थक । वैकुंठनायक पाहीन मी । ३ ।
उजवे जाती काग वाम जाती मृग । पाहीन श्रीरंग स्वामी माझा । ४ ।
शुभ हे शकुन मार्गी हे होताती । पाहीन भूपती वैकुंठींचा । ५ ।
येथुनियां माझी सरली येरझार । कंसानें उपकार केला मोठा । ६ ।
आजी माझे पितर उद्धरती सकळ । पाहींन गोपाळ कृपासिंधु । ७ ।
नामा म्हणे आला गोकुळासन्निध । हृदयीं आनंद न समाये । ८ ।

१७३. चौदाजणी ज्याच्या चरणाते पूजिती । त्याची येईन माती आपुल्या शिरीं । १ ।
एकांतीं अर्चन करिती धूर्जटी । त्यांसी बोलेन गोष्टी आवडीनें । २ ।

सप्तऋषि ज्याचे वर्णिताती गुण। करीतसे ध्यान ब्रह्मा ज्याचें । ३ ।
चारी वेद ज्याची वर्णिताती कीर्ति। करिताती स्तुति माहीजण। ४ ।
तेहतीस कोटि देव जयातें पूजिती। श्रुति वर्णिताती गुण ज्याचे । ५ ।
लक्षुमीचा पति ध्याती सनकादिक। पाहीन श्रीमुख एकवेळां। ६ ।
पृथ्वीचा हा भार करावया दूर । म्हणोनि अवतार घेत असे। ७ ।
नामा म्हणे आला यमुनेजवळी। उतरला खालीं रथाचिया । ८ ।

३७४. धन्य ही यमुना धन्य हें गोकुळ। वृक्षादि सकळ धन्य धन्य। १ ।
धन्य हा गोपिका धन्य हे गोपाळ। पक्षादि सकळ धन्य धन्य। २ ।
धन्य गोवर्धन धन्य वृंदावन । नंदाचा नंदन क्रीडतसे। ३ ।
धन्य ती यशोदा धन्य तिचा पति । अखंड पाहाती मुख ज्याचें । ४ ।
गायी घेवोनियां देव गेला राना। ध्वजवज्रांकुश चिन्हां उमटती। ५ ।
नेत्रीं अश्रुपात उतरे रथाखाले । गडबडा लोळे तयावरी। ६ ।
ब्रह्मादिकां दुर्लभ येथील ही माती । घेवोनियां हातीं मुखीं घाली। ७ ।
नामा म्हणे पुढें चालिला त्वरित । देखे गडियांत परब्रह्म । ८ ।

३७५. तनु हें आकाश चंद्रमा तें मुख । असे निष्कलंक परीक्षिती। १ ।
पूर्णिमेचा चंद्र त्याहुनि अधिक । शोभत श्रीमुख कृष्णाजीचें । २ ।
भोंवता हा शोभे नक्षत्रांचा मेळा। खेळत सांवळा जगद्गुरू । ३ ।
वैजयंती माळा किरीट कुंडलें । अक्रूरें देखिले दोघेजण। ४ ।
जोडोनिया हात घाली नमस्कार । वाहतसे नीर क्षणोक्षणीं। ५ ।
नामा म्हणे त्वरें धांवे हृषिकेशी । धरीत पोटाशीं अक्रुरातें। ६ ।

३७६. भेट देई मज म्हणे बळीराम। न वर्णवे प्रेम अक्रुराचें । १ ।
गोपाळ पुसती अवघे गडी तेव्हां। कोण रे हा बाबा आला येथें। २ ।
आपुल्या कान्होबाच्या पायां कां पडतो। काय हा मागतो सांग आम्हां। ३ ।
अक्रूर बळिराम घरीं आले गोपाळ। नंदादि सकळ भेटीयेले। ४ ।

मधुपर्कविधि करीती पूजन । म्हणे धन्य दीन आजीचा हा । ५ ।
अक्रूराबरोबरी करिती भोजन । पुसे वर्तमान मग त्यासी । ६ ।
भक्त माझें देवन जगा दावी मान । कृपाळु बहुत नामा म्हणे । ७ ।

१७७. प्रात:काळीं मात झाली गोकुळांत । जातो भगवंत मथुरेसी । १ ।
गोळणींचा मेळा मिळाला सकळ । पिटिती कपाळ आपुले हातें । २ ।
एकी त्या घालीती केंसामध्यें माती । एक त्या लोळती भूमीवर । ३ ।
आम्हां सोडूनियां तू रे कैसी जासी । तुजविण पिशीं आम्ही सर्व । ४ ।
कोणीं रथापुढें जाऊनि पडती । आक्रोशें रडती सकळीक । ५ ।
अक्रूर नव्हे बाई मोठा असे क्रूर । नामीं निरंतर क्रीया वसे । ६ ।
अक्रूरा आम्ही सर्व पसरीतों पदर । नेऊं नको श्रीधर मथुरेसी । ७ ।
नामा म्हणे शोक न वर्णवे आतां । झाला तो हाकिता रथ त्वरें । ८ ।

१७८. रडे मोकलुनि धाय । देवा आतां करूं काय । १ ।
राहूं कोणाचा आधारा । सांग आतां विश्वंभरा । २ ।
तुजवांचुनि दाही दिशा । वोस वाटे जगदीशा । ३ ।
नंद म्हणे देवा । टाकुनि गेलासी यादवा । ४ ।
गडी म्हणे हरी । खेळुं कोणा बरोबरी । ५ ।
ऐसे अक्रोशें रडती । नामा म्हणे धन्य भक्ति । ६ ।

१७९. ब्रह्मनिष्ठ तेव्हां स्थिरावला चित्तीं । अक्रूराचे गळती दोन्ही नेत्र । १ ।
दहींदूधतूप भरिल्या कावडी । चालती तांतडी सकळीक । २ ।
चिंतेनें व्यापिलें अक्रूराचें मन । काय वर्तमान होईल नेणें । ३ ।
नरनारी शोक करिती सकळ । दुराचारी खळ कंस आहे । ४ ।
मारगीं स्नानासी उतरे अक्रूर । रथावरी किशोर नंदजीचे । ५ ।
सोडोनियां घोडीं चालिला तांतडी । दिली असे बुडी जळांमध्यें । ६ ।
दावोनि कौतुक निरसी त्याचा धाक । सांगतसे शुक परिक्षिती । ७ ।
जुंपोनियां घोडीं चालिला सत्वर । लोपे दिनकर नामा म्हणे । ८ ।

९८०. जोडोनियां कर विनवी विश्वंभरा। चलावें मंदिरा सकळिकीं। १ ।
अनाथावरी कृपा करा कृष्णनाथा। ठेवीतसे माथा पायांवरी। २ ।
मारूनियां कंस येईन तुझ्या घरा। आग्रह अक्रूरा करूं नको। ३ ।
सकळ समुदाय मथुरेचे वनीं । महींत चक्रपाणि म्हणे नामा। ४ ।

९८१. प्रात:काळीं गडी उठे कृष्णराम। पाहावया ग्राम चालियेले। १ ।
मागती रजका देईना तो वस्त्रें । वधी नख शस्त्रें पापियासी । २ ।
ती ठायीं वांकडी नीट केली तिसी । तिनें चंदनासी लावियेलें। ३ ।
जोडोनियां हात विनवी सुदामा । चला मेघ:शामा घरा माझ्या। ४ ।
वस्त्रें देती तेव्हां मथुरेचे लोक । नरनारी मुख पाहाताती। ५ ।
मोडितां धनुष्य येती रक्षपाळ। नामा म्हणे खळ वधियेले । ६ ।

९८२. इच्छामात्रें मोडी ब्रह्मांडाच्या कोटी। चालिला जगजेठी कंसद्वारा । १ ।
मदोन्मत्त हस्ती देखोनियां हांसे । पीतांबर कांसे खोंवियेला। २ ।
सांवरोनी हात केंसा देत गांठ । खोंवितसे नीट वैजयंती । ३ ।
खंब ठोकोनियां राहे पुढें उभा। सांवळी सुप्रभा अंगकांती। ४ ।
पाहोनियां शुक झाला समाधिस्थ। ऋषिमुनी समस्त वेडावले। ५ ।
दुष्ट पाही हत्ती घाली अंगावरी। क्षणार्धेंचि मारी गजालागीं। ६ ।
उपडोनि दांत घेतसे श्रीधर । जाहला उद्धार कुवलयाचा। ७ ।
नामा म्हणे पुढें चालिला गोविंद। शुक बोले सावध परिक्षिती। ८ ।

९८३. चौदा भुवनें वसे ज्याचे पोटीं । त्यासी आणी जेठी मारावया। १ ।
इंद्रादि सुरवर ज्याचे किंकर । त्यासी आणी पामर झोंबीसाठीं। २ ।
अतुर्बळी तेव्हां दिसे नारायण। जळताती मनें वैरियांचीं। ३ ।
कंसाचे अंगणीं उभा असे देव। जैसा ज्याचा भाव तैसा भासे। ४ ।
कृष्णातें देखोनि वल्गना करिती। चोळिताती माती दंडालागीं। ५ ।

बळिभद्रा खूण दावियेली तेव्हां । उशीर न लावा मारायासी। ६ ।
नामा म्हणे एक उरला असे कंस । वधती सकळांस दोघेजण। ७ ।

९८४. रामेच्या वल्लभें देखियेलें कंसा। धरोनि आवेशा बैसलासे । १ ।
त्वरें जाऊनियां धरीयेला केशीं। पाडियेला भूमिसी दुष्टबुद्धी। २ ।
वज्रप्राय मुष्टी वोपी नारायण । सांडियेला प्राण कंसें तेव्हां । ३ ।
देव वर्षताती सुमनांचे भार । भक्त जयजयकार गर्जताती। ४ ।
गाऱ्हाणीं सांगती ऋषिमुनी सर्व । गाताती गंधर्व सप्तस्वरें । ५ ।
नामा म्हणे पुढें अप्सरा नाचती। वर्णिताती कीर्ति वेद ज्याची। ६ ।

९८५. राज्यीं स्थापियेला उग्रसेन तेव्हां। देवकी वसुदेवा सोडविलें। १ ।
देवकीच्या स्तनीं फुटलासे पान्हा। वसुदेव दर्शना करीतसे। २ ।
वासुदेवें केलें त्याचें समाधान । गावी दिल्या दान ब्राह्मणांसी। ३ ।
समस्तांचि क्रिया करी उग्रसेन । झालासे दिवाण देव त्याचा। ४ ।
पळोनियां गेले होते जे यादव । आणियेले सर्व रामकृष्णें । ५ ।
आनंद न माये सकळ लोकांला । मथुरेत राहिला नामा म्हणे। ६ ।

९८६. नंदालागीं तेव्हां म्हणे चक्रपाणि । जावें सकळांनीं गोकुळासी। १ ।
अहर्निशीं माझें करावें चिंतना । दुःख सांडी मना नंदराया। २ ।
ऐसें ऐकोनियां निराश वचन। जाईल माझा प्राण तुजविण। ३ ।
गडी म्हणती देवा आम्हांसी टाकिलें। काय आमुचें सरलें पुण्य देवा। ४ ।
कोणासवें आम्ही खेळूं यमुनेंत। रक्षील आम्हांतें कोण आतां। ५ ।
ब्रह्मादिक तुझ्या वंदिताती पायां। दिल्या आम्ही शिव्या क्षमा करीं। ६ ।
यशोदेसी सांगा माझा नमस्कार। देईन सत्वर भेटी सर्वां। ७ ।
कंठ सद्गदीत नेत्रीं अश्रुपात । निघती समस्त नामा म्हणे। ८ ।

९८७. चारी वेदां ज्याचा नयेचि उमज। करीतसे मुंज वसुदेव। १ ।
कर्दळीचे स्तंभ वाडे शृंगारिले । गर्गासी धाडिलें आणावया । २ ।

देशोदेशीं चिठ्या लिहिल्या वसुदेवें । मुंजीसाठीं यावें कृष्णजीच्या । ३ ।
मथुरेचे लोक आणिती आहेर । होतसे गजर वाजंत्र्यांचा । ४ ।
उग्रसेनें तेव्हां फोडिलें भांडार । द्विजांसी अपार द्रव्य दिलें । ५ ।
विष्णुदास नामा वांटितो सुपारी । झाले ब्रह्मचारी रामकृष्ण । ६ ।

९८८. अक्रूराच्या घरा आले रामकृष्ण । संतोषलें मन फार त्याचें । १ ।
घालोनि आसन प्रक्षाळी चरण । म्हणे धन्य दिन आजीचा हा । २ ।
जोडोनियां हात घाली नमस्कार । जाहला उद्धार पूर्वजांचा । ३ ।
हस्तिनापुरासि अक्रूरा त्वां जावें । सांगितलें देवें नामा म्हणे । ४ ।

९८९. अवश्य म्हणोनि चालिला अक्रूर । पाहियेलें पूर कौरवांचें । १ ।
धृतराष्ट्रा सांगे विवेकाच्या गोष्टी । फार तुझ्या पोटीं दुष्टबुद्धी । २ ।
बंधुचिया पुत्रा धरितोसी दूर । होसी लोभापर पुत्रांवरी । ३ ।
करितोसी द्वेष पंडुच्या पुत्रांचा । होशील नरकाचा अधिकारी । ४ ।
स्वर्गीचे पूर्वज हांसतील तुज । धरावा उमज येथोनियां । ५ ।
सांगोनियां ऐसें तेथुनि उठला । कुंतीसी भेटला नामा म्हणे । ६ ।

९९०. देवकी रोहिणी बळीराम वसुदेव । सख्यासुखी सर्व आहेत की । १ ।
पाहोनि तुज झालें समाधान । सुखी आहे कृष्ण मथुरेंत । २ ।
आमुची एक कुंती आहे हस्तनापुरीं । स्मरे तो अंतरीं किंवा नाहीं । ३ ।
बहुता दिवसां तुज धाडिलें अक्रूरा । म्हणोनि अंतरा सुख वाटे । ४ ।
माझिया बाळासी फार देती दुःख । नाहीं मज सुख क्षणभरी । ५ ।
राजा पंडु आम्हां टाकुनियां गेला । रक्षी बाळकाला कोण आतां । ६ ।
नामा म्हणे ऐसें सांगतसे कुंती । शिंपियेली क्षिती आश्रुपातें । ७ ।

९९१. निरोप हा माझा सांग गे कृष्णाला । भरंवसा मजला आहे तुझा । १ ।
अच्युता अनंता श्रीधरा वामना । अगा नारायणा शरण तुज । २ ।
जनार्दन हरि त्रिविक्रमा केशवा । अगा वासुदेवा शरण तुज । ३ ।

गोविंदा माधवा अगा मेघ:शामा । अगा पुरूषोत्तमा शरण तुज । ४ ।
चक्रपाणि अगा वैकुंठनायका । रक्षीं या बाळका दासा तुझ्या । ५ ।
त्रिविधतापें माझी जळतसे काया । दावीं मज पायां एक वेळां । ६ ।
विदुर अक्रूर करिती समाधान । करावें श्रवण नामा म्हणे । ७ ।

९९२. परब्रह्म पूर्ण तुझा आहे सखा । मानिसी कां दु:खा जननीये । १ ।
इंद्राचा अवतार आहे हा अर्जुन । घेईल हा प्राण कौरवांचा । २ ।
करील गे युद्ध धरोनियां धीर । न देखें मी वीर त्रैलोक्यांत । ३ ।
सांगुनियां ऐसें पुसोनि सर्वांसी । आला मथुरेसी नामा म्हणे । ४ ।

९९३. घालितसे पंथ तरावया जना । गेले सांदीपना घरीं दोघे । १ ।
गुरूसेवा करिती वंदिती चरण । जाहली संपूर्ण विद्या तेव्हां । २ ।
जोडोनियां हात करिती प्रार्थना । मागावी दक्षणा गुरूराया । ३ ।
नामा म्हणे द्विज म्हणत स्त्रियेसी । असे जें मानसीं इच्छा तुझ्या । ४ ।

९९४. समुद्रांत पुत्र बुडाला रे माझा । पराक्रम तुझा ठावा असे । १ ।
अवश्य म्हणोनि तेथोनि निघाले । समुद्रांत आले रामकृष्ण । २ ।
करोनियां पूजा पुसे वर्तमान । देई रे आणून गुरूपुत्र । ३ ।
पांचजन्य दैत्य येथें बळी राहे । बंधु तेथें पाहे कृष्णनाथा । ४ ।
टाकोनियां उडी वधिलें तयासी । पाहे हृषिकेशी उदरांत । ५ ।
नाही ऐसें कळों आलें तें ईश्वरा । घेवोनि शरीरा आला वरी । ६ ।
परीक्षिती काय न कळे तयाला । दावितसे लीला नामा म्हणे । ७ ।

९९५. यमाचिया नगरीं दोघेजण गेले । शंखातें स्फुरलें कृष्णनाथें । १ ।
ऐकोनियां नाद कांपतसे काळ । उठिले सकळ पाहावया । २ ।
जोडोनियां हात आणी अधोक्षजा । करोनियां पूजा पुसतसे । ३ ।
सांदीपनपुत्र आहे तुजपाशीं । आणीं रे तयासी शीघ्र आतां । ४ ।
तुमचा मी किंकर निरोप हो द्यावा । रामा वासुदेवा पुसतसे । ५ ।
घेवोनियां पुत्र तेथोनि चालिले । नाम म्हणे आले गुरूगृहीं । ६ ।

११६. काढीतसे दृष्टी सांदीपनपत्नी । न वर्णवे वाणी हर्ष तिचा । १ ।
असे कांहीं इच्छा मागावें आणीक । दिले हें बाळक म्हणती दोघे । २ ।
अहर्निशीं तुम्हा असावें कल्याण । आले रामकृष्ण मथुरेसी । ३ ।
कृतांतासी धाक नामा म्हणे त्याचा । आहें मी तयाचा शरणागत । ४ ।

११७. युगांवरांबरी जाताती घटिका । गोकुळींच्या लोकां तैसें झालें । १ ।
उदास दिसती वनें दाही दिशा । काय रे जगदीशा आम्हां केलें । २ ।
वेडावल्या गायी करिताती खंती । वत्स न करिती स्तनपान । ३ ।
अन्नपाणी तेव्हां वर्जिती गौळणी । आतां चक्रपाणि कैंचा आम्हां । ४ ।
यमुनेचे तीरीं वृक्ष ते सुकले । पाषाण उलले तया दुःखें । ५ ।
प्रातःकाळीं गडी अवघेचि बोलती । मारूनि श्रीपती गेला नाहीं । ६ ।
जीवनाविण मत्स्य जैसे तळमळती । नामा म्हणे चित्तीं धन्य प्रेमा । ७ ।

११८. अंतर्यामी जाणे सर्वांचा जो साक्षी । रडताती पक्षी मजसाठीं । १ ।
पाहुनियां प्रेम भुलला गोविंद । रडतसे मंदमंद तेव्हां । २ ।
उच्चारितां नामें तरताती पापी । न विसरती गोपी कांहीं केल्या । ३ ।
विश्वाचा तो आत्मा शोक तया नाहीं । भुललासे तोहि भक्तीप्रेमें । ४ ।
चिंतेनें व्यापिला तेव्हां हृषिकेशी । पाठवूं कोणासी गोकुळांत । ५ ।
त्यांवेळीं पुढें देखिलें उद्धवा । बाहातसे तेव्हां तयालागीं । ६ ।
नामा म्हणे आतां करिल एकांत । सावधान चित्त अवधारा । ७ ।

११९. शुकादिक ज्याची वर्णिताती कीर्ति । तो ये काकुळती उद्धवासीं । १ ।
दयेचा सागर बोले तयेवेळां । मजसाठीं गोकुळा तुवां जावें । २ ।
आजवरी त्यांनीं ठेवियेला प्राण । संसाराचें भान नाहीं कोणा । ३ ।
यशोदा आणि नंद झालेती तटस्थ । गडी माझे समस्त पिसे झाले । ४ ।
गाई मजविण न घेती तृण । बाळें स्तनपान विसरलीं । ५ ।
चालतांना पंथ चुकती नारीनर । पक्षांनीं आहार सांडियेला । ६ ।

शाहाणा चतूर आहेशी नेटका । बोधाव्या गोपिका ब्रह्मज्ञानें । ७ ।
नामा म्हणे देवीं चरणांवरी माथा। जुंपुनियां रथा निघतसे । ८ ।

१०००. सारथ्यासी सांगे हांकीं रहंवर । पाहियेलें तीर यमुनेचें । १ ।
उभा राहोनियां पाहे चहूंकडे। बोलताती कोडें पक्षीराज । २ ।
व्याघ्र आणि गायी एकत्र बैसती। कोकिळा बोलती कृष्ण कृष्ण। ३ ।
सर्प आणि नाग निस्तेज पडती । चिमण्या बोलती कृष्ण कृष्ण। ४ ।
वियोगानें तेव्हां मयूरें रडती। शुक डोलताती कृष्ण कृष्ण । ५ ।
कृष्णाच्या कृपेनें कळलें उद्धवासी । धन्य धन्य त्यांसी म्हणे तेव्हां । ६ ।
ब्रह्मज्ञान सांगों देवें पाठविला। तो रडूं लागला तयेवेळीं। ७ ।
नामा म्हणे आला नंदाचिया घरा। पुढील अवधारा निरोपण । ८ ।

१००१. धांवोनियां नंदें धरिलें चरण । घालुनि आसन बैसविला । १ ।
सुकुमार सांवळा राजीवलोचन। सुखी आहे कृष्ण मथुरेंत । २ ।
रोहिणीचा पुत्र सुखी आहे राम। स्मरे पुरूषोत्तम कधीं आम्हां । ३ ।
गोकुळांत गौळी आहे एक नंद । आठवी गोविंद कधीं तरी। ४ ।
काय माझें पुण्य उद्धवा सरलें । म्हणोनि टाकिलें कृष्णनाथें । ५ ।
परब्रह्म पूर्ण धाडी मी वनासी । म्हणोनी हृषिकेशी कोपलासे। ६ ।
मेघःश्याम मूर्ति सुकुमार पाउलें । न देखती डोळे आतां माझे। ७ ।
ऊठ नंदा जेऊं कोण म्हणे आतां। दुःख माझ्या चित्ता फार वाटे। ८ ।
नेत्रीं अश्रुधारा कंठ सद्गदीत। पडीला मूर्च्छित नामा म्हणे । ९ ।

१००२. पडियेली जेव्हां यशोदेसी भ्रांती। ऐकें परीक्षिती प्रेम तिचें। १ ।
खोडी नको करूं म्हणे दटाविलें। म्हणोनि रूसलें तान्हें माझें। २ ।
नंदासी म्हणत पाहूं कोठें कृष्णा। दाटलासे पान्हा स्तनीं माझ्या । ३ ।
उद्धव चित्तांत करीतसे खेद । यशोदे सावध होई मातें। ४ ।
निर्दय पापीण बांधीं मी उखळासी। म्हणोनि रूसलासी देवराया । ५ ।

माती खातां वेळे तुज मी मारिलें। म्हणोनि टाकिलें मजलागीं। ६ ।
नामा म्हणे त्यांचें करीं समाधान। सांगे ब्रह्मज्ञान दोघांजणा। ७ ।

१००३. प्रातःकाळीं उद्धव नगरीं पातला । मिळालासे मेळा गोपिकांचा। १ ।
परस्परें म्हणती कोण आतां आला। न्यावया नंदाला पाठविलें। २ ।
सकळांच्या प्राणा घेऊनियां येई। म्हणोनियां पाहीं धाडी यासी। ३ ।
धावून उद्धवाचे धरीती चरण। आमुचें स्मरण करितसे। ४ ।
स्वरूपहीन आम्ही सुंदर कंसदासी। म्हणोनि तुजसी पुसतसों। ५ ।
आम्हांसाठीं तेथें जाऊनियां म्हणे। एकदां चरण दावीं सर्वां। ६ ।
मेल्या त्या गोपिका त्यांची राख झाली। वाजवी मुरली तया जागीं। ७ ।
नामा म्हणे त्यांसीं सांगे ब्रह्मज्ञान। श्रीकृष्ण कृपेनें स्थिरावल्या। ८ ।

१००४. समस्तांचें त्यानें केलें समाधान। सारिलें भोजन सकळिकीं। १ ।
यशोदा आणि नंद देती अलंकार। कृपा दीनावर असोंद्यावी। २ ।
गोपाळ गौळणी पुसती उद्धव । मिळोनियां सर्व बोळविती। ३ ।
पक्षी श्वापदांसी सांगत उद्धव । असों द्यावा भाव कृष्णापायीं। ४ ।
आला मथुरेसी सांगे वर्तमान। नामा म्हणे धन्य श्रोते वक्ते। ५ ।

१००५. गोपाळाशीं खेळती। आनंदें डोलती।
कृष्ण आमुचा सांगाती। डो डां डो डां डो। १ ।
कान्होबाची संगती। ब्रह्मादिक इच्छिती।
धन्य आम्हां म्हणविती। अ ल ल ल ल। २ ।
कृष्णाप्रती गोपाळ। म्हणताती सकळ।
अकळशी नाकळ। हा त त त त। ३ ।
मामा मारूं गेलासी। आपटिलें गजाशी।
मल्लयुद्ध खेळलासी। हु तु तु तु तु। ४ ।

अजगर मारिला। वडवानळ गिळिला।
गोवर्धन उचलिला। अ ब ब ब व। ५।
पूतनेसी शोषिलें। नारदासी मोहिलें।
गणिकेसी उद्धरिलें। अ रे रे रे रे। ६।
गौळियांचे घरां जाशीं। दहीं दुध लोणी खाशी।
त्यांच्या सुना भोगिसी। छि छि छि छि छि। ७।
सोळा सहस्र भोगिशी। ब्रह्मचारी म्हणविशी।
लटिकेंचि ठकविशी। कु लु लु लु लु। ८।
ब्रह्मा सांडी मीपण। चरणी घाली लोटांगण।
परब्रह्म नारायण। आ हा हा हा हा। ९।
ऐसे तुझे पवाडे। वर्णिताती वाडेंकोडें।
विष्णुदास नामा म्हणे। यु यु यु यु यु। १०।

१००६. गोकुळीं गोपिका गोपाळ सकळ। मध्यें घननीळ क्रीडा करी। १।
करी खेळ मोठा स्थापिलें निशाण। स्वयें नारायण हाका मारी। २।
मारियेला कंस दुर्घट दुर्जन। पुरवी वासना पांडवांची। ३।
पांडवांचें ध्यान धरूनि अंतरीं। नामा म्हणे हरि साह्य करीं। ४।

१००७. लांचावलें ब्रह्म भक्तिचेनि सुखें। गोकुळीं गोपाळवेशें गाई राखे। १।
त्रिभुवनीं न समाये ब्रह्मादिकां लक्षा नये। तो दास्यत्व करिताहे गौळियांचें। २।
नवलाव गे माये देखियेला। तें सुख काय सांगों तुला। ३।
कैसें गोवळेपणाची बुंथी घेऊनियां साजिरें। परब्रह्म झालेंसे पिसें गे माये। ४।
निगमा निर्धारितां अमरा दर्शनाची आस। मुनिजनां ध्यानीं आभास तोही नाहीं। ५।
तें हें नित्य पूर्ण खेळविती गौळणी। चुंबन देऊनि गौळणी हृदयीं आलिंगिती। ६।
क्षीरसागरींचें सुख सांडुनि अशेष। रुक्मिणी सेजेचे विलास तेहि नावडती। ७।

तें हें गोधना गोठणीं केलें शुद्ध चैतन्य सांचलें । तें मुखही न कळे साचें चतुरानना । ८ ।
भक्ती प्रेम भाव देखे आहे जेथें । हरि वोळला जाये तेथें कैचें नैश्वर्त्व । ९ ।
न विचारी जातीकुळ शुची अथवा चांडाळ । हृदय देखुनि निर्मळ प्रीती धरी तेथें । १० ।
ऐसें त्रिभुवन सुखाचें सार कीं अनाथाचें माहेर । अव्यक्त परि साकार झालें असे तें । ११ ।
भक्तांचेनि नियोगें श्रमलें म्हणोनि गोकुळासी आलें । तेणें प्रेम सुख दिधलें नामयासी । १२ ।

## विरहिणी

१००८. रूपें शामसुंदर निळोत्पल गाभा । सखये स्वप्नीं शोभा देखियेला । १ ।
नेत्र विशाळ भाळ दंत हिरया ज्योती । सखये मदनमूर्ती देखियेला । २ ।
शंख चक्र गदा पद्म शोभती चहूं करीं । सकये गरूडावरी देखियेला । ३ ।
शयन शेषापृष्ठीं नाभीं परमेष्ठी । गंगा वामांगुष्टीं देखियेला । ४ ।
पीतांबर कटीतटीं दिव्य चंदन उटी । सखये जगजेठी देखियेला । ५ ।
विचारितां मानसीं नये जो व्यक्तीसी । नामा केशवेंसी लुब्धोनि ठेला । ६ ।

१००९. अव्यक्त परब्रह्म कैसें आलें वो व्यक्ती । अकळु न कळे तो हा अमुर्त मूर्ती ।
पुंडलिकाचे भक्ती येऊनि वाळवंटीं । उभा विटेवरी कर ठेऊनि कटीं । १ ।
जिवींचा जिवनु वो मज भेटवा हरी । लागलें प्रेम पिसें होइंन दासी कामारी । ध्रु० ।
कासे कसिला पितांबर तयावरी मेखळा । अंगीं उटी चंदनाची वरी शोभती वनमाळा ।
सघोल वक्षस्थळ पदक झळके अवल्लिळा । बाहु बाहुवटे तें रूप खुंटलें डोळां । २ ।
अधर जें पोंवळियाचे दंत हिऱ्याची ज्योती । विशाल नयन वो भोंवया व्यंकटा अति ।
टिळक जो रेखिला मृगनाभीं लल्लाटीं । उपमा नये व्यक्ती चंद्रा पडियली तुटी । ३ ।
माथां मुगुट जो रत्नें जडियली वरी । त्याखालीं मयूरपत्रीं वेंटी साजे मुरारी ।
माथां त्रिरगुंठी पुष्पें तुरंबिलीं वरी । तया मी भाळलियें भेटवावो झडकरी । ४ ।
इंद्रनीळ कीळ गाभा घनश्यामे दिसे । पाहाता एक दृष्टीं चकित केलें वो हासे ।
चित्तीं कामबाण जिवा लागलें पिसें । नामया विष्णुदासा वेधियेलें हृषिकेशें । ५ ।

१०१०. कृष्ण अनुरागें रंगली कामिनी । कामधामें गेलीं घरा विसरोनि । १ ।
होती बहुत जन्में वियोगें शिणली । आप नाठवे पर सुखें मिनली । २ ।
मनें करूनियां जाये विषयांचे संकल्प । तंव ते अवघे होय कृष्णरूप । ३ ।
दृष्टीं देखणें जें जें आवडे । वेणू वाहे तेथें उभे देहुडे । ४ ।
सुखशयनीं स्वप्नीं देखे सांवळा । कंठीं कौस्तुभ रूळे वरी वनमाळा । ५ ।
जीवें धांवुनि आलिंगीं प्रीति । तंव ते आर्ती होय कृष्णमूर्ती । ६ ।
देह परतोनी मागुते सांभाळी । तंव स्वयें सिद्ध आपण वनमाळी । ७ ।
नामया स्वामी जीविचा जिवलगू । कृष्णसुखाचा सुखबोध अंतरंगु । ८ ।

१०११. भिन्न माध्यान्ही वो । सेजे सुदली नारी ।
आपपर विसरुनियां । सुशोभित अंधारीं ।
त्यामाजी चारी भुजा । शंख चक्र वो करीं ।
पद्म गदा हातीं शोभती । दिसे सर्व शृंगारीं ।
येऊनि हंस तुळीके । कैसें धरियलें करीं ।
देऊनि आलिंगन । वोसरला वो दुरी ।
पालव धरितां धरितां । निघाला बाहेरी ।
त्यालागीं प्राण जातो । भेटवा वो झडकरी । १ ।
कवण ते प्राण सखी । भेटी करील विठोसी ।
सांडुनि वीरगुंठी । चरण झाडीन केशीं । धृ ।
कवण मी कैचा नेणें । जाती कुळ तयाचें ।
कवणा पासाव झाला । तें मी नेणें वो साचें ।
इंद्र नीळ कीळ गाभा । घन नभ रूप तयाचें ।
चरणीं तोडर रूळे । वरी नेपूरें साचे ।
नख चंद्रमंडीत वो । जन्मस्थान गंगेचें ।
जानु जघन नीट । पीतांबर वो कासे ।

त्यावरी नाग मुरडी । रत्न मेखळा साजे ।
माजू जो मुष्टी माय । त्या मन वेधलें माझें । २ ।
नाभीं सरोवरीं वो । दिसे ब्रह्मकमळ ।
अनुपम्य उदर ज्याचें । विशाळ वक्षस्थळ ।
कौस्तुभ वरी शोभे । करितसे झाळपळ ।
कुंडलांचेनि रत्नें । कैसी फांकली कीळ ।
वदन मी काय वानूं । प्रसिद्ध निर्मळ ।
भाळीं तो अर्ध चन्द्र । मृगनाभींचा टिळ ।
लोपला दिनमणी । महातेज प्रबळ ।
ते रूप देखावया । जीव करी तळमळ । ३ ।
सरळ ज्या अंगोळिका । नवरत्नें जडीत ।
कंकणें मनगटी । बाहुवटी सुशोभित ।
त्यावरी कीर्ति मुख । भुजादंड मिरवत ।
वैजयंती पदक हिरे । मुगुटीं झळकत ।
मयूरपत्रें शिरीं । शोभा दिसे अमित ।
चंद्र मंडळ लोपले वो । महा तेज अद्भुत ।
व्यापिलें वनमाळीयें । लावण्य अमित ।
तें रूप देखावया । जीव माझा उल्हासत । ४ ।
ऐसी तापली विरहज्वरें । थोर होतो उबारा ।
चंदन पोळतसे । न घाला विंजण वारा ।
चंद्रमा दाहतसे । उष्ण तो खडतरा ।
तंव येरी जाणितला । वेधु नंदकुमरा ।
येईल केशीराजा । नेईल द्वारकापुरा ।
भक्ति ही विरह माता । तिने आणिला वरा ।
नामया विष्णुदासा । भेटी शारंगधरा ।
तनु मनु प्राण माझा । सुख झालें अंतरा । ५ ।

१०१२. त्रिभंगी नीट उभा कटीं ठेवुनी कर । तो पुंडलिकाचे द्वारीं देखियेला । १ ।
चहूंली चहुली देहुडा पाउली । गुंजाहार गळां देखियेला । २ ।
पुष्पवतीच्या संगमीं गोपाळ आश्रमीं । काला करितां आम्हीं देखियेला । ३ ।
वेणु पाहतां चहूंकडे नाद उठला अंबरीं । वासुरें तटस्थ हुंबरी होऊनि देखियेला । ४ ।
अंगीं चंदनाची उटी मयुर पत्रांची दाटी । चेंडू खेळतां यमुनेतटीं देखियेला । ५ ।
नामा म्हणे केशवा देखियेलें हृदयीं । जन्मवरी राहीं हेंचि मागें । ६ ।

## ↔ भक्त सुदाम देवकथानक ↔

१०१३. सुदामा ब्राह्मण होता तो दुबळ । परि चित्तीं गोपाळ दृढ धरिला । १ ।
तयाचें चरित्र ऐका सावधान । तेणें जन्ममरण दूर होती । २ ।
सत्वाचा सागर धैर्याचा मांदार । भक्तीचा निर्धार तयापाशीं । ३ ।
हालेना चालेना चळेना ढळेना । आणिक कल्पीना इच्छा कांहीं । ४ ।
सदा सर्वकाळ समाधी लागला । प्रपंच सांडिला छेदुनियां । ५ ।
नामा म्हणे तोचि योगियांचा राजा । ज्ञान्याचिया पूजा पुजतसे । ६ ।

१०१४. प्रारब्धाच्या बळें देहाचें वर्तनें । काळचक्र भोवने जैसें कांहीं । १ ।
तैसाची तो साधु जाणावा प्रसिद्ध । देहाचा संबंधु नेणे कांहीं । २ ।
वारे वाजुनियां जातां वृक्ष डोले । मर्यादेवेगळें होत जाय । ३ ।
नामा म्हणे होणें जाणें नाहीं तयां । संचिता साराया लागोनियां । ४ ।

१०१५. ऐसा तो ब्राह्मण दरिद्रें पीडिला । सदा स्वरूपीं झाला अखंडीत । १ ।
न करीच खंती कांहीं तो अंतरीं । वाचे तो उच्चारी रामकृष्ण । २ ।
नाहीं धड घर केवळ जर्जर । चंद्र प्रभाकर उगवती । ३ ।
बाळें पांच सात बाहाती झोंबती । भुकें तळमळिती सर्वकाळ । ४ ।
उष्णें पोळे वारा येतसे भरारा । मेघाचिया धारा घरामाजी । ५ ।
नामा म्हणे त्यानें प्रपंच सांडिला । परमार्थ मांडिला अखंडीत । ६ ।

१०१६. तयाची सुंदर शांतीची बाहुली । आणीक जीभली बोलों नेणे । १ ।
सेवेसी सादर होऊनियां राहे । भुकची ते खाये भुकेलिया । २ ।

नित्य नैमित्तिक कांहीं न म्हणे । अंतरींची खूण जाणोनियां । ३ ।
नामा म्हणे न्यून पूर्ण सर्व हरि । आणिका विचारीं गुंतेचिना । ४ ।

१०१७. एके दिनीं भार्या भावें तें मानवी । भ्रतारा विनवी नम्रतेनें । १ ।
तुमचा सोइरा आहे नारायण । अखंडित ध्यान करितां त्याचें । २ ।
तयाचिये भेटी जावें लवकरी । तो आहे कैवारी दीनालागीं । ३ ।
भेटतांचि नासे अज्ञान दरिद्र । सुखाचा समुद्र पांडुरंग । ४ ।
नामा म्हणे देव भक्ता साहाकारी । सर्व सिद्धि घरीं वोळगती । ५ ।

१०१८. ऐकतां वचन मानलें तयासी । पुढें कल्पनेसी ठाव नाहीं । १ ।
तेथें म्यां मागावें हें कांहीं न कळे । निवतील डोळे दर्शनानें । २ ।
परी तया भेटी न्यावें कांहींवाहीं । परंतु तें नाहीं लेश घरीं । ३ ।
नामा म्हणे द्विज वांच्छी दरूषण । रिकाम्या हातानें जातां लाजे । ४ ।

१०१९. जाणवला भाव तया सुंदरीसी । म्हणते पतीसी नम्रतेनें । १ ।
जावें आतां तुम्हीं देवाचे भेटीसी । उठली वेगेंसी सन्मानानें । २ ।
आणितें मागुनी भक्तीचे भातुकें । जेणें यदुनायक तोष पावे । ३ ।
नामा म्हणे घरीं पदार्थ तो नाहीं । प्रेमाच तो पाहीं उगवला । ४ ।

१०२०. पाहे चहूंकडे धुंडोनि सुंदरी । देखे मुष्टी चारी तंदुळिका । १ ।
तोचि शुद्धभाव उगवला पुढें । सर्वही तें कोडें देवालागीं । २ ।
अहं सोहं वृत्ति तेथें एक झाली । दृष्टीनें देखिली पोह्यांकडे । ३ ।
नामा म्हणे सर्वरूपीं नारायण । बोलाया कारण नाहीं तेथें । ४ ।

१०२१. तेचि भक्तिभावें पतीपुढें ठेवी । पाहोनी गौरवी ब्रह्मनिष्ठा । १ ।
तया योग्य नव्हेचि गे हा पदार्थ । आमुचिया आर्त तुळसीदळ । २ ।
द्रौपदीच्यासाटीं भाजीपान खाये । तेणें त्याची काय भूक गेली । ३ ।
नामा म्हणे हें तो कोड कौतुक । थोडेंहि अधिक देव करी । ४ ।

१०२२. गुह्य भावार्थाचें पाहोनियां पत्र । आनंदला भाव योगियाचा । १ ।
म्हणे आतां भेटूं बाळमित्र हरि । भक्ताचा कैवारी कृष्णनाथ । २ ।
बांधावया वस्त्र केवळ जर्जर । त्यामाजीं न थरे गुंडाळितां । ३ ।
नामा म्हणे द्विज आनंद पावला । मुहूर्त नेमियेला प्रयाणासी । ४ ।

१०२३. वाचे नाम गात चालिला तो द्विज । एकाचें तें चोज शुद्ध भावें । १ ।
जीवशिव एकाकार झाली वृत्ति । नाहीं कांहीं चित्तीं शमदम । २ ।
हात पाय नळ्या वळती फेंगड्या । भावार्थाच्या गुळ्या उभारीत । ३ ।
नामा म्हणे वाट चालता समाधि । सोहं स्वरूपीं बुद्धि ठसावली । ४ ।

१०२४. शुभसुचिन्हें होताती शकुन । तेणें तो ब्राह्मण आनंदला । १ ।
म्हणे थोर लाभ आजिचा दिसतो । आनंद वाटतो मनामाजी । २ ।
उडती उजवे काग ते जोड्यानें । भरल्या कुंभानें नारी देखे । ३ ।
तास भारद्वाज वामभागीं जाती । मयूर नाचती उत्साहानें । ४ ।
नामा म्हणे सर्व प्रश्नांचाही प्रश्न । वाचे नारायण नाम गातो । ५ ।

१०२५. द्विज म्हणे जातां मनीं । कैसा भेटे चक्रपाणी । १ ।
काय होईल न कळे । म्हणोनि हृदयीं कळवळे । २ ।
येवढा ज्याचा राज्यभार । मी तो केवळ फकीर । ३ ।
कोठें तयाला आठव । बाळपणींचें माझें नांव । ४ ।
तैं तो होता गौळ्याघरीं । आतां त्रैलोक्याधिकारी । ५ ।
नामा म्हणे ऐसें । करितचि निजध्यास । ६ ।

१०२६. दुरोनि देखिलें द्वारकानगर । अवघें कनकाकार बांतियेलें । १ ।
जेथें देवराणा नांदतो तो ठाव । काय म्यां वर्णावें मंदमति । २ ।
हिरे चिरे रत्न झगमग दिसती । वांसे ते लोंबती मोतियांचे । ३ ।
वैकुंठींचें सर्व वैभव आणिलें । शोभेसी शोभलें आपेआप । ४ ।
गुढीया गोपुरें झळकती पताका । वाजताहे डंका चौंवेदांचा । ५ ।

साहाजण भाट उभे महाद्वारीं । अठरा व्यारकरी मोकाशांचे । ६ ।
नामा म्हणे रिद्धिसिद्धीचें भांडार । देखिलें नगर ब्राह्मणानें । ७ ।

१०२७. झांकावले डोळे शंका करी मनीं । दिवस कीं यामिनी हें न कळे । १ ।
महा तेज:पुंज फांकती सकळ । सिंधूचा झळाळ भोंवताला । २ ।
गोमती ते नदी निर्मळ वाहात । बहु घुमघुमीत सुमनें भार । ३ ।
जाईजुई आणि कमळ कल्हारी । भ्रमर झुंकारी गुंजारव । ४ ।
नामा म्हणे मुनि पातला पूर्वद्वारा । पुढिल्या विचारा चित्त द्यावें । ५ ।

१०२८. चहूंकडे स्वर गाताती गायनें । आणिक पुराणें ठाईंठाईं । १ ।
गीतनृत्य नाना करिती तनाना । होतसे झणाणा टाळघोळ । २ ।
श्रवणाचें सुख घेतसे ब्राह्मण । नामाही गर्जना करीतसे । ३ ।

१०२९. नारायण नाम तारक सर्वांसी । तें मुनी मानसीं धरिलें असे । १ ।
कापुराची राशी अग्नीचाहो कण । तैसें नाम जाण पातकासी । २ ।
अंतरीं ते क्षुधा लागली द्विजासी । पाहात नगरीसी सावचीत । ३ ।
नामा म्हणे द्विज उभा महाद्वारीं । केवळ भिकारी राजयोगी । ४ ।

१०३०. नाहीं देवाचिये द्वारीं आडकाठी । हे तो आहे गोष्टी सिद्धांताची । १ ।
भावाविरहित मार्गची न फुटे । फुटल्या न सुटे मागुता तो । २ ।
नामा म्हणे ऐसा लौकिक वेव्हार । तेथें तों निर्धार कांहीं नाहीं । ३ ।

१०३१. चालिला देवाचे भेटीला सन्मुख । ब्राह्मणाचा हरिख न समाये । १ ।
पाहातां लोचनीं राजीवलोचन । भावाचे मोचन तेचि काळीं । २ ।
सभा ते साजिरी रत्न सिंहासनीं । देव चुडामणी शोभतसे । ३ ।
राहीरखुमाई चामरें ढाळिती । राधा उभी हातीं घेउनी छत्र । ४ ।
समारंभें पुढें गरूड तो उभा । शोभतसे शोभा दिव्य कांहीं । ५ ।
यादवांची सभा दाटलीसे भारी । नाना उपचारी रिद्धी सिद्धी । ६ ।
उद्धव अक्रूर उभे पायांपासीं । देवादिदेवासी विडे देत । ७ ।
नामदेव तेथें उभा होता निका । घेऊनि पादुका दोन्ही हातीं । ८ ।

१०३२. पुढें तो निघाला नाना झाला रंगीं । आपुलिया रंगें रंगूनियां । १ ।
येकाकार करी चित्त आणि वृत्ति । पाहे लक्ष्मीपति दुरोनियां । २ ।
तटस्थ जाहाला चालला त्वरित । मुखीं नाम गात गोविंदाचें । ३ ।
नामा म्हणें नीर पाडारे लोचनीं । समाधी लागुनि मुनी ठेला । ४ ।

१०३३. देखिला सांवळा राजा द्वारकेचा । सर्वही सुखाचा ठेवा दिसे । १ ।
माथां तो मुगुट कुंडलें श्रवणीं । प्रभा दिनमणी तुच्छ जेथें । २ ।
कोटी मन्मथांची झाडणी करावी । ऐसी ते बरवी अंगकांती । ३ ।
श्रीमुख शोभलें पूर्णचंद्रा ऐसें । देखतांचि दोष सर्व जाती । ४ ।
केशराची उटी कस्तुरी मळवटी । माळ रूळे कंठीं वैजयंती । ५ ।
श्रीवच्छलांछन मुद्रिका भूषण । झळकती आन भुजादंड । ६ ।
नामा म्हणे ऐसा देखियेला देव । तयाचा अनुभव काय वानूं । ७ ।

१०३४. देखिला सुदामा आपुल्या नयनीं । मग चक्रपाणि उठे त्वरें । १ ।
सिंहासना खालीं टाकोनियां उडी । कर द्वय जोडी नमनालागीं । २ ।
भेटुनियां तेव्हां धरिला हस्तकीं । बैसवी मंचकीं वैडुर्याच्या । ३ ।
म्हणे रुक्मिणीसी आणीं उदकाला । पुजूं या द्विजाला सन्मानेंसी । ४ ।
नामा म्हणे देवें चरण प्रक्षाळिले । आंचळीं पुसिले आपुलिया । ५ ।

१०३५. स्नानालागीं उठा म्हणे नारायण । आणविलें उष्ण पाणी तेव्हां । १ ।
सोळा सहस्र स्त्रिया उटणीं लाविती । अक्षवाण आरती करिताती । २ ।
करविलें स्नान पीतांबर परिधान । अलंकार भूषणें दिलीं त्यासीं । ३ ।
स्वइच्छा भोजन वाढिलें तयासी । नामाही पंक्तिसी बैसविला । ४ ।

१०३६. सोळा सहस्र ताटें द्विजालागीं आलीं । अमृताची गेली चवी तेव्हां । १ ।
पक्कान्नाचा तरी वाढवूं विस्तार । होईल उशीर कथेलागीं । २ ।
हरिरुचि जेवण सुदामा जेविला । वेगीं आंचवला संसारासी । ३ ।
नामा म्हणे त्यासी देवें दिला विडा । रंगला तो जोडा वैराग्याचा । ४ ।

१०३७. काय वहिनीनें दिधलें आम्हांसी । दाखवा वेगेंसी कृष्ण म्हणे। १ ।
सोडियेली तेव्हां मुष्टी तंदुळिका । रुक्मिणीनायका पुढें ठेवी। २ ।
घेऊनि ते पोहे मुखामाजी टाकी । मागें तें भीमकी धरोनि हात। ३ ।
ब्रह्मादिक देव उभे पोह्यांसाठीं । नाहीं त्या ललाटीं नामा म्हणे। ४ ।

१०३८. भक्षुनियां पोहे संतुष्ट जाहला। मग आनंदला नारायण। १ ।
विश्वकर्म्यालागीं तेव्हां आज्ञा केली । क्षणांत रचिली सुदामपुरी। २ ।
सर्व सुवर्णाची द्वारकेप्रमाणें । ब्राह्मणासी दान गुप्त दिलें। ३ ।
नामा म्हणे दुजा नाहीं देवावीण। देतांघेतां जाण पांडुरंग । ४ ।

१०३९. सुदामा म्हणे अनंता । आम्हा आज्ञा द्यावी आतां। १ ।
जाऊं घरासीं सत्वर। येऊनि दिवस झाले फार । २ ।
सर्व ठेउनी जातां बरें। वाटे मारिती तस्कर। ३ ।
ऐसीं ऐकोनि वचनें । सर्व काढिलीं भूषणें । ४ ।
आज्ञा घेउनि चालिला । देव बोळवीत आला। ५ ।
नामा म्हणे चोर। याचा उफराटा व्यापार। ६ ।

१०४०. नाहीं आमुचे देवें त्याने कांहीं द्यावें। व्यर्थ कां रुसावें देवावरी। १ ।
न करितां खेद पुढें वाट चाले । गोरक्षक भेटले तयालागीं। २ ।
पुसतसे त्यासी कोणाचें नगर। ते म्हणती घर सुदाम्याचें । ३ ।
सुदाम्याची तुम्ही हेळणा करितां। तयाच्या संचिता प्राप्त कैचें। ४ ।
मानुनि असार नगरद्वारा गेला। प्रचिती तयाला नयेचि ते। ५ ।
जेव्हां छत्रधारी मुजरा करिती। चरणासी लागती सुदाम्याच्या। ६ ।
सुदामदेव तेव्हां मंदिरासी गेला। मग ओंवाळिला सुंदरीनें। ७ ।
समाधानी झाला सुदामा ब्राह्मण। करा रे कीर्तन नामा म्हणे। ८ ।

## श्रीवराह अवतार (भाद्रपद शुद्ध तृतीया)

१०४१. उदकी बुडतां क्षिति नारियेली। भूते सारियेली दाढेवरी। १।
अद्यापि तूं होसी ऐसा हृषिकेशी। धरूनि मारिसी बळिवंत। २।
नामा म्हणे धन्य अघटित करणी। दाढेसी धरूनि वराह तूं। ३।

'युगे अठ्ठावीस' व 'जन्मता पांडुरंगे' आरती व उपसंहार करावा.

## श्री वामन जयंती, भाद्रपद शुद्ध द्वादशी, प्रात:काळ

१०४२. बळीराजा दैत्य बहुत मातला। संपत्ति हरिल्या देवांचिया। १।
तयाकाळीं जे जे देव आठविती। प्रार्थना करिती देवदेवा। २।
तयाकाळीं तुवां अदिति उदरी। अवतारधारी बटु झाला। ३।
छळुनियां बळी पाताळी घातला। आपण राहिला तया द्वारी। ४।
देव देवपदी बैसऊनि सारे। राखितसे द्वार नामा म्हणे। ५।

'युगे अठ्ठावीस' व 'जन्मता पांडुरंगे' आरती म्हणाव्या व उपसंहार करावा

## दसरा अभंग

१०४३. आजिचा दिवस आम्हां सोनियाचा। गोवळू भेटला कान्हो नंदाचा। १।
कान्होबा पेंढारी येईल यमुने। तयावीण मज घडी न गमे। २।
सोळासहस्र गोपी म्हणती अगा जगज्जीवना। एके वेळीं भेटी देई नंदनंदना। ३।
उजळुनी आरती करूं कुरवंडिया। शेष भरूं नामया स्वामी वनमाळिया। ४।

'युगे अठ्ठावीस' व 'जन्मता पांडुरंगे' आरती म्हणाव्या व उपसंहार करावा.

१०४४. आदि महामाया निर्गुण गुणाची। समचरणीं उभी विटे।
कोटी जन्माचें संचित प्रारब्ध। देखिलिया क्रियमाण फिटे।
स्वरूपरूपें रूपत्व पावली। राहिलि पंढरि पेंठे।
भीवरींच्या तीरीं कृपाळु माऊली। भक्तासी सप्रेम भेटे। १।
माये सुंदरे ओ माये सुंदरे। गोकुळीं पवाडे केले बहुत।

गोवर्धनीं जाहला ठसा। वृंदावनीं वेणु वाहुनियां।
गोपिकांसी वेधु जैसा। पुंडलिका कारणें।
पंढरी आलासी विसावा। हांसी कोंवसा भक्ताचा।
मनकादिक तुझ्या गोंधळासी येती। मनोरथ पुरविसी त्यांचा। २।
दक्षिण चरणीं तोडर गर्जे। वाम चरणीं वाजे वांकी।
सकळ हीं तीर्थें राहिलीं तेथें। विश्रांती तये विषयीं।
जानु जंघेवरी पितांबरें मालगंठी। पहातां भक्त जाहले सुखी।
हें रूप देखोनि मदन आला पोटीं। नामा म्हणे लागो दृष्टी। ३।

१०४५. वाजविली डांक चौक ठेवियला वो।
ठायीं पंढरीचे विठ्ठले तुज हाकारा केला वो। १।
रंगा येईवो खेचरे विठाई सुंदरी वो।
तुझीं पाउलें गोजिरीं कैं मी दृष्टी देखेन वो। २।
पाजळला दीपु फिटला अंधकारू वो।
न लावा उशीरू पांडुरंगे माउलीये वो। ३।
तमोगुणाचा रज जाळूनि धूप केला वो।
उशिरू कां लाविला पांडुरंगे माउलीये वो। ४।
तनुमनाची मूद टाकीन ओवाळुनि तुजवरोनि वो।
वैकुंठवासिनी पांडुरंगे माउलिये वो। ५।
अहंकार दैवतें झाडपिलें नामयासी वो।
येऊनियां रंगासी रंग राखीं आपुला वो। ६।

१०४६. देह मंदिराभीतरीं। शेजे सूदला श्रीहरी।
निद्रा उन्मनीचे भरी। तें म्यां स्वप्न देखिलें। १।
स्वप्नीं भुललें बाई। मागील नाठवेचि कांहीं।
हा जीव परवस्तूच्या ठायीं। तनुमनें आटला। २।

स्वप्न सांगूं कोणासी । विवेक करिती तयासी ।
हें कोडें अज्ञानासी । संतावांचुनी नुगवे । ३ ।
ध्यानीं पहूडला सांवळा । जवळी नारी बारा सोळा ।
विंजणे वारिती सकळां । सोहं शब्द जागरणीं । ४ ।
धिं धिं तुरे वाजती । अनुहात ध्वनि गर्जती ।
तेथें निद्रा ना सुषुप्ति । चंद्र सूर्य मावळले । ५ ।
मना पवना नाहीं भेद । तया ठायीं हा गोविंद ।
तेथें खुंटला अनुवाद । वेदश्रुति आटल्या । ६ ।
म्हणे विष्णुदास नामा । जन्ममरण नाहीं आम्हां ।
कृपा केली मेघ:श्यामा । संतसंगें तारिलों । ७ ।

१०४७. प्रथम अवतारीं आई थोर ख्याति केलीवो ।
ब्रह्मयाच्या कैवारा आपण मत्स्यरूप झाली वो ।
धुंडाळिला सागर आई शंखासुरा मिठी घाली वो ।
आणिले चारी वेद ब्रह्मपुरीं त्वां स्थापिलें वो । १ ।
ऐसी बहु लोकां माझारी आई खेळतसे गोंधळीं वो ।
भूलोकां माझारी अंबा नाचतसे वो ।
तेहतीस कोटि देवता सर्वे मेळवुनी मेळींवो ।
त्रासिले राक्षस भक्त जनां प्रतिपाळींवो । २ ।
कूर्म वेष धरूनी धरणी पाठीवरी धरिली वो ।
समुद्र मंथन मेळीं अंबा वेगीसी पावली वो ।
समुद्रमंथन करितां आई बरवा गोंधळ घाली वो ।
नारायण विश्वरूप देवा जैं त्यांच दिधलें वो । ३ ।
वराह रूप धरूनी आई थोर पवाडा केला वो ।
पृथ्वीच्या कैवारा घालिसी गोंधळ गाढा वो ।
वधिला हिरण्याक्ष त्याचा केला त्वां रगडावो ।
खेचर देवता धरणी धरियली दाढा वो । ४ ।

विक्राळ रूप धरुनी स्तंभ फोडुनी निघाली वो।
सिंहनादें गर्जतां हाक त्रिभुवनीं गाजली वो।
त्रिलोक मोजितां बळीस पाताळीं घातलें वो।
मागुता येईल म्हणवुनी त्याचें द्वार त्वां रक्षिलें वो । ५ ।
जमदग्नि रेणुके कुशीं धरियेला अवतार वो।
हातीं परशु घेउनी केला दैत्यांचा संहार वो ।
एकविस वेळ मेदिनी निःक्षत्रिय करुनी फेडिला भूमिभार वो ।
वधिला सहस्त्रार्जुन कामधेनुच्या कैवारा वो। ६ ।
पितृवचनाकारणें आई वनवासा गेली वो ।
अठरापद्में वानर मेळवुनी गोंधळ घाली वो।
वधिला दशशिर लंका शरणागता दिधली वो।
कौसल्या माउलि देवा बंदी सोडी केली वो। ७ ।
वसुदेवकुळटिळके तरी तूं कंसासुर मारिके वो ।
कुळांतकुळ तारिके तरी तूं कौरव संहारिके वो।
पांडव प्रतिपाळके भक्तजनाशी तारके वो।
तुझा गोंधळ गाता अंबे कोण वर्णूं शके वो। ८ ।
वेदमार्ग सांडुनि असुरें देवा गांजियलें वो ।
त्याचिया कैवारा आई त्वां सौम्यरूप धरिलें वो।
बौद्धरूप धरुनी भक्तालागीं मोहिलें वो।
कौसल्या देवता जे रूपें त्वां दिधले वो। ९ ।
कलियुगाच्या अंतीं थोर होईल अन्नान्न वो ।
एके ठायीं होउनि खातील चारी वर्ण वो।
तेव्हां पृथ्वी भारें तुजला येईल शरण वो।
तेव्हां तूं पावसी कलंकी अवतार धरुनी वो ।१०।

पुंडलिकाकारणें पंढरपुरीं केला वास वो।
तुझा गोंधळ गातां थोर जिवा उल्हास वो।
तूं माय माउली तुझा मज बहु विश्वास वो।
विनवी विष्णुदास नामा तुझा दासाचा मी दास वो।११।

१०४८. विठाई सांवळे। डोळसे रंगा येईं हो।ध्रु०।
कानीं कुंडलांची प्रभा। जैसे चंद्रसूर्य नभा हो। १।
गळां वैजयंती माळा। कासे पीतांबर पिवळा हो। २।
नामा म्हणे कृपावंता। झडकरी यावें पंढरीनाथा हो। ३।

१०४९. अगे तूं माउली संताची साउली। आठवितां घाली प्रेमपान्हा। १।
प्रेमपान्हा पाजीं अगे माझे आई। विठाई गे मायी वोरसोनी। २।
येतों काकुळती प्रेमपान्हासाठीं। उभा तो धुर्जटी मागें पुढें। ३।
नामा म्हणे जीवें करीन लिंबलोण। ओंवाळीण चरण विटेसहित। ४।

## ❀ आश्विन वद्य १२ वसुबारस सवत्स गोमाता पूजन ❀

१०५०. योगानें जोडिली सायासें। ते मज वोळली वोरसें। १।
बरवी कामधेनु गाय। विठाबाई माझी माय। २।
नसतां चारा सांठवण। तृप्त केलें त्रिभुवन। ३।
कोटि कुळें वोरसलीं। पुरोनि अवघींच उरलीं। ४।
न साहे अहंकाराचा वारा। आली दीनाचिया घरा। ५।
नामा म्हणे हें दुभतें। जोडुनि दिधलें असे आइते। ६।

१०५१. सर्व सुखरासी भिंवरेचे तीरीं। आमुची पंढरी कामधेनू। १।
प्रेमामृतें दुभे सदा संतजनां। वोसंडतो पान्हा नित्य नवा। २।
धर्म अर्थ काम मोक्ष चाऱ्ही थानें। दोहोणार धन्य पुंडलीक। ३।
जयाचें दुभतें नित्य नवें वाढतें। बहु पंढरीतें पूर्वपुण्य। ४।
भक्तिचेनि बळें भावाचेंनि मेळें। देखोनियां वोळे अधिकाधिक। ५।
भाग्यवंत नामा तें क्षीर लाधला। प्रेमें वोसंडला गर्जे नाम। ६।

१०५२. केशव नाम गाय केशव नाम गाय। केशव नाम गाय कामधेनु । १ ।
वेणुनादीं चरे पाणी पी भीवरे । ती गाय हंबरे भक्तांलागीं । २ ।
भक्तीसुखें धाय प्रेमें ते पान्हाय। भुकेलिया खाय पातकासी। ३ ।
नामा म्हणे गाय पंढरीस आहे । पापिया न साहे पाठीलागे । ४ ।

१०५३. वेणुनादीं चरे पाणी पी भीवरे। ते धेनु हुंबरे वत्सांलागीं । १ ।
वाणें ते सांवळी नामें ते श्रीधरा । चरे वसुंधरा चवदा भुवनें। २ ।
केशव नामें गाय माधव नामें गाय। विठ्ठल नामें गाय कामधेनु। ३ ।
प्रेमें ते पान्हावे भक्ता घरीं जाय। भुकेलिया खाय पातकासी। ४ ।
नामा म्हणे गाय भाग्यवंता घरीं। पाप्या जन्मवरी पाठीलागे । ५ ।

१०५४. परा पश्यंति मध्यमा वैखरी । ते गाय दुभे वैष्णवा घरीं। १ ।
ते एके विठ्ठलें पंढरी राखिली। दुभावया दिधली पुंडलिका । २ ।
चाऱ्ही वेद मुखीं धरूनियां राहे। विठ्ठलाचे द्वारीं नामा गाये । ३ ।

१०५५. आम्हां घरी एक गाय दुभती आहे। पान्हा न समाये त्रिभुवनी। १ ।
वाण ते सांवळी नामे ते श्रीधरा। चरे वसुंधरा चवदा भुवने। २ ।
वत्स नाही माय भलत्यासवे जाय। कुरवाळितां लाहे भाव भरणा। ३ ।
चहूं धाराक्षीर वोळली अमूप । धाले सनकादिक सिद्धमुनि । ४ ।
नामा म्हणे माझी भूक पैं ते गाय। जोगाविते माय तिन्हीं लोका । ५ ।

## दिवाळीचे भजन, आश्विन वद्य चतुर्दशी (नरक चतुर्दशी)

१०५६. नित्य हे दिवाळी असे पंढरपुरीं। ओंवाळिती नारी विठ्ठलासी। १ ।
पांवां वाहे वेणु बरविया नादें । नामघोष आनंदें नाचतसे। २ ।
नामा म्हणे आम्हीं पंढरीये जावें । कवतुकें पहावें विठ्ठलासी। ३ ।

१०५७. कोटी दिवाळ्या दसरे। आम्हां हेंचि झालें पुरे। १ ।
घरोघरीं ओंवाळणी। विठ्ठल देखिला नयनीं। २ ।
झाला सुखाचा शेजार। करा नामाचा गजर । ३ ।
नामयाचा स्वामी आला। ब्रह्मादिकां आनंद झाला। ४ ।

१०५८. येतिया पुसे जातिया धाडी निरोप । पंढरपुरी आहे आमुचा मायबाप। १ ।
येईवो येईवो येईवो विठाबाई माऊली ये। निढळावरी कर ठेऊनि वाट पाहे। २ ।
पितांबराची कांस शेला गगनी झळकला । गरूडावरी बैसोनि आमुचा कैवारी आला । ३ ।
विठोबाचे राज्य आम्हां नित्य दिवाळी। विष्णुदास नामा जीवे भावे ओवाळी। ४ ।

१०५९. सण दिवाळीचा आला। नामा राउळासी गेला। १ ।
हाती धरोनि देवासी । चला आमुच्या घरासी । २ ।
देव घराशी आणिले । चंदनपाटी बैसविले। ३ ।
गोणाईने उटणे केले । दामाशेटीने न्हाणिले । ४ ।
पदर काढिला माथ्याचा । बाळ पुशिला नंदाचा । ५ ।
हाती घेउनी पंचारती । चक्रपाणि ओंवाळती । ६ ।
देव जेऊनि तृप्त झाले । दासी जनीनें विडे दिले । ७ ।

१०६०. नामाचेनी बळे न भिये सर्वथा। कळी काळाचे माथा सोटे मारूं। १ ।
वैकुंठीचा देव आणू या कीर्तनी। विठ्ठल गावुनी गिती नाचूं । २ ।
सुखाचे सोहळे करू नित्य दिवाळी। प्रेमे वनमाळी जिवी धरूं। ३ ।
नामा म्हणे ऐसा भक्तिभाव धरा। सदा मुक्ति द्वारा वोळंगती। ४ ।

१०६१. कस्तुरी कुंकुम रेखे लाल टिळा । केशराची उटि सर्वांगासी । १ ।
पाहिला पाहिला माझा पांडुरंग। जिवीं जिवलग डोळे भरी । २ ।
हार शोभे गळां मंजरीचा तुरा । कर्ण रत्न फळा झळाळित। ३ ।
विटेवरी नीट गोमटीं पाउलें । त्यांवरी ठेविलें मस्तक म्यां । ४ ।
नामयाची धणी भुकेली ते धाली। आनंद दिवाळी आजि झाली । ५ ।

## दिवाळी पाडवा जीवनांत आढावा वाढावा भजन

१०६२. अवघे सावधान होऊनि विचारा । सोडवण करा संसाराची। १ ।
अवघा काळ वाचे म्हणा नारायण । वांयां एक क्षण जाऊं नेदा। २ ।

अवघा प्रपंच जाचोनि लटिका। शरण रिघा एका पंढरीराया। ४ ।
अवघे मायामोहे गुंतलेति पहा। अवघे सहज आहां जीवन्मुक्त। ५ ।
नामा म्हणे अवघे सुखाचेचि व्हाल। जरी मन ठेवाल विठ्ठलपायीं। ६ ।

१०६३. अवघे निरंतर करा हा विचार। भवाब्धीचा पार होय कैसा। १ ।
जन्म गेलें वांयां विषयाचे संगें। भुलले वाउगे माया मोहें। २ ।
अवघा करितां संसाराचा धंदा। वाचे वदा सदा हरिनाम। ३ ।
सर्वभावें एका विठोबातें भजा। आर्ते करा पूजा हरिभक्त। ४ ।
सर्व सुख होई तुम्हांला आपैतें। न याल मागुते गर्भवासा। ५ ।
नामा म्हणे तुम्हीं विचारूनि पहा। सर्वकाळ रहा संतसंगें। ६ ।

१०६४. आलेनो संसारा उठा वेगें चला। जिवलग विठ्ठला भेटीलागीं। १ ।
दुर्लभ मनुष्य जन्म न लभे रे मागुता। लाहो घ्या सर्वथा पंढरीचा। २ ।
भावें लोटांगण घाला महाद्वारीं। होईल बोहरी त्रिविध तापा। ३ ।
श्रीमुखाची वास पहा धणीवरी। आठवीं अंतरीं घडिये घडिये। ४ ।
शुद्ध सुमनें कंठीं घाला तुळशीमाळा। तनमन ओवाळा चरणांवरूनि। ५ ।
नामा म्हणे विठो अनाथा कोवसा। पुढती गर्भवासा येऊं नेदी। ६ ।

१०६५. आंता पांडुरंग स्मरा। जन्ममृत्यु चुकवा फेरा। १ ।
ऐसा कांही करा नेम। मुखीं स्मरा रामनाम। २ ।
चिंता ऐसें ध्यान। तेणें असा समाधान। ३ ।
नामा म्हणे हरिदास। त्यासि असावा अभ्यास। ४ ।

१०६६. नाम गाऊं नाम ध्याऊं। नामें विठोबासी पाहूं। १ ।
आम्ही दैवाचे दैवाचे। दास पंढरीरायाचे। २ ।
टाळ दिंडी घेऊनि हातीं। केशवराज गाऊं प्रीती। ३ ।
नामा म्हणे लाखोली सदा। अनंत नामें वाहुं गोविंदा। ४ ।